

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

## निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्स्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष ३१ ] मे १९७८ [ अंक ८

भारतीय संस्कृती व मद्य
लक्ष्मणशास्त्री जोशी

भाऊदाजी विरुद्ध राजारामशास्त्री
चारुदत्त भागवत

## मद्य, मद्यनिवृत्ती आणि संस्कृती

अथेन्स, व्हर्जिनिया, ऑक्सफर्ड, आयर्लंड
मे. पुं. रेगे

दारूबंदी
प्र. शं. मराठे

वार्षिक वर्गणी १८ रु. अंकास ३ रु.






प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, संचालित मासिक
( महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत )

# नवभारत

वर्ष एकतिसावे : अंक आठवा
मे १९७८

अध्यक्ष व विश्वस्त
तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी


संपादकीय

प्राचीन भारतीय संस्कृतीतील मद्यविषयक आचारसंहिता : १
तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

स्थल, काल, जीवन आणि मद्य : ९
मे. पुं. रेगे

१९ व्या शतकातील मद्यपानविषयक दोन मतप्रवाह : २६
संकलन : चारुदत्त भागवत

अल्कोहोलचे शरीरावरील परिणाम : ३१
यशवंत भालेराव

मदात्यय ( अल्कोहोलिझम ) : ३५
अ. ना. ठाकूर

ड्रिंक : ॲन इकॉनॉमिक ॲण्ड सोशल स्टडी : हर्मन लेव्ही ४२
ग्रंथ-परिचय : अ. र. कुलकर्णी

मद्यपान आणि आदिवासी : ४७
नरेश परळीकर

मराठेशाहीतील मद्यपानविषयक धोरण आणि शासनव्यवस्था : ५०
वि. गो. खोबरेकर

आधुनिक पाश्चात्त्य 'मद्यवर्ग' : ५६
'एम्'

अमेरिकेतील दारूबंदीचा प्रयोग : ७५
'आर्'

ग्रंथ–परीक्षण सु. र. देशपांडे, सतीश कुलकर्णी, अ. ना ठाकूर ८२

सार–संकलन ९०




पत्रव्यवहार :
संपादकीय : भा. ग. सुर्वे
प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई–४१२८०३
व्यवस्थापकीय : पां. गो. आपटे,
व्यवस्थापक 'नवभारत' मासिक
द्वारा : प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )

वार्षिक वर्गणी १८ रु. किरकोळ अंकास ३ रु.

अनुक्रमणिका








## लेखक

| | | |
|---|---|---|
| **लक्ष्मणशास्त्री जोशी** | : | विद्वान, विचारवंत, लेखक व मराठी विश्वकोशाचे प्रमुख संपादक, वाई. |
| **मे. पुं. रेगे** | : | तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक, कीर्ती कॉलेज, मुंबई. |
| **यशवंत भालेराव** | : | सेवानिवृत्त डॉक्टर व मराठी विश्वकोशाचे एक अभ्यागत संपादक, वाई. |
| **अ. ना. ठाकूर** | : | मराठी विश्वकोशात भूविज्ञान, धातुविज्ञान, वातावरणविज्ञान इ. विषयांचे संपादक. |
| **अ. र. कुलकर्णी** | : | मराठी कथाकार व विश्वकोशात मराठी, संस्कृत, इंग्रजी, यूरोपीय इ. भाषा-साहित्यांचे संपादक. |
| **वि. गो. खोबरेकर** | : | महाराष्ट्र राज्याच्या पुराभिलेखविद्या खात्याचे संचालक, मुंबई. |
| **नरेश परळीकर** | : | समाजशास्त्राचे प्राध्यापक व मराठी विश्वकोशाचे एक अभ्यागत संपादक, बीड. |
| **प्र. शं. मराठे** | : | सामाजिक कार्यकर्ते व डॉक्टर, वाई. |
| **सु. र. देशपांडे** | : | मराठी विश्वकोशात पुरातत्त्वविद्या, इतिहास, राज्यशास्त्र, मानवशास्त्र इ. विषयांचे संपादक, वाई. |
| **सतीश कुलकर्णी** | : | मराठी विश्वकोशात अभियांत्रिकीच्या नाविक, यांत्रिक, विद्युत्, स्थापत्य इ. शाखांचे संपादक, वाई. |



अनुक्रमणिका








## संपादकीय ..

### मद्य, मद्यनिवृत्ती :

महाराष्ट्रीय, मध्यमवर्गी, सुशिक्षित, जबाबदार, पोक्त मंडळी जेव्हा मद्यपानासाठी जमतात आणि बैठकीत ऐसपैस गप्पा रंगतात तेव्हा चर्चेत एक विषय कधी ना कधी डोकावतोच. मद्यपान गैर कसे नाही, मद्यपानाविषयी (विशेषतः घरच्या बायकांत) भ्रामक समजुती कशा आहेत, मितप्रमाणात मद्यपान करणे खरोखर हितावह कसे असते, अतिरेकी मद्यपान अर्थात् वाईट, पण सर्वच गोष्टींतील अतिरेक वाईट असतो, इ. इ. ह्याचा अर्थ असा होतो की आपण मद्यपान करतो ह्याची रुखरुख कुठेतरी ह्या मंडळीला असते, आपण जे करीत आहोत त्याचे समर्थन करण्याची जरूरी त्यांना भासत असते. काही काळानंतर ही जरूरीची भावना मावळेलही. पण मग त्याचा अर्थ असा होईल की मंडळी आता ' निर्ढावली ' आहे. पाश्चात्त्य माणसे ज्या सहजपणे, दैनंदिन आहारविहाराचा किंवा विशेष समारंभाचा भाग म्हणून मद्य पितात, तसे आपण पीत नाही व्यवहारातील भाषेवरूनही ही गोष्ट उघड होते. इंग्लिशमध्ये ' वाइन ' हा शब्द एका वस्तुप्रकाराचा निर्देश करणारा शब्द आहे; पण त्याच्याभोवती एक रोमँटिक वलयही आहे. ' वाइन अँड विमेन अँड साँग '. बिअर हा शब्द भाकर, पाणी, विस्तव, निवारा, माणसांची संगत ह्यांसारख्याच अतिशय साध्या, प्राथमिक, मानवी जीवनाच्या घडणीत खोल रुजलेल्या अशा एका वस्तूचा निर्देश करतो. मराठीतील ' मद्य ' हा शब्द संस्कृतपासून उसना घेतलेला, वस्तूचा स्पष्ट निर्देश टाळणारा, अवघडलेला असा शब्द आहे. प्रा. ना. सी. फडके यांचे देखणे, खिलाडू, विलासी नायक हेच बहुधा हॉटेलात जाऊन उघडपणे ' मद्य ' पिणारे पहिले महाराष्ट्रीय. मद्यासाठी व्यवहारात वापरण्यात येणारा शब्द म्हणजे ' दारू. ' आणि दारू ही हीन, अशुद्ध, माणसाची अवनती करणारी वस्तू आहे.

तथापि, गेल्या पन्नास वर्षांत, आणि विशेषतः गेल्या पंचवीस वर्षांत मध्यमवर्गापुरते पाहिले तर मद्यप्राशन अधिक मान्य झाले आहे यात शंका नाही. पाश्चात्त्य राहणीच्या संसर्गाने आणि पारंपरिक धार्मिक टॅबूंचा जनमनावरील पगडा कमी झाल्यामुळे हे स्थित्यंतर घडून आले आहे यात शंका नाही. अव्वल इंग्रजीत पाश्चात्त्य शिक्षण घेऊन जे सरकारी अंमलदार झाले, कोर्टकचेऱ्यांत कामे करू लागले त्यांनी पाश्चात्त्य पोषाख, पाश्चात्य राहणी स्वीकारली आणि मद्यपान हा राहणीचा एक भाग म्हणून त्यांनी स्वीकारला. पण ह्या सर्वच गोष्टीमुळे ते स्वतःच्या समाजापासून अलग पडले. एकाचवेळी ते लोकांच्या असूयेचा आणि उपहासाचा विषय बनले. विशेषतः आय्. सी. एस्. अधिकाऱ्यांची, सावळ्या वर्णाच्या इंग्लिश जंटलमेनची, एक वेगळीच जात निर्माण झाली. एका अतिशय प्रसिद्ध, विद्वान आणि कर्तबगार महाराष्ट्रीय आय्. सी. एस्. अधिकाऱ्याला विशिष्ट रंगाची शेरी जेवणापूर्वी लागत असे, म्हणून त्याचे एका पाश्चात्त्य पत्रपंडितेने केलेले कौतुक अनेकांच्या वाचनात असेल. जेव्हा ब्रिटिश वर्चस्वाला भारतात राष्ट्रीय विरोध होऊ लागला तेव्हा मद्यपानाला, ब्रिटिश सामाजिक आणि सांस्कृतिक वर्चस्वाचा एक आविष्कार म्हणून, विरोध होऊ लागला. मद्यपानामुळे सामाजिक दुष्परिणाम घडून येतात हे जसे मद्यपानाला विरोध करण्याचे एक कारण होते, त्याप्रमाणे पारतंत्र्यामुळे स्वत्व गमावलेल्या हिंदूंनी जेत्यांकडून स्वीकारलेली एक भ्रष्ट प्रथा म्हणूनही मद्यपानाला विरोध

करण्यात येत होता. पण ह्या कारणासाठी ज्यांचा मद्यपानाला विरोध होता, त्यांच्यातील कडव्या मंडळींचा चहापानालाही विरोध होता, स्त्रीशिक्षणाला आणि विधवाविवाहालाही विरोध होता. राष्ट्रीय स्वाभिमान आणि आधुनिकीकरणाची अनिवार्यता ह्यांच्या कात्रीत सर्वच विचारी व्यक्ती सापडल्या होत्या आणि वेगवेगळे मध्यममार्ग सुचवीत होत्या.

स्वातंत्र्यानंतर परिस्थिती पालटली. औद्योगीकरण झपाटयाने करण्याचे धोरण राष्ट्रीय सममताने स्वीकारले आणि ह्याचा वाहक म्हणून एक नवीन मध्यमवर्ग उदयाला आला. आधुनिक विज्ञान आणि तंत्रज्ञान त्याने आत्मसात केले आहे आणि औद्योगिक संघटनेची व राज्यकारभाराची अत्याधुनिक तत्त्वे आणि तंत्रे स्वीकारली आहेत. आधुनिकीकरण म्हणजे पाश्चात्त्यीकरण हे समीकरण व्यवहारात तरी त्याने मान्य केले आहे पण पाश्चात्त्यीकरण म्हणजे परकीय जेत्यांपुढे घेतलेली शरणागती ह्या न्यूनभावनेचा डंख स्वातंत्र्यानंतर त्यांच्या वृत्तीत राहिला नाही कारण वैज्ञानिक तंत्रे भारतात राबविण्यात, त्यांच्यावरील आपला काबू सिद्ध करण्यात त्यांचा स्वाभिमान असतो. जे प्रत्यक्ष अनुभवाच्या, कार्यक्षमतेच्या कसोटीवर टिकून राहते तेच स्वीकरणीय असते, हा दृष्टिकोन स्थिरावल्यावर आणि तुलनेने अधिक कार्यक्षम ठरलेले तंत्र निकृष्ट तंत्राला बाजूला सारून त्याची बाजू घेते ह्या नित्य दैनंदिन अनुभवामुळे परंपरेविषयीचा आदरभावही गळून पडला. परंपरा व्यवहाराला सुशोभित करण्यापुरती उपयुक्त असते पण त्याच्या पलीकडे जाऊन ती प्रामाण्याचा दावा करू लागली तर अडगळ ठरते. ह्या वृत्तीमुळे मद्यनिषेधासारखे पारंपरिक 'टॅबू' गळून पडले. शिवाय ह्या दृष्टिकोनाशी सुसंगत असे एक नीतिशास्त्रही ह्या वर्गाने स्वीकारले आहे. माणसाने चोखपणे, कार्यक्षमतेने सपाटून काम करावे आणि त्याचे फळ म्हणून जे उत्पादन होते त्याचा मनसोक्त उपभोग घ्यावा. कामातील ढिलाई, चुकारपणा ज्याप्रमाणे अनैतिक आहे, त्याप्रमाणे उपभोगात निष्कारण मानसिक अडथळे आणणे वेडगळपणाचे आहे. तुम्ही नीट काम करू शकला नाही किंवा उपभोग घेऊ शकला नाही, तर दोहोतूनही तुमची असमर्थता, तुमचा दुबळेपणाच प्रकट होतो.

पण ज्या समाजात हा वर्ग उदयाला आला आहे आणि ज्याचा तो घटक आहे तो समाज परंपरेने अतिशय सोवळा आहे. 'शुचिता' आणि त्याची छाया असलेला 'भ्रष्टाचार' ह्या संकल्पनांनी त्याचा सर्व व्यवहार कुंठित झालेला होता. लैंगिक व्यवहाराभोवती जसे टॅबू असतात, जवळजवळ तितकेच प्रखर टॅबू ह्या समाजात मद्यपानाभोवती होते आणि आहेत. गुरुपत्नीशी समागम करणे हे जसे महापाप आहे तसेच सुरापानही आहे.

ही अतिशय विचित्र परिस्थिती आहे. कारण आदिम समाजापासून आतापर्यंत इतिहासात जे समाज होऊन गेले त्यांच्यांत आणि आज अस्तित्वात असलेल्या बहुतेक सर्व समाजांत मद्य हा अन्नाइतकाच आहाराचा एक भाग मानण्यात आला आहे. ख्रिस्ताने अखेरच्या भोजनाच्या वेळी आपल्या शिष्यांना भाकर वाटली तसेच मद्यही वाटले. पाण्याच्या घोटाबरोबर भाकरीचे घास गिळावे लागणे, ही, सर्वत्र दुःस्थिती मानण्यात येते. भाकरीबरोबर मद्य पाहिजे आणि मांसही हवे. उमर खय्याम जेव्हा तरुतळी भाकर, सुरेची एक सुरई आणि कवितेची एक वही यांची मागणी करतो, तेव्हा चैन करण्याची अनुज्ञा मागत नसतो किंवा भ्रष्टाचारासाठी मोकळीक मागत नसतो. माणसाच्या किमान भौतिक गरजा भागवणाऱ्या अतिशय साध्या राहणीवर आपण तृप्त आहोत असे त्याला सांगायचे असते. इस्लाममध्ये मद्यपानाचा पूर्णपणे निषेध केला आहे; पण ही गोष्टही काहीशी विलक्षण आहे. ईश्वराने माणसासाठी निर्माण केलेल्या ह्या जगात सर्व सुखद गोष्टी माणसाच्या उपभोगासाठी खुल्या आहेत अशीच इस्लामची मध्यवर्ती शिकवण आहे.

अनुक्रमणिका

हिंदू समाजातील वरिष्ठ जातींचा व्यवहार शुचितेच्या संकल्पनेने संकुचित झाला आहे असे आपण म्हटले. पुरोहित वर्गावर– ब्राह्मण जातीवर– सोवळेपणाची बंधने असली तर तें समजू शकते. पण इतर वरिष्ठ जातींचे काय ? क्षत्रियांचे आणि वैश्यांचे काय ? पारंपरिक सोवळेपणाला दुबळे-पणाची, निष्क्रियतेची एक बाजू आहे. अलिकडल्या इतिहासात हिंदू समाजाने जोमदार, संपन्न, आत्म-विश्वासपूर्ण असे ऐहिक जीवन उभारलेच नाही. आम्ही मद्य प्यालो नाही; पण प्रशस्त नगरे उभारली नाहीत, आमच्या निसर्गाचे, वनस्पतींचे, पशुपक्षांचे कोडकौतुक केले नाही, त्यांच्याशी जवळीक साधून आमच्या जीवनात त्यांना स्थान दिले नाही, देशाच्या सीमांचे रक्षण केले नाही, सागरापार गेलो नाही, देशांत तीर्थयात्रा केल्या पण प्रवास करून आमचा हा निसर्गसंपन्न देश पाहिलाही नाही. नागर जीव-नात हरतऱ्हेच्या माणसांची संगत मिळण्याच्या ज्या संधी असतात त्यांचा लाभ घेतला नाही. 'क्लब,' 'गोष्ठी' स्थापन केल्या नाहीत, प्रवाशांसाठी पथिकाश्रम उभारले नाहीत. सहजप्रेरणांवर आधारलेल्या व्यवहाराला उन्नत, प्रगल्भ, सुसंस्कृत स्वरूप देणाऱ्या प्रथा, संकेत, संस्था उभारल्या नाहीत. साहित्य निर्माण केले नाही. ही शुचिता नव्हती, वैराग्य नव्हते; ही असमर्थता होती.

पण नेहमी असे नव्हते. कालिदासाच्या काव्यात येथे बहरलेल्या बलिष्ठ, विजिगीषू, आत्म-निर्भर, जीवनाच्या सर्व अंगांना चैतन्यशीलतेने, गंभीर क्रीडामय वृत्तीने प्रतिसाद देणाऱ्या समाज-जीवनाचा सुंदर आविष्कार आढळतो. आमच्या निसर्गाचा उत्सव त्याने साजरा केला आहे; प्रगल्भ, सुसंस्कृत, नागरजीवनातील अनेकविध आनंद त्याने व्यक्त केला आहे आमच्या समाजाने कुठेतरी धसका घेतला. सोवळेपणाचे निमित्त करून त्याच्या कोशात स्वतःला झाकून घेतले. निर्मितीचा आनंद आणि कष्ट यांच्याऐवजी चाकोरीतून अलिप्ततेतून, लाभणारी सुरक्षितता पतकरली.

मानवी जीवनात वैराग्याला, इंद्रियदमनाला महत्त्वाचे स्थान आहे. पण इंद्रियदमनाची उद्दिष्टे वेगवेगळी असू शकतात. जे सातत्याने दीर्घकाल प्रयत्न करूनच साधता येते, ते साधण्यासाठी आवश्यक असलेल्या मानसिक आणि शारीरिक शिस्तीचे इंद्रियदमन अधिष्ठान असते. उदा. सैनिकाला पराकोटीची शारीरिक आणि मानसिक कार्यक्षमता कमवावी लागते. इंद्रियदमनाची सवय असल्याशिवाय हे शक्य होणार नाही. स्वतःचा स्वामी, प्रभू असावे, स्वतःहून इतर कशाच्या आधीन असू नये अशी स्वातंत्र्याची, स्वायत्ततेची प्रेरणा माणसाच्या ठिकाणी असते. ही स्वायत्तताही इंद्रियदमनावरच आधारता येते. ज्याची इंद्रिये सुखाला लालचावलेली आहेत, त्याला स्वाभिमानाने जगणे कठीण आहे. किंवा ह्या ऐहिक जगापलीकडच्या आध्यात्मिक तत्त्वाची कल्पना माणसाला असेल, ह्या तत्त्वाशी एकरूप होण्यात जीवनाचे सर्वोच्च सार्थक असते, असे तो मानीत असेल आणि ज्या जीवनमार्गाचा अवलंब करून हे श्रेय साधता येते, त्याचा ऐहिक विषयांशी स्वतःला निगडित करणाऱ्या स्वाभाविक वासनांना त्यांच्यापासून निवृत्त करून त्यांना क्षीण करणे हा महत्त्वाचा घटक असेल. पारंपरिक आध्यात्मिक जीवनमार्गात ह्या तीन्ही प्रेरणा संयुक्तपणे आढळतात. हे वैराग्य दुबळेपणातून उद्भवलेले नसते. त्याच्यामागे चैतन्याचा उत्कर्ष असतो. मानवी चैतन्याचा तो एका विशिष्ट दिशेने झालेला समृद्ध आविष्कार असतो.

पण सर्व स्वाभाविक प्रेरणांचा स्वीकार करून त्यांना प्रगल्भ, उन्नत स्वरूप देण्यासाठी त्यांच्यावर संस्कार करून, त्यांना मर्यादा घालून त्यांचा एका जीवनमार्गात सुंदर समतोल साधणारे ऐहिक जीवन – ॲरिस्टॉटिलियन संकल्पनेतले 'चांगले जीवन' – हाही मानवी चैतन्याचा दुसऱ्या दिशेने झालेला तितकाच समृद्ध, तितकाच शिस्तबद्ध आविष्कार आहे.

गांधीजींचे जीवन हे पारंपरिक आध्यात्मिक जीवनाचे अलिकडच्या काळातील सर्वश्रेष्ठ उदा-हरण होय. इंद्रियदमनामागच्या तिन्ही प्रेरणा ह्या जीवनामागे होत्या. पण गांधीजींच्या इंद्रियदमनाला

महत्त्वाचा सामाजिक संदर्भही होता. आपल्या देशबांधवांचे अमानुष दारिद्र्य दूर करण्याची जबाबदारी ज्या भारतीय सुशिक्षित वर्गावर आहे त्यांनी हे नैतिक आव्हान पूर्णपणे स्वीकारण्याचे ठरविलेच, तर त्यांना 'दरिद्रनारायणाशी' एकरूप होण्याशिवाय गत्यंतर नाही अशी गांधीजींची शिकवण होती. 'दरिद्रनारायणा'शी एकरूप होणे म्हणजे त्यांच्या आणि स्वतःच्या भौतिक राहणीतील अंतर शक्य तितके कमी करणे, शक्य तितक्या कमी गरजांना स्थान देणारी साधी राहणी पतकरणे. भारताच्या आजच्या परिस्थितीत 'चोख काम आणि अनिर्बंध भोग' ह्या नैतिक सूत्राचा प्रथमार्ध स्वीकारणे जेवढे आवश्यक आहे, तितकेच त्याचा उत्तरार्ध नाकारणे आवश्यक असेल.

आज एक टॅबू म्हणून मद्यनिषेध टिकूच शकणार नाही. त्याचा असा आग्रह कुणी धरला, तर तो हास्यास्पदच ठरेल. संयमाला मानवी जीवनात नेहमीच स्थान राहील; पण भारताच्या आजच्या परिस्थितीत संयमापलीकडे जाऊन उपभोगाला कठोर मर्यादा घालणारी जीवनवृत्ती सर्वांनी पतकरणे नैतिकदृष्टया अटळ आहे. पण ह्या मर्यादा सर्वच भोगांना घातल्या जातील, केवळ मद्याला नव्हे. आणि ह्या मर्यादांत ज्या उपभोगांना मोकळीक असेल त्यांच्यात जीवनाचा निरागस आनंद खुलविणाऱ्या मद्याला स्थान नाकारायचे काहीच नैतिक कारण नाही.

❀ ❀ ❀ ❀

ह्या विशेषांकाची रचना करताना श्रीमती शांता तुंकुर यांचे बहुमोल साहाय्य झाले आहे. ह्या ऋणनिर्देश आम्ही कृतज्ञतेने करीत आहोत.

❀ ❀ ❀ ❀

पुढील लेखांत सुशिक्षित वाचकांना परिचित असलेले असे (आणि कांही वेळा कदाचित् फारसे परिचित नसतील असे) अनेक इंग्रजी शब्द वापरण्यात आले आहेत. असे करणे अटळ झाले आहे. पेशवाई जेवणावळीचे वर्णन शुद्ध इंग्रजी भाषेत करण्याइतकेच आधुनिक मद्यांचे शुद्ध मराठीत वर्णन करणे दुर्घट आहे.

— का. संपादक

---

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# प्राचीन भारतीय संस्कृतीतील
# —मद्यविषयक आचार संहिता

मद्य हे आदिम मानव संस्कृतीमध्येही एक पेय म्हणून मान्य झालेले दिसते. आजपर्यंत माहीत असलेल्या प्राथमिक समाजांपासून सुसंस्कृत समाजांपर्यंतच्या समाजानी मद्य हे पेय मान्य वा अमान्य स्वरूपात त्यांच्या आचारसंहितेत परिगणित केलेले दिसते. काही थोडी मुस्लिम राष्ट्रे सोडल्यास आज विद्यमान असलेल्या समाजांमध्ये आणि राष्ट्रांमध्ये कायद्याने संपूर्ण मद्यपानबंदी केलेली दिसत नाही. रशियन राज्यक्रांतीनंतर लेनिनच्या वेळी कायद्याने संपूर्ण मद्यपानबंदीचा प्रयत्न झाला; परंतु तो अपयशी ठरल्यामुळे तत्संबंधी कायदा रद्द करण्यात आला. अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांतही ४० वर्षांपूर्वी कायद्याने संपूर्ण मद्यपानबंदी केली; परंतु प्रत्यक्ष अनुभवांती ही बंदी अंमलात येणे अशक्य दिसले; गुप्त चोरट्या मार्गांनी अमेरिकन नागरिक मद्यपान करीत राहिले; चोरट्या मार्गांनी मद्यविक्रीचे व्यवहार फार वाढून निरनिराळ्या शहरांमध्ये गुन्हेगार टोळ्या निर्माण झाल्या; म्हणून अमेरिकेतही मद्यपानबंदीचा कायदा रद्द करण्यात आला; त्या टोळ्या त्यानंतर व मद्यनिर्मितीचा व्यवहार—व्यापार जमेनासा झाल्यावर इतर गुन्हे करू लागले आहेत. परंतु मद्यपानबंदी उठल्यावर रशियात, अमेरिकेत व आधुनिक पश्चिमी राष्ट्रांमध्ये मद्यपानामुळे उत्पन्न होणारा मद्यासक्तिजन्य रोग फैलावू लागल्यामुळे त्याबद्दल तेथील काही समाजचिंतक चिंताग्रस्त झालेले दिसतात. भारताच्याही राष्ट्रीय संविधानात संपूर्ण मद्यपानबंदी करणे हे मार्गदर्शक तत्त्व नमूद केलेले आहे. म्हणून परंपरागत भारतीय संस्कृतीच्या संदर्भात प्राचीन भारतीयांची मद्यविषयक विचारपद्धती आणि आचारसंहिता यांचा थोडक्यात परामर्श घेणे या संदर्भात इष्ट ठरते.

अतिप्राचीन काळापासून धर्मशास्त्र व नीतिशास्त्र इतर खाद्यपेयभक्ष्यांपेक्षा मद्य या पेयाच्या बाबतीत अत्यंत चिंताग्रस्त दिसते. मद्यपानास संपूर्ण संमती देणारे आणि मद्यपान अत्यंत निषिद्ध व गर्ह्य मानणारे असे दोन्ही प्रकारचे धर्मशास्त्रज्ञ, विधिज्ञ किंवा कायदेपंडित या संबंधात फार सावधपणे व काही तर अत्यंत निश्चितपणे मद्यपानविषयक विचार व आचार सांगतात; परंतु त्यांच्या मनातले मद्यपानविषयक साधकबाधक विचारांचे द्वंद्व त्यांच्या मनास अस्वस्थ करते, ही गोष्ट प्राचीन भारतीय संस्कृतीतील वेदादी धर्मशास्त्रे, अर्थशास्त्रे म्हणजे राज्यशास्त्रे आणि आयुर्वेद यांच्यामध्ये स्पष्टपणे प्रतिबिंबित झालेले दिसते. त्यासंबंधाचे समालोचन असे :

वेदांचा विशेषतः ऋग्वेदाचा अभ्यास करणारे पश्चिमी व आधुनिक भारतीय पंडित यांच्यामध्ये सोमयागातील सोमरसाबद्दल म्हणजे सोमरस हा मद्य आहे की नाही याबद्दल चर्चा चालते. सोमरस हा सोम नामक वनस्पतीपासून काढलेला रस सोमयागामध्ये इंद्रादी देवांना अर्पण करण्याचा विधी वेदांमध्ये सांगितला आहे. हा रस सोमनामक वल्ली कुटून त्यातून काढलेला व गाळलेला रस होय; ही गोष्ट तत्संबंधी केलेल्या विधानांवरून व वर्णनांवरून दिसते. हा सोमरस इंद्रादी देवांच्या ठिकाणी मद म्हणजे कैफ वा उत्कट आनंद उत्पन्न करतो, असे तेथेही



अनुक्रमणिका

वर्णन आहे. या सोमरसाच्या पानाने इंद्र उत्साहित होतो. एवढेच नव्हे, तर तो उत्साह सुरापानाने उत्पन्न होणाऱ्या उत्साहासारखा उत्कट असतो, असेही वर्णन आढळते. मद हा शब्दच सोमरसपानाचा मानसिक परिणाम म्हणून सर्वत्र वापरलेला दिसतो. काही ठिकाणी सोमरसाला 'सोम्य मधु' म्हणजे सोमाचे मद्य असेही म्हटले आहे. म्हणून सोमरस हा मद्यासारखा परिणाम करणारा होता, असे बहुतेक पंडितांचे मत आहे; परंतु ऋग्वेदामध्ये सोम आणि सुरा ( धान्याचे पीठ आंबवून गाळलेली दारू ) असा भेद केलेला आढळतो. वरुणदेवाची प्रार्थना करताना सूक्तद्रष्टे ऋषी वसिष्ठ म्हणतात, की मनुष्य सावध बुद्धीने पाप करीत नाही; पाप होते ते दैव, सुरा, क्रोध, द्यूत किंवा अविवेक यांच्यामुळे होते ( ऋग्वेद ७.८६.६ ). एका ठिकाणी वसिष्ठ ऋषी म्हणतात, की इंद्राने सोम खूप प्यायल्यावर त्याच्या हृदयामध्ये सुरेने झिंगलेल्या लोकांप्रमाणे गडबड उडते ( ऋग्वेद ८.२.१२ ). अश्वीदेवांची स्तुती करीत असताना 'ऋग्वेदात' ( १.११६.७ ) म्हटले आहे, की त्यांची जी महान् कृत्ये आहेत, त्यांपैकी एक कृत्य असे, की दारूच्या पखालीतून दारू वाहते त्याप्रमाणे अश्वीदेवांच्या अश्वाच्या खुरांतून वाहणाऱ्या दारूचे शंभर घडे भरतात. उदार यजमानांची प्रशंसा करताना ( ऋग्वेद १०.१०७.९ ) सांगितले आहे, की त्या उदार माणसांनी सुरेचे सार जिंकले आहे. या अश्वीदेवांची एका ठिकाणी ( १०.१३१.४–५ ) प्रशंसा केली आहे, की सोम मिसळलेली सुरा प्यायलेल्या अश्वीदेवांनी इंद्राला नमुची असुराशी युद्ध करताना चांगली मदत केली. अथर्ववेदात ( ४.३४ ) अनेक ठिकाणी सुरेबद्दल प्रशंसात्मक उद्‌गार आलेले आहेत, (१४.१; १५.९). तेथे एका ठिकाणी ( ४.३४.६ ) असे म्हटले आहे, की ज्या स्वर्गात तूप, मध, दही, दूध आणि सुरा यांचे डोह आहेत अशा स्वर्गात यज्ञ कर्ता म्हणजे यजमान रहात असतो. तैत्तिरीय संहिता ( २.५.१ ) आणि शतपथ ब्राह्मण ( १.६.३ ) या यजुर्वेदाच्या ग्रंथांमध्ये देवांचा पुरोहित आणि असुरांचा भाचा असलेल्या विश्वरूप त्वाष्ट्राला एक सोमपान करणारे, दुसरे सुरापान करणारे आणि तिसरे अन्न खाणारे अशी तीन शिरे होती. तेथे पुढे असेही म्हटले आहे, की इंद्राने खूप सोमपान केल्यामुळे तो रोगी झाला, तेव्हा देवांनी सौत्रामणी यज्ञ करून इंद्राला रोगमुक्त केले. या सौत्रामणी यज्ञात सोमाच्या व सुरेच्या आहुती द्यावयाच्या असतात. शिल्लक राहिलेली सुरा सुरापान करणारा ब्राह्मण मिळाल्यास त्याला प्यायला द्यावी; तसा ब्राह्मण न मिळाल्यास वारुळाच्या मातीवर ती अवशिष्ट सुरा ओतून टाकावी. ( तैत्तिरीय ब्राह्मण १.८.६; शतपथ ब्राह्मण ५.५.४ ). शतपथ ब्राह्मणामध्ये (५.१.५.२८) सोम व सुरा यांची तुलना केली आहे :– सोम हा सत्य, समृद्धी आणि ज्योती होय; आणि सुरा ही अनृत, दारिद्र्य आणि अंधकार होय. काठक संहितेमध्ये ( १२.१२ ) सुरेबद्दल असे म्हटले आहे, की दारू प्यायल्यावर सून व सासरा, लहानमोठे, एकत्र बसून बडबडत राहतात; म्हणून पाप लागू नये म्हणून ब्राह्मण सुरा पीत नसतो; सुरा हे पाप व मळ आहे; परंतु क्षत्रियाला ब्राह्मणाने सांगावे, की त्याला सुरा प्यायल्याने बाधा होत नाही. कुमारिल भट्टांच्या तंत्रवार्तिकात ( १.३.७ ) सुरा शब्दाचे दोन अर्थ सांगितले आहेत. सीधू वा शीधू (रम) आणि मधापासून तयार केलेली दारू. ऐतरेय ब्राह्मणात ( ३७.४) राजाभिषेक सांगितला आहे. या अभिषेकात पुरोहिताने राजाच्या हातात सुरापात्र द्यावयाचे असते. याच्या उलट छांदोग्य उपनिषदात ( ५.११.५ ) केकय देशाचा राजा अश्वपती म्हणतो, की माझ्या देशात चोर, कृपण, मद्यपी, अग्निहोत्र न करणारा, अशिक्षित, स्त्रियांच्या बाबतीत स्वैर वर्तन करणारा असे लोक नाहीत; मग स्वैर वर्तन करणारी स्त्री कशी असेल? त्याच उपनिषदात ( ५.१०.९ ) पाच पातकांमध्ये सुरापानाची गणना केली आहे.

गृह्यसूत्रांमध्ये गृहस्थाने करावयाचे संस्कारविधी आणि विविध अन्य विधी सांगितले आहेत. त्यामध्ये वर्षाकाठी अन्वष्टकानामक श्राद्धविधी सांगितला आहे. या श्राद्धविधीत मृत स्त्रिया उदा० माता, पितामही ( आजी ) आणि प्रपितामही ( पणजी ) यांना पिंडांबरोबर माळा, काजळ आणि सुरा द्यावयाची असते, ( आश्वलायन गृह्यसूत्र २.५.५; पारस्कर गृह्यसूत्र ३.३; काठक गृह्यसूत्र ६५.७.८). पुरुष पितरांना मात्र सुरा अर्पण करण्याचा विधी

नाही. यासंबंधी कै. डॉ. पां. वा. काणे यांचे असे अनुमान आहे, की ब्राह्मणांना क्षत्रिय व वैश्य वर्णांच्या स्त्रिया करण्याचा अधिकार असल्यामुळे, क्षत्रिय, वैश्य, शूद्रांना मद्यपानाची धर्मशास्त्राप्रमाणे परवानगी असल्यामुळे हा सुरार्पण विधी सांगितला असावा; परंतु या अनुमानासंबंधी एक अडचण अशी येते, की क्षत्रिय व वैश्य यांना सुरापानाचा निषेध आहे. इतर मद्येच घेण्याची परवानगी आहे. मग येथे सुरार्पण कसे सांगितले? अर्थात काणे यांच्या बाजूने यावर असेही म्हणता येईल, की अन्वष्टका श्राद्धांमध्ये पैष्टिक सुरा वगळून इतर प्रकारच्या सुरा गृहीत धरलेल्या असाव्यात; कारण क्षत्रिय–वैश्यांना पैष्टिक सुरा म्हणजे धान्याच्या पिठापासून केलेली सुराच केवळ वर्ज्य आहे, इतर सुरा वर्ज्य नाहीत.

गौतम धर्मसूत्र ( २.२५ ), आपस्तंब धर्मसूत्र ( १.५.१७.२१ ), मनुस्मृति ( ११.९४ ) या धर्मशास्त्रग्रंथांत ब्राह्मणाला केव्हाही सर्व प्रकारची मद्ये वर्ज्य केली आहेत. त्यांच्या मते सुरा किंवा अन्य मद्य घेणे ब्राह्मणाला महापाप होय. इतके असूनही बौधायन धर्मसूत्रात ( १.२.४ ) असे नमूद केले आहे, की उत्तरेकडील ब्राह्मण पाच प्रकारचे निषेध पाळीत नाहीत; त्यांपैकी सुरापानाचाही निषेध पाळीत नाहीत; मनुस्मृतीमध्ये (११.९३-९४) म्हटले आहे– "सुरा हा अन्नांचा मळ आहे आणि हा मळ म्हणजे पाप होय. म्हणून ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांनी सुरापान करू नये. गौडी ( मळीपासून तयार केलेली ), पैष्टी ( पिठापासून तयार केलेली ), आणि माध्वी ( मोहाच्या फुलांपासून झालेली ) ही तीन प्रकारची सुरा होय; ती द्विजोत्तमाने म्हणजे ब्राह्मणाने पिऊ नये; कारण तिन्हीही सारख्याच होत." तात्पर्य पैष्टीशिवाय इतर सुरा क्षत्रियवैश्यांना वर्ज्य नाहीत. महाभारतात ( उद्योग ५९ ) श्रीकृष्ण व अर्जुन यांनी एकत्र बसून सुरापान केले, ते झिंगले, असे जे वर्णन आले आहे त्याचे समर्थन वरील स्मृतिग्रंथांच्या आधारे कुमारिल भट्टांनी तंत्रवार्तिक या पूर्वमीमांसेच्या ग्रंथात केले आहे. ते म्हणतात, की माध्वी ( मोहाची ) व सीधू ( गौडी ) या सुरांचा निषेध क्षत्रिय–वैश्यांना नाही. म्हणून श्रीकृष्ण व अर्जुन दोषी नाहीत. शूद्रांना मात्र धर्मशास्त्राप्रमाणे कोणतेच मद्य वर्ज्य नाही.

ब्रह्मचर्याश्रमातल्या सर्व वर्णांच्या व्यक्तींना सर्व प्रकारचे मद्य निषिद्ध सांगितले आहे ( आपस्तंब धर्मसूत्र १.१.२.२३; मनुस्मृती २.१७७; याज्ञवल्क्य स्मृती १.३३ ) याज्ञवल्क्य स्मृतीचे ( १.३३ ) या श्लोकावरील टीकाकार विश्वरूप यांनी 'कृष्णयजुर्वेदा'च्या चरकशाखेतील एक उतारा दिला आहे; त्यात म्हटले आहे, की उद्दालक ऋषीचा पुत्र श्वेतकेतू याला त्वचारोग झाला होता; तेव्हा अश्वीदेवांनी मद्य व मांस यांचे सेवन, हा रोग बरा करण्याकरिता उपचार म्हणून, सांगितले. अश्वीदेवांना तो म्हणाला, मी ब्रह्मचारी असल्यामुळे हे निषिद्ध पदार्थांचे सेवन मी कसे करू शकतो? त्यावर अश्वीदेव उत्तरले, की पहिल्यांदा आपला जीव नेहमी वाचवावा; जीव बचला म्हणजे सगळे काही चांगले करता येते. अपरार्क या याज्ञवल्क्यस्मृतीच्या टीकेत ब्रह्मपुराणाचा आधार देऊन असे सांगितले आहे, की कलियुगात क्षत्रिय–वैश्यांनाही मद्य निषिद्ध आहे.

विष्णुधर्मसूत्रामध्ये दहा प्रकारची मद्ये सांगितली आहेत. ती म्हणजे माधूक ( मोहाच्या फुलांचे ), ऐक्षव ( उसाच्या रसाचे ), टांक ( कवठाचे ), कौल ( बोर किंवा बोरासारख्या फळाचे ), खार्जुर ( खजुराचे ), पानस ( फणसाचे ), मृद्वीक ( द्राक्षाचे ), माध्विक ( मधाचे ), मैरेय ( एका विशिष्ट वृक्षाच्या फुलांचे किंवा मीरा नदीकाठच्या प्रदेशातले ), आणि ताल ( ताडी ) अशी ही दहा मद्ये होत. ही दहाही ब्राह्मणांना निषिद्ध होत; क्षत्रिय–वैश्यांना नव्हेत. ताल ( ताडी ) वा सैर इत्यादी नावांचीही मद्ये इतर स्मृतींत ब्राह्मणास वर्ज्य सांगितली आहेत. ब्राह्मणाला मनु-गौतमादी स्मृतींमध्ये सुरापानाबद्दल देहान्त प्रायश्चित्तापर्यंतची प्रायश्चित्ते सांगितली आहेत. मनु आणि कौटिल्य यांनी मद्यपान हे राजाच्या अनेक व्यसनांपैकी अत्यंत दुष्ट व्यसन म्हणून वर्णिले आहे.

मेगॅस्थिनीझ आणि स्ट्रॅबो या प्राचीन (– इ. स. पू. चौथे शतक ) परदेशी प्रवाशांनी म्हटले आहे

अनुक्रमणिका

की यज्ञयागादी समारंभाशिवाय भारतीय लोक मद्यपान करीत नाहीत.

मेगॅस्थिनीझ व स्ट्रॅबो यांच्या वरील यज्ञसंबंधी विधानाला महाभारताची पुष्टी मिळते. नाभाग अंबरीष या राजर्षींनी अनेक यज्ञ केले. त्यामध्ये विद्वान श्रेष्ठ ब्राह्मणांची विविध प्रकारे पूजा केली. मैरेयक मद्य, अनेक प्रकारची पक्वान्ने, मिष्टान्ने, स्वादिष्ट फळे व मुळे, दही, तूप, मध यथेच्छ दिली. या विप्रश्रेष्ठांनी आत्मसुखार्थ मद उत्पन्न करणारी पापे केली, यथेष्ट मद्यपान केले, झिंगून गायले, नाचले, त्यात नाभाग राजाची मनमुराद स्तुती केली ( द्रोणपर्व, अध्याय ६४ ).

आश्वमेधिक पर्वात ( अध्याय ८९ ) धर्मराजाच्या अश्वमेध समारंभाचे मजेदार वर्णन केले आहे. अश्वमेध यज्ञ हा सर्व पापांच्या क्षयार्थ करावयास वेदांनी सांगितला आहे. या यज्ञाचा आरंभ झाल्यावर राजाने दिग्विजयार्थ यज्ञीय अश्व सैन्यासह स्वतःच्या देशाबाहेरील अनेक देशांमध्ये फिरवायचा असतो. हा यज्ञ अनेक विदेश जिंकून अश्व परत येईपर्यंत म्हणजे वर्षभर चालवायचा असतो. अनेक विद्या आणि कलांमध्ये पारंगत असे नागरीक, गायक, कवी, कथाकार, नर्तक आपापले नैपुण्य प्रतिदिवशी या समारंभात दाखवितात. त्यांना सुग्रास भोजन, विविध प्रकारचे धन, रत्न म्हणजे रमणीय वस्तू, दक्षिणा किंवा पारितोषिक देतात. युवतीजनांची नृत्ये होतात. या प्रसंगी विविध प्रकारच्या सुरा आणि मद्ये यांच्या पानांचे समारंभ वा पानगोष्ठी चालतात. या ८९ व्या अध्यायात या संदर्भात असे म्हटले आहे :– "त्या बुद्धिमान धर्मराजाचा यज्ञ असा साजरा झाला. अन्न, धन आणि रत्न यांचे ढीग पडलेला आणि सुरा व मैरेय मद्य यांचा सागर म्हणजे हा यज्ञ होता. मृदंग, शंख इत्यादिकांच्या नादांनी यज्ञमंडप गाजत होता. मत्त, प्रमत्त, मुदित आणि सुप्रीत असा युवतिजन त्यामध्ये होता. त्यामुळे भरतकुलातील श्रेष्ठ धर्मराजा निष्पाप आणि कृतार्थ होऊन पुन्हा आपल्या नगरीत प्रवेश करता झाला." भारतीय युद्धातील सेनापतीही मद्यपान यथेच्छ करून हल्ले करत असत. द्रोणपर्वात ( ११२.६२ ते ६६ ) सात्यकी या सेनापतीचे वर्णन आले आहे. धर्मराजाने त्याला सेनापतिपद देऊन मधुपर्क म्हणजे त्याची अतिथिपूजा केली. किरातदेशातून आणलेले ( कैलातक ) मद्य तो भरपूर प्यायला. त्याचे डोळे लाल झाले: डोळ्यात कैफ चढला आणि रणांगणात द्रोणसेनापतींच्या सैन्याशी सामना करू लागला. कर्णपर्वात कर्ण-शल्य संवाद आहे. शल्य हा पंजाबी, पांडव-सेनापती; त्याला कर्ण म्हणतो, 'अरे तुझ्या पंजाबात, तुझ्या राज्यात, गावांच्या आणि शहरांच्या चव्हाटयांवर आणि विशेषतः राजद्वारी सुरेची दुकाने म्हणजे दारूचे गुत्ते आहेत. यांना नाव तरी काय तुम्ही दिले आहे ! 'सुभद्र !' म्हणजे जे अभद्र आहे, त्यालाच तुम्ही सुभद्र म्हणता. चातुर्वर्ण्य-व्यवस्था तर तुमच्या देशात नाहीच. ब्राह्मण हे क्षत्रिय किंवा वैश्य केव्हा बनतात आणि केव्हा क्षत्रिय वा वैश्य हे ब्राह्मण बनतात, याचा नेम नाही.' शांतिपर्वातील मोक्षधर्म या उपपर्वात ( अध्याय १८० ) इंद्र–ब्राह्मण संवाद आला आहे. एका श्रीमंत वैश्याच्या रथाचा धक्का लागून एक गरीब ब्राह्मण कोलमडला; तो विव्हळत होता. इंद्र कोल्ह्याचे रूप घेऊन त्याच्यापुढे प्रकट झाला. इंद्र म्हणतो, 'तू गरीब असलास तरी ब्राह्मण आहेस; मोठा नशिबी आहेस. वारुणी म्हणजे दारू आणि लट्वाका नामक पक्ष्याचे मांस यांचा स्वाद तुला कसा माहीत असणार ? या दोन वस्तूंच्या पेक्षा अधिक चांगले भक्ष्य कोणतेही कोठेही नाही.'

या संबंधातले रामायणातील वर्णन महाभारतापेक्षा यत्किंचितही वेगळे नाही. ( बालकांड सर्ग ५३– ) वसिष्ठ मुनीच्या आश्रमात विश्वामित्र आले असताना त्यांचा भव्य सत्कार वसिष्ठ मुनींनी केला. वसिष्ठ मुनींची शबला नावाची कामधेनू होती. विश्वामित्रांच्या सत्काराकरता तिने जे जे लागते ते ते उत्कृष्ट पदार्थ दिले. उसाचा रस, मध, लाह्या, उंची मद्ये, मोठ्या मोलाची पेये आणि विविध प्रकारची भक्ष्ये त्या पदार्थांमध्ये होती. (अयोध्याकांड सर्ग ५२– ) सीता व लक्ष्मणासह राम वनवासाला निघाले तेव्हा प्रथम दुथडी भरलेली गंगा वाटेत लागली. गंगापार होताना तिघेही नौकेत बसले. पात्राच्यामध्ये नौका आली तेव्हा सीतेने गंगेला नवस केला. ती म्हणते, 'हा माझा नरव्याघ्र नवरा पुनः राज्यावर सुखरूप परत आला म्हणजे मी

अनुक्रमणिका








सहस्त्र सुराघटांनी आणि मांसमिश्रित भाताच्या पक्कान्नाने तुझी पूजा करीन.' पुढे (सर्ग ५६ –) वाटेत यमुना नदी लागली. नौका प्रवाहाच्यामध्ये आली, तेव्हा यमुनेला वंदन करून सीता म्हणते, की 'हे देवी, आम्हाला संकटातून पार पाड. सहस्त्र गोधनाने आणि सुरेच्या शंभर घटांनी तुझी मी पूजा करीन.' (अयोध्याकांड अध्याय ९१ -) राम वनवासाला निघून गेल्यावर भरताला अतिशय दुःख झाले. भरत रामाच्या भेटीकरता निघाला. वाटेतील भरद्वाज मुनींच्या आश्रमात आला. या राजपुत्राचे भरद्वाज मुनींनी आतिथ्य केले. भरद्वाज मुनींनी नद्यांची प्रार्थना करून मैरेय मद्य आणि उंची सुरा मिळवली. भगवान सोमाची प्रार्थना केली; भगवान सोमाने शोभिवंत पुष्पमाला, सुरा इत्यादी पेये आणि विविध प्रकारचे मांस दिले. भरद्वाज मुनींनी भरत आणि त्याचे सहचारी यांची प्रार्थना केली, की "ज्यांना सुरापानाची आवड असेल, त्याने तेथील विविध प्रकारच्या सुरा आणि भूक असेल त्यानी दुधाच्या खिरी यांचे सेवन करावे. पवित्र असे मांसांचे पदार्थही भक्षण करावे. ज्याची जी इच्छा असेल ते त्याने घ्यावे." सीता वनवासात असताना रावण प्रलोभने दाखवून तिला आळवावयास लागला; तेव्हा त्याला झिडकारून टाकताना सीता रामरावणांची अनेक उपमा देऊन तुलना करते; ती म्हणते — सुराग्र्य (श्रेष्ठ मद्य) म्हणजे राम होय; व तू रावणा, आंबवलेली ताडी आहेस. राम लंकेवर विजय मिळवून अयोध्येत परतले. सीतेचे मन प्रसन्न करण्याकरता अयोध्येच्या अशोक वनिकेत सीता आणि अन्य सेविकांचा परिवार घेऊन राम विहारार्थ गेले. सीतेला स्वतःच्या हातातील पवित्र मद्य (मधुमैरेयक), शचीदेवीला इंद्राने पाजावे, तसे पाजले. त्यावेळी सुरेख मसालेदार मांसाची पक्वाने, विविध प्रकारची फळे, रामाच्या आहाराकरता सेवकांनी त्वरित आणून ठेवली. दाक्षिण्यशाली, सुंदर, मद्याने बेहोष झालेल्या, नृत्य व गायन या कलांमध्ये निपुण असलेल्या महिला याप्रसंगी सीता व राम यांना आनंदित करण्याकरता त्यांच्या समोर नाचत होत्या (उत्तरकांड, सर्ग ४२)

रामायणकालीन मद्यविषयक आचारसंहिता जशी होती तशीच कालिदासकालीही, डॉ. वा. वि. मिराशी यांच्या मते गुप्त साम्राज्यातही, होती; असे रघुवंशातील वर्णनांवरून लक्षात येते. रघुराजाचे सैन्य कलिंग देशावर आक्रमण करून गेले असताना तेथील रघुराजाच्या शिबिरात योद्धयांनी तांबूलवल्लीच्या पानांनी बैठकी सजविल्या. त्या बैठकींवर बसून नारळाची दारू आणि शत्रूचे यश पिऊन आराम केला (४.४२). पारसिक देशावर विजय मिळविण्याकरता हे रघुराजाचे सैन्य चाल करून गेले. विजय मिळाला. विजयाच्या श्रमांचा परिहार करण्याकरता द्राक्षालतांच्या उद्यानांत सुरेख मृदू कातडी अंथरून, त्यावर बसून मद्यपान केले (सर्ग ४.६५). रघुराजपुत्र अज यांचा विवाहसमारंभ विदर्भ राजाच्या नगरीत झाला. अजांची मिरवणूक त्या नगरीतून निघाली. त्याचे वर्णन कालिदासाने असे केले आहे: अज राजे रथातून चालले असताना आपापल्या महालांच्या गवाक्षातून त्या नगरीतील सुंदरी त्याना निरखून पाहू लागल्या. त्यांच्या मुखामध्ये मद्यगंध भरलेला होता; व त्यांचे अंतरंगही मद्यानंदाने भरलेले होते; त्या महालांचे गवाक्ष त्यांच्या मुखकमलांनीच अज राजांच्या स्वागतार्थ सजविलेले वाटले. त्या कमळांवर त्यांचे नेत्रभ्रमर नाचत होते (सर्ग ७.११). इंदुमतीवर स्वर्गातून पुष्पमाला पडली व त्यात ती दगावली; त्यामुळे हृदय विदीर्ण झालेल्या अजराजांनी केलेल्या विलापाचे वर्णन करणारे हे शोककाव्य अलौकिक करुणरसाने भरलेले आहे. विलापकाली अजराजे ज्या अनेक आठवणी सांगतात, त्यातील एक आठवण सांगून ते म्हणतात: 'हे मदिराक्षी, मी माझ्या मुखाने तुला मदिरापान करविले आणि ते तू मोठ्या सुखाने आस्वादिले. आणि आता माझ्या अश्रूंनी दूषित झालेली, परलोकाकडे वळलेली जलांजली तू कशी स्वीकारशील?' (सर्ग ८.६८).

वेद, स्मृतिपुराणादी धर्मशास्त्रे, महाभारत व रामायण यांच्या परिशीलनावरून असा निष्कर्ष निघतो की चातुर्वर्ण्यव्यवस्था गृहीत धरून सर्व प्रकारचे मद्य ब्राह्मणाला पातित्यकारक मानले आहे. ज्या प्रदेशात ब्राह्मण आणि त्यांच्या स्त्रिया यांनी

मद्यपान करण्याची चाल किंवा रूढी होती, ती रूढी काही धर्मशास्त्रकारांनी तेवढ्या प्रदेशापुरती विशिष्ट देशरुढी घेऊन मान्य केली आहे; तर काहींनी अमान्य केली आहे. शाक्त शैव आगम सोडल्यास सर्व धर्मशास्त्रांनी ब्राह्मण वर्णाला मद्यपान निषिद्ध मानले आहे. शाक्त व शैव आगमांत देवताध्यानाला बळकटी आणण्याचे मद्यपान साधन मानले आहे. मद्य हा देवताप्रसाद असून त्याचा मनमुराद आस्वाद घेणे हे पवित्र कर्म मानले आहे. क्षत्रिय – वैश्यांनी पैष्टिसुरा वगळून बाकीचे सुरेचे व मद्याचे सर्व प्रकार याचे पान धर्मशास्त्रांनी निषिद्ध मानले नाही. शूद्रांना कोणत्याही प्रकारच्या मद्याचे पान करण्यास धर्मशास्त्रांचा विरोध नाही; परंतु धर्मशास्त्रदृष्टच्या ज्यांना मद्यपानाचा निषेध नाही त्यांनी मद्य वर्ज्य करण्याने ते सद्वर्तनी ठरतात. मद्यमांसनिवृत्त शूद्राला वृद्धहारीत– स्मृतीमध्ये ( ९.२७७ ते २७८ ) सत्शूद्र अशी पदवी दिली आहे. ऋग्वेदामध्ये अश्वीदेव मद्यपान करणारे आणि मद्य उत्पन्न करणारे देव म्हणून ऋषींनी स्तविले आहेत. यावरून असे अनुमान निघते, की ऋग्वेदकाली ब्राह्मणांना मद्यपानाचा निषेध नसावा. ही गोष्ट महाभारताच्या आदिपर्वातील ( ७६ ते ७७ ) शुक्राचार्यांच्या कथेवरून सूचित होते. शुक्राचार्यांचा मद्यपानामुळे अधःपात झाला, त्यामुळे त्यांना पश्चात्ताप उत्पन्न झाला; म्हणून त्यांनी असे जाहीर केले, की आजपासून जो ब्राह्मण मोहवश होऊन मूर्खपणाने सुरापान करील, त्याचा धर्म नष्ट होऊन इहलोकी आणि परलोकी निंद्य ठरेल, त्यामुळे त्याला ब्रह्महत्येचे पातक लागेल. बलराम, कृष्ण इत्यादी महाभारतकालीन यादव मद्यपी होते. त्यातल्या त्यात बलराम हा तर दारुडा होता. मद्यपान करून झिंगलेले व बेहोष झालेले यादव मुसलांनी आपसांत मारामाऱ्या करून एकमेकांची डोकी फोडून मेले. ही कथा सविस्तर रीतीने महाभारताच्या मौसल पर्वात वर्णिली आहे. हा स्वकुलनाश पाहून बलराम पश्चात्तप्त झाला व त्याने मद्यपानबंदी जाहीर केली व त्याकरता दंडाची शिक्षा सांगितली. शांतिपर्वात ( ११०.२२ ) म्हटले आहे, की जी माणसे जन्मापासून मद्यमांसापासून निवृत्त असतात, ती सर्व संकटांतून उत्तीर्ण होतात.

कौटिलीय अर्थशास्त्रात राज्याच्या निरनिराळ्या खात्यांचे निरनिराळे अध्यक्ष व त्यांची कर्तव्ये सांगितली आहेत. त्यांत सुराध्यक्ष म्हणून एक प्रकरण ( २. २५ ) आहे, त्यात राज्यातील मद्यव्यवसाय चालविणाऱ्या सुराध्यक्षाची कर्तव्ये सांगितली आहेत. ती अशी : किल्ले, जनपद ( जनवस्ती ), सैन्य– शिबिरे यांमध्ये मद्याच्या निर्मितीचा आणि क्रयविक्रयाचा व्यापार चालवावा; तो परंपरेने मद्याचे उत्पादन आणि त्याचा क्रयविक्रय करणाऱ्यांकडून चालावा. परवानगीवाचून अन्यस्थळी जे मद्यव्यापार करतात त्यांना ६०० रु. ( पण ) दंड करावा. एका गावातून दुसऱ्या गावात संमतीवाचून मद्य नेणे गुन्हा आहे. कारण, अधिकारी, आर्य व गुंड यांच्याकडून अतिक्रम होण्याचे भय असते. पानागार म्हणजे मद्यपानगृह निर्माण करावे; त्याला अनेक दालने असावीत; झोपण्याची शय्यादी साधने असावीत; पात्रे, फुले आणि पाणी ठेवावे. तेथे येऊन कोणकोण राहतात, त्यांच्यावर देखरेख ठेवावी; त्यांच्या मोलाच्या वस्तू चोरीला जाणार नाहीत, अशी काळजी घ्यावी; व्यक्तींना काही नियमित प्रमाणात मद्ये घरी नेण्याची परवानगी द्यावी. इत्यादी नियम सांगितल्यावर मेदक, प्रसन्न, आसव, अरिष्ट, मैरेय, मधू, श्वेतसुरा, सहकारसुरा ( आंब्याच्या रसाची ), महासुरा राजपेया इ. मद्यांचे आणि मद्यद्रव्यांचे व त्यांच्यामधे करावयाच्या विविध मिश्रणांचे वर्णन केले. पुढे म्हटले आहे, की कुटुंबामध्ये काही धर्मकार्य असल्यास श्वेतसुरा किंवा अन्य प्रकारची सुरा तयार करण्याची परवानगी द्यावी. उत्सव, यात्रा किंवा अन्य सामाजिक समारोह यांच्यामध्ये सुरापानाची चार दिवसपर्यंत तरतूद असावी; परंतु हे सगळे सुराध्यक्षाच्या संमतीने व्हावे. सुरापानादी महापापे करणाऱ्या ब्राह्मणाला मात्र देशातून हद्दपारीची शिक्षा कौटिलीय अर्थशास्त्रात सांगितली आहे.

चरक संहितेत म्हटले आहे :–

किंतु मद्यं स्वभावेन यथैवान्नं तथा स्मृतम् ।
अयुक्तियुक्तं रोगाय युक्तियुक्तं यथाऽमृतम् ॥

– ( चरक, चिकित्सा, अ. २४ )









अर्थ :– " परंतु स्वभावतः जसे अन्न तसे मद्य होय; असे सांगितले आहे. ते अयोग्य-रीतीने घेतल्यास रोगकारक व योग्य-रीतीने घेतल्यास ते अमृत होते."

आयुर्वेदाच्या चरक, सुश्रुत, अष्टांगहृदय, अष्टांग-संग्रह इत्यादी प्रमाणभूत ग्रंथांमध्ये धर्मशास्त्राचे मद्यविषयक विधिनिषेध लक्षात न घेता मद्यपानाचे आणि विविध मद्यप्रकारांचे गुणदोष वर्णिले आहेत. त्याचप्रमाणे मद्याचे ५० पेक्षा अधिक प्रकार, त्यांच्या निर्मितीची पद्धती आणि घटकद्रव्ये यांचीही संक्षेपाने व विस्ताराने माहिती दिली आहे. ( चरकसंहिता, सूत्रस्थान अध्याय २७ मद्यवर्ग; सुश्रुतसंहिता, सूत्र-स्थान अध्याय ४५ मद्यवर्ग; चरकसंहिता, चिकित्सा-स्थान अध्याय २४ मदात्ययचिकित्सित; सुश्रुत-संहिता, उत्तरतंत्र, अध्याय ४७ पानात्ययप्रतिषेध ). चरकसंहितेत आरोग्यपूर्ण दीर्घ जीवित कसे लाभते आणि कशा प्रकारचा जीवितक्रम स्वीकारल्याने ते प्राप्त होते, यांसंबंधी प्रथम विचार केला आहे. येथे आरोग्य म्हणजे मनाचे व शरीराचे आरोग्य होय. हा विचार करीत असताना निरोगी माणसाची ऋतुचर्या कशी असावी यासंबंधी आहार – विहारादिकांचे नियम सांगितले आहेत (सूत्रस्थान, अशितीय अध्याय ६ ). शीत ऋतूंमध्ये कोणत्या प्रकारचा आहार असावा हे सांगताना म्हटले, की विविध प्रकारच्या मांसांचे पदार्थ खाल्ल्यावर सीधू नामक मदिरा प्यावी. वसंत ऋतूत शीधू आणि माध्विक ( मोहाच्या फुलाची ) मदिरा प्यावी; ग्रीष्म ऋतूत म्हणजे उन्हाळ्यात मद्य न प्यालेले बरे; प्यायचे तर भरपूर पाणी घालून प्यावे; वर्षा ऋतूत म्हणजे पावसाळ्यात मध घालून मोहाच्या फुलाचे मद्य कमी प्रमाणात प्यावे. चरकाच्या चिकित्सा-स्थानातील 'मदात्ययचिकित्सित' या अध्यायात आणि सुश्रुताच्या उत्तरतंत्रातील 'पानात्ययप्रतिषेध' या अध्यायात चांगले मद्य किंवा चांगली सुरा यांचे पान करणे प्रशस्त व शरीर आणि मन यांच्या आरोग्यास व बलास अत्यंत हितावह म्हणून म्हटले आहे. शोक, अस्वस्थता, भय, उद्वेग यांचा नाश करून शरीराचे सामर्थ्य मद्यपान वाढविते; योग्य प्रकारे योग्य काली स्थली हितकारक अन्नाबरोबर योग्य प्रमाणात मद्य घेतल्याने त्याचे अमृत होते. योग्य प्रमाण म्हणजे शरीराचा व मनाचा समतोल राहील अशी मर्यादा. रूक्ष अन्न, अतिश्रम, विशिष्ट प्रकारचा व्याधी असताना मद्यपान अहितकारक आहे. सात्त्विक प्रकृतीच्या, योग्य पोषक आहारविहार करणाऱ्या स्त्रीपुरुषांना मद्यपान हितावह होते. अन्न तसेच मद्य ! अती आणि सदोष अन्नाने रोग उत्पन्न होतात त्याप्रमाणे अयोग्य वेळी, अयोग्य प्रसंगी सदोष मद्य घेण्याने माणसे रोगी किंवा अतिमद्यपानाने अविवेकी व बेभान होतात, निषिद्ध कर्मांचे आचरण करतात. म्हणून मद्यपान करू इच्छिणाऱ्यांनी योग्य काळजी घेऊनच मद्यपान करणे हितावह ठरते. चरक आणि सुश्रुतामध्ये सदोष मद्यपानाचे आणि मद्यासक्तीचे सविस्तरपणे दोष दाखविले आहेत. मदात्यय नावाचा एक रोगही ( अल्कोहलिझम् ) त्यांनी वर्णिला असून त्या रोगाच्या परिहाराचे थोडे थोडे मद्य व काही अन्य औषधे यासारखे विविध उपाय सांगितले आहेत. या दोन्ही ग्रंथांमध्ये उत्तमोत्तम गोष्टी कोणत्या यांचे शंभर प्रकार म्हणजे अग्र्यशतक सांगितले आहे. त्यात सौमनस्य म्हणजे प्रसन्न सात्त्विक मनःस्थिती उत्पन्न करणाऱ्या गोष्टींमध्ये मद्य हे अग्र्य म्हणजे श्रेष्ठ म्हणून वर्णिले आहे.

तात्पर्य असे, की चरक–सुश्रुतादी आयुर्वेदाचे ग्रंथ हे रोग आणि स्वास्थ्य यांचा विचार करीत असताना धर्मशास्त्रातील विधिनिषेधांचा संदर्भ ध्यानात घेऊन विचार सांगत नाहीत. आयुष्यशास्त्राची मांडणी करताना त्यांनी धर्मशास्त्राच्या मर्यादेचे बंधन मानले असते तर त्या शास्त्राचा इतका उत्कृष्ट विकासच झाला नसता. ते केवळ मानवी शरीर आणि मानवी मन यांचे स्वास्थ्य, बल, तेज आणि तसेच कर्म-सामर्थ्य, बुद्धिसामर्थ्य इत्यादी उद्देश अंतिम मानूनच आपले विचार सांगतात. त्यामुळे धर्मशास्त्रातील मद्यपाननिषेधाकडे ते दुर्लक्ष करतात; एवढेच नव्हे, तर धर्मशास्त्रातील मद्यनिषेध ते अमान्यही करतात ( चरकसंहिता, चिकित्सास्थान अध्याय २४ ). भारतीय प्राचीन संस्कृतीची आयुर्वेदात धर्मशास्त्रा-पेक्षा वेगळीच मांडणी केली आहे, ही गोष्ट त्यातील 'स्वस्थवृत्त' प्रकरणावरून निश्चित होते. उदा. गोमूत्र सोडून मनुष्यादी प्राण्यांचे मूत्र हे धर्मशास्त्राने अपवित्र व निषिद्ध मानले आहे; परंतु आयुर्वेदात

अनुक्रमणिका

मनुष्यासह गो, अश्व, महिष, गर्दभ, हस्ती, उष्ट्र इ० प्राण्यांच्या मूत्रांचेही औषधी गुणधर्म वर्णिले आणि प्रशंसिले आहेत. धर्मशास्त्राने ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांस लसूण व कांदा निषिद्ध मानला आहे. कांदा व लसूण खाणारे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे द्विजत्व गमावतात; शूद्र होतात. परंतु तिकडे दुर्लक्ष करून लसूण हे एक बलकारक व रोगनिवारक श्रेष्ठ औषध म्हणून आयुर्वेदाने वर्णिले आहे. काही कमी प्रमाणात कांदाही लसुणा सारखाच सांगितला आहे. अशी शेकडो उदाहरणे आहेत.

यहुदी व ख्रिश्चन धर्म सोडल्यास हिंदु, इस्लाम, बौद्ध, जैन इत्यादी धर्मांमध्ये मद्यपान अत्यंत निषिद्ध मानले आहे. हिंदू धर्मात ब्राह्मणाव्यतिरिक्त इतर वर्णांना मद्यनिवृत्तीची सक्ती नाही; परंतु मद्यनिवृत्ती सर्वांनाच इष्ट होय, असे मानले आहे. जैन, बौद्ध व इस्लाम हे धर्म संपूर्ण मद्यबंदीच्या बाजूचे आहेत. या बौद्ध धर्मातील वज्रयान संप्रदाय, त्याचप्रमाणे हिंदू धर्मातील देवीपूजक, शिवपूजक आणि गणेशपूजक काही पंथ, मद्य हे पूजेतील एक प्रकारचा देवतेला द्यावयाचा नैवेद्य म्हणून पवित्र पेय मानतात आणि पूजेतील प्रसाद म्हणून मद्यपान करतात. गेली हजारो वर्षे आतापर्यंत भारतात व महाराष्ट्रात हे पंथ जिवंत आहेत. त्यांचा ब्राह्मण पंडितांनीच खूप पुरस्कार केला; आणि पांडित्यपूर्ण आगमशास्त्रें ह्या पंथांच्या पुरस्कारार्थ लिहिली.

मद्यपानाबद्दल अत्यंत आग्रही विरोधी दृष्टिकोण बाळगणारे धर्मशास्त्रज्ञ आणि विचारवंत किंवा संत का निघाले आणि आजही सार्वत्रिक कायदेशीर मद्यपानबंदीचा आग्रह म. गांधीसारखे थोर पुरुष का धरतात ? याचे पहिले महत्त्वाचे कारण म्हणजे अतिमद्यपानामुळे मनुष्य अविवेकी व बेभान बनतो हे होय. परंतु या संदर्भात हेही लक्षात घेतले पाहिजे की मनुष्याला मोहग्रस्त व तितकेच अविवेकी बनविणारे युवती–युवकांचे सौन्दर्य, धन, मान, सत्ता इत्यादी विषय आहेतच. अतिमद्यपान केल्याबरोबरच काही माणसे विवेकभ्रष्ट होतात; तसेच अन्य इंद्रियांच्या विषयांनी होतात. अर्थात सगळे होत नाहीत. वर सांगितलेले युवती–युवक, धन–मान–सत्ता इ० विषयही मनाची पकड घेतल्यावर अतिमद्यपानाइतकाच मतिभ्रंश काही माणसांचा करतात. आणि त्यामुळे खून, हल्ले, दरवडे, पळवापळवी, फसवाफसवी, अफरातफरी इ. भ्रष्टाचार घडतात. म्हणून ह्या संबंधात ज्या तऱ्हेचे कायदे आणि निर्बंध राज्यशासन निर्माण करते तसेच मद्यपानासंबंधी धोरण का असू नये, याचा विचार केला पाहिजे.











मे. पुं. रेगे

# स्थल, काल, जीवन आणि मद्य :

[ पाश्चात्त्य समाजात मद्यपान निषिद्ध मानण्यात आलेले नाही. आयुर्वेदात ज्याला 'स्वस्थवृत्त' म्हटले आहे – धि गुड लाइफ– त्याच्यात पाश्चात्त्य परंपरेप्रमाणे मद्याला निश्चित स्थान होते. युरोप–अमेरिकेत कित्येक विशिष्ट स्थळी आणि काळी बहरलेल्या अशा जीवनसरणींचे काही नमुने पुढे दिले आहेत. ]

## अथेन्स ( ख्रि. पू. ४ थे शतक ) :

[ 'सिंपोसियम' म्हणजे सहपान आणि सहपानामुळे रंगात आलेल्या सोबत्यांत झालेली दिलखुलास चर्चा. प्लेटोने लिहिलेला 'सिंपोसियम' हा संवाद प्रसिद्ध आहे. त्याच्यात प्लेटोचे प्रेमविषयक तत्त्वज्ञान विशद करण्यात आले आहे. सुंदर गोचर वस्तू आणि व्यक्ती ह्यांनी आवाहन केल्याने माणसाच्या मनात जागृत होणारी प्रेमभावना ज्याच्यात केवल सौंदर्य आणि केवल सत् एकरूप झालेले असते अशा अतींद्रिय सत्तत्त्वाच्या ( आयडिया ऑफ धि गुड ) प्रेमात अखेरीस परिणत होते असा प्लेटोच्या शिकवणीचा आशय आहे. सॉक्रेटिस ह्या संवादाचा नायक आहे पण झेनोफन ह्या सॉक्रेटिसच्या दुसऱ्या एका मित्राने आणि अनुयायाने सॉक्रेटिस सहभागी असलेल्या दुसऱ्या एका सहपानाच्या प्रसंगाचे वर्णन केले आहे. सुसंस्कृत, बौद्धिक विषयांत रस असलेले अथीनियन सद्गृहस्थ मनोविनोदन कशा प्रकारे करीत याचा नमुना झेनोफनच्या ह्या 'सिंपोसियम' मध्ये सापडतो. त्याचा सारांश पुढे दिला आहे. ]

कालियसच्या घरी मेजवानी होती. नुकत्याच होऊन गेलेल्या क्रीडा–महोत्सवात ऑटॉलिकसने मिळविलेल्या विजयाबद्दल त्याचे अभिनंदन करणे हे मेजवानीचे निमित्त होते. ऑटॉलिकसने ज्या स्पर्धेत भाग घेतला होता, तिच्यात मुष्टियुद्ध आणि मल्लयुद्ध ह्या दोहोंचा अंतर्भाव असे आणि ह्या दोन्ही कलांत अतिशय तरबेज असल्याशिवाय आणि नेमाने मेहनत करून चांगला दम कमावलेला असल्याशिवाय स्पर्धकाचा तिच्यात निभाव लागणे कठीण होते. म्हणून पीळदार शरीराच्या देखण्या ऑटॉलिकसचे सर्वत्र कौतुक होत होते.

कालियस आणि त्याचे मित्र स्टेडियमवरून घरी परतत असतात. त्यांची वाटेत सॉक्रेटिस आणि त्याचे काही मित्र आणि अनुयायी ह्यांच्याशी गाठ पडली. 'हा फार चांगला शकुन आहे,' कालियस म्हणाला. 'मी ऑटॉलिकस आणि त्याचे वडील ह्यांच्या सन्मानार्थ मेजवानी देतो आहे आणि तुमच्यासारखे, तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाने ज्यांची चित्तशुद्धी झाली आहे असे, पाहुणे तिला उपस्थित राहिले तर प्रसंगाला विशेष शोभा येणार आहे. राजकारणी नेते किंवा सेनापती ह्यांच्यापेक्षा तुमच्यासारख्या प्रगल्भ मनांच्या व्यक्तींची संगत आम्हाला अधिक रुचते आणि हितकर वाटते.' सॉक्रेटिसने सुरवातीला आढेवेढे घेतले; पण कालियसचा फारच आग्रह पडल्यामुळे त्याने आपल्या गटाच्या वतीने निमंत्रण स्वीकारले.








मेजवानीचा बेत पक्का झाला. नेहमीच्या पद्धती-प्रमाणे सायंकाळचा व्यायाम, मर्दन आणि स्नान करायला मंडळी विखुरली आणि काही वेळाने कालियसच्या घरी परत जमली.

मेजवानीची तयारी एका प्रशस्त दालनात केली होती. प्रत्येक पाहुण्यासाठी बिछायत आणि तक्क्यांनी सजविलेला मंचक होता आणि त्यांच्यावर मंडळी रेलून बसली. मंचकांची अर्धवर्तुलाकार मांडणी केली होती. प्रत्येक मंचकासमोर एक सुबक, छोटे मेज होते आणि त्याच्यावर वेगवेगळ्या पात्रांत खाद्यपदार्थ वाढून ठेवले होते. प्रत्येक पदार्थासाठी वेगळे पात्र होते. शिवाय मेजावर मद्यासाठी एक चषक आणि फळांनी भरलेले एक पात्रही होते. ग्रीष्म ऋतूतील दिवस असल्यामुळे भूक काहीशी मंदावली होती. अपूप, थोडे मांस, मासे, ताज्या भाज्या आणि फळे एवढाच मेजवानीचा बेत होता. भोजनावरोबर मद्यात पाणी मिसळून त्याचेही सेवन मधून-मधून करण्यात येत होते. मंडळीचे भोजन आटोपल्यानंतर सहपानाच्या समारंभाला सुरवात झाली.

यजमान हा सहपानाचा अध्यक्ष असे आणि मद्यात पाणी किती प्रमाणात मिसळायचे हा त्याचा निर्णय असे. साधारणपणे मद्य आणि पाणी सम-प्रमाणात किंवा दोन भाग मद्य आणि एक भाग पाणी ह्या प्रमाणात मिसळण्यात येत असे. मग गप्पागोष्टी, थट्टामस्करी, करमणूक आणि उल्हास ह्यांना प्रारंभ व्हायचा. सहपान रंगले तर रात्र ओसरून पहाट होईपर्यंत ते चालू रहायचे.

आज मेजवानीच्या सुरवातीला तरी रंग भरला नाही. मंडळी मुकाट्याने जेवत होती. इतक्यात कुणीतरी दरवाजा ठोठावला. दरवानाने फिलिप आला आहे आणि मेजवानीचे आमंत्रण मागतो आहे असे येऊन सांगितले. फिलिप व्यवसायाने विदूषक होता. त्याचे म्हणणे असे पडले, की आयत्या वेळी आल्यामुळे त्याच्यासाठी काही अन्न तयार नसेल तर तो इतरांच्या वाट्याचे अन्न खायला तयार होता आणि त्याचा नोकर सामानाचा भार वाहून अतिशय श्रमला होता. हे सामान काय होते म्हणून विचारले ते एक प्रचंड शून्य होते आणि ते जितके रिकामे होते तितकेच त्याच्या नोकराचे पोटही रिकामे होते. हे सारे ऐकून कालियसने त्याला आत बोलवायचे ठरविले. फिलिप आत आला आणि दालनाच्या दरवाजात उभा राहून म्हणाला 'मित्र हो! मी व्यवसायाने विदूषक आहे हे तुम्हाला माहितीच आहे आणि निमंत्रण असल्याने जेवायला येण्यापेक्षा निमंत्रण नसताना जेवायला येणे अधिक विनोदी आहे असे मला वाटते.' 'ठीक आहे!' कालियस म्हणाला, 'ह्या मंचकावर बस. पाहुणे-मंडळी अतिशय गंभीरपणे जेवत आहेत. इथे हास्य-विनोदाला थारा नाही हे तुझ्या ध्यानात येईल.'

फिलिपने जेवायला सुरवात केली आणि थोड्या वेळाने एक विनोदी कोटी केली. ती पूर्णपणे उताणी पडली. ह्यामुळे काहीसे चिडून त्याने दुसरी एक कोटी केली पण तरीही कोणी हसले नाही. मग फिलिप आपल्या मंचकावर निजला आणि अंगरख्याने आपले तोंड त्याने झाकून घेतले. 'तुम्हाला काही वेदना होते आहे का?' कालियसने त्याला विचारले. 'झ्यूसशपथ सांगतो,' फिलिप म्हणाला, 'मला अतिशय वेदना होते आहे. जगातून हसणेच नष्ट झाल्यासारखे दिसते आहे. म्हणजे माझा कामधंदा ठार बुडाला. आतापर्यंत भोजनप्रसंगी लोकांना हसवायला मला आमंत्रणे मिळत. आता मला कशा-साठी आमंत्रणे मिळू शकतील? गंभीरपणे चर्चा करायला? ते मला अशक्य आहे.' आणि मग हुंदके देऊन रडण्याचा आविर्भाव त्याने केला. त्याचे हुंदके ऐकून एकाला विलक्षण हसू लोटले. त्याबरोबर फिलिप ताडकन उठून बसला, तोंडावरून अंगरखा त्याने दूर केला आणि समोरच्या पदार्थांवर ताव मारायला सुरवात केली.

भोजन संपले. नोकरांनी मंचकांसमोरील मेजे दूर केली. योग्य त्या देवतांना उद्देशून मद्याचे तर्पण करण्यात आले आणि सर्वांनी एक स्तोत्र गायिले. करमणुकीसाठी बोलविण्यात आलेले वादकनर्तक तयार आहेत असे कालियसच्या सेवकाने येऊन सांगितले आणि थोड्याच वेळात वेणू उत्कृष्ट वाजविणारी एक मुलगी, एक नर्तिका आणि वीणा वाजविण्यात आणि नृत्य करण्यात अतिशय निष्णात असलेला एक देखणा तरुण ह्यांना सोबत घेऊन तो

आला. ही सायरेक्युजहून आलेली मंडळी होती. मेजवानीच्या प्रसंगी आपल्या कलेचे प्रयोग करून ते चांगले उत्पन्न कमवीत.

सुरवातीला वेणू वाजविणाऱ्या मुलीने आपली दुहेरी बासरी वाजवून दाखविली आणि त्या तरुणाने वीणावादन केले. हे संगीत मंडळींच्या अतिशय पसंतीस आले. सॉक्रेटिस म्हणाला, 'झ्यूसशपथ, कालियस, तुम्ही आम्हाला उत्कृष्ट मेजवानी देत आहात. प्रथम तुम्ही आम्हाला अतिशय रुचकर आणि पथ्यकर भोजन दिले आणि नंतर आमच्यापुढे रम्य दृश्ये आणि ध्वनी मांडले'. कालियस संतुष्ट होऊन म्हणाला, 'आपण काहीसे ह्याच्याही पुढे जाऊया का? आपण मनोहर सुगंधांचा आस्वाद घेऊया. मी तशी तजवीज करतो.' 'छे? छे!' सॉक्रेटिस म्हणाला, 'जे पोषाखाच्या बाबतीत खरे असते ते सुगंधांच्या बाबतीतही खरे असते. पुरुषांना एक प्रकारचा पोषाख शोभून दिसतो. बायकांना वेगळ्या प्रकारचा पोषाख खुलून दिसतो. तसे स्त्रियांना आकृष्ट करणारे सुगंध पुरुषांना आकृष्ट करणाऱ्या सुगंधांहून वेगळे असतात. आपण तर येथे जमलेले सर्व पुरुष आहोत. तेव्हा एकमेकांना आकृष्ट करण्यासाठी आपण सुगंधी द्रव्ये वापरण्यात अर्थ नाही. फार तर निकेरेटॉस आणि क्रिटोबुलस ह्या आपल्या तरुण मित्रांनी सुगंधी द्रव्ये वापरावी. कारण त्यांचा नुकताच विवाह झाला आहे आणि त्यांच्या तरुण पत्नीसाठी म्हणून योग्य त्या द्रव्यांचा वापर करावा. पण त्याच्यातही फारसा अर्थ नाही. कारण ह्या तरुण स्त्रिया आपल्या अंगाला इतकी द्रव्ये माखतात की त्यांचा सुगंध दरवळत राहतो आणि दुसऱ्या कोणत्याही सुगंधाला वाव उरत नाही.'

आता सुगंधी द्रव्यांवर तात्त्विक चर्चा सुरू होणार असा रंग दिसू लागला; पण सॉक्रेटिसचे डोळे दरवाजाकडे लागले होते आणि तोच म्हणाला, 'पण ही चर्चा आपण काही काळ स्थगित करू या. कारण ही नर्तिका अगदी तयार होऊन दरवाजात उभी आहे आणि तिच्यासाठी वर फेकून झेलायची लहान चक्रे घेऊन कुणीतरी येत आहे.'

आता नर्तिकेने दृश्यक्रीडेला (floor-show) सुरवात केली. त्या दुसऱ्या मुलीने बासरीवर मधुर सूर काढले. नर्तिका नाचू लागली आणि ती नाचत असतानाच त्या तरुणाने तिच्या हातात एकामागून एक अशी बारा चक्रे दिली. आपल्या सोबत्यांप्रमाणेच तीही पूर्णपणे नग्न होती. नृत्य करीत असतानाच ती हातातील चक्रे भिरभिरवीत वर फेकीत होती आणि अतिशय तालबद्ध रीतीने झेलीत होती. हे पहात असतानाच सॉक्रेटिसने त्याच्यावर अर्थात् भाष्य केले. मित्रांनो, ही मुलगी जे करीत आहे त्यामुळे एक महत्वाची गोष्ट फिरून सिद्ध होते. स्त्रियांच्या मानसिक आणि शारीरिक शक्ती पुरुषांच्या शक्तीपेक्षा यत्किंचित्‌ही कमी नसतात. तेव्हा तुम्हाला आपल्या बायकोला जे काही शिकवावेसे वाटते ते तुम्ही तिला अवश्य शिकवा. कुणाही पुरुषाइतक्या सहजतेने ती ते शिकेल.' ह्यावर कुणीतरी विचारले, की 'सॉक्रेटिस, तुम्ही आम्हाला जो उपदेश करता त्याप्रमाणे तुम्ही स्वतः का आचरण करीत नाही? तुम्ही तुमच्या पत्नीला, झांटिपीला, काही शिकवून सरळ का करीत नाही? संसार करायला तिच्याइतकी कठीण बाई जगात नसेल.' सॉक्रेटिस म्हणाला, 'त्याचे असे आहे, की ज्यांना पटाइत घोडेस्वार व्हायचे असते ते सौम्य घोड्यांवर स्वार होत नाहीत, ते जातिवंत घोड्यावर मांड ठोकतात. मग आपण कोणत्याही घोड्याला वळणावर आणू शकू असा त्यांना विश्वास वाटतो. माझाही उद्देश असाच होता. मला कुणाही माणसाबरोबर सुरळीतपणे व्यवहार कसा करावा हे शिकायचे होते. म्हणून मी झांटिपीशी लग्न केले. तिच्याबरोबर जर सुखाने नांदू शकलो तर इतर व्यक्तींच्या बाबतीत मला काही अडचण भासणार नाही अशी माझी खात्री होती.'

पण इतक्यात सर्वांचे लक्ष परत समोरच्या दृश्य-क्रीडेकडे गेले. कारण सेवकांनी जमिनीवर एक मोठे लोखंडी वर्तुळ आणून ठेवले. ह्या वर्तुळात धारदार, नंग्या तलवारी उभ्या अडकविल्या होत्या. ती नग्न नर्तिका कोलांटचा मारून वर्तुळात प्रवेश करीत होती आणि परत तशीच बाहेर जात होती. प्रेक्षकांनी श्वास रोखून धरले होते. नर्तिकेची उडी भलत्या ठिकाणी पडेल आणि तिला जखम होईल अशी धाकधूक त्यांना वाटत होती पण ती स्वतः अगदी सहजपणे मजेत आणि सुरक्षितपणे कोलांटचा मारीत होती. ह्या दृश्यावर सॉक्रेटिसने भाष्य न

करणे अशक्य होते. 'हे दृश्य ज्याने पाहिले आहे,' तो म्हणाला, 'ह्या नाजूक मुलीला इतक्या धैर्याने ह्या तलवारींमधून आरपार उड्या मारताना ज्याने पाहिले आहे त्याची धैर्य हा गुण माणसांना शिकविता येतो अशी खात्री पटल्यावाचून राहणार नाही.'

एक उपस्थित म्हणाला, 'मग मी अशी सूचना करतो, की ह्या सायरेक्युसच्या पाहुण्याने ह्या मुलीचा नाच सबंध अथेन्स नगराला दाखवावा आणि आपण त्याला चांगला मोबदला दिला तर तलवारीच्या पात्याला न बिचकता सामोरे कसे जावे, हे आपण सर्व अथीनियन नागरिकांना शिकवू असे त्याने जाहीर करावे.' 'फारच छान!' फिलिप म्हणाला, 'पायसांडर हे आपले प्रसिद्ध राजकीय पुढारी घ्या. सध्या भाल्याचे टोक पाहून त्यांचा इतका थरकाप होतो, की सैन्यात भरती व्हायचे ते टाळतात. कुणीतरी नंग्या तलवारींमधून कोलांट्या घ्यायला त्यांना शिकविले तर किती बहार होईल!'

मग त्या तरुणाने नृत्याला सुरवात केली. सॉक्रेटिसने काही काळ ते नृत्य एकाग्रतेने पाहिले आणि म्हटले, 'हा तरुण देखणा आहे पण नृत्यात सुबक, तालबद्ध हालचाली करताना तो अधिकच देखणा दिसतो. ह्यावर एक आरोग्यदायक व्यायाम म्हणून नृत्याचे महत्त्व किती आहे या विषयावर चर्चा सुरू झाली. एकजण म्हणाला 'सॉक्रेटिस, आता तुमचे पोट काहीसे सुटू लागले आहे. तेव्हा तुमची एकंदर शरीरयष्टी ध्यानी घेता तुम्ही केलेले नृत्य आणि वेड्यावाकड्या उड्या यांत फार फरक असणार नाही. तुम्हाला त्यामुळे काय व्यायाम व्हायचा असेल, तो होवो; पण लोकांची खूप करमणूक तुमच्यामुळे होईल यात शंका नाही.' फिलिपने तर स्वतःच नृत्य करायला सुरवात केली आणि त्या बासरी वाजविणाऱ्या मुलीला सूर धरायला सांगून त्याच्या साथीवर अगोदरच्या नर्तकांचे विडंबन करणारे इतके चित्रविचित्र अंगविक्षेप केले की सगळ्यांची हसून पुरेवाट झाली. अखेरीस तो थकून आपल्या मंचकावर येऊन कोसळला. 'हा फार चांगला व्यायाम आहे,' तो म्हणाला. 'आणि त्याने तहान फार लागते! माझा चषक पुरता भरून टाक,' त्याने सेवकाला सांगितले. 'आम्हा सगळ्यांचेच चषक भरून टाक' कालियस म्हणाला, 'आम्हाला सुद्धा हसून हसून तहान लागली आहे.'

आता ह्यावर सॉक्रेटिस काहीतरी भाष्य करणार अशी सर्व मंडळींची अपेक्षा होती आणि त्याने तसे केलेही. तो म्हणाला, 'मित्रांनो, मद्यप्राशन जर केले तर ते मला सामान्यपणे पसंत आहे. मद्याने माणसाचा आत्मा आर्द्र होतो, आपल्या दुःखांना आंजारून गोंजारून ते निजविते आणि मैत्रीच्या, प्रेमाच्या भावना जागृत करते. पण वाढणाऱ्या वनस्पतींची जी गोष्ट असते तीच माणसाचीही असते असे मला वाटते. देवाने जर अती पाऊस पाडला आणि झाडांना चिकार पाणी मिळाले तर ती सरळ उभी राहू शकत नाहीत आणि वारा त्यांना आडवी पाडतो. पण त्यांना जरुरी असते तेवढेच पाणी जर त्यांना मिळाले तर ती ताठ, उंच वाढतात आणि मुबलक फळे धारण करतात. आपलेही तसेच असते. आपल्या चषकात आपण खूप मद्य ओतून घेतो, ते घटघटा पिऊन टाकतो आणि थोड्याच वेळात आपले शरीर आणि मन गरगरायला लागते आणि आपण असंबद्ध बडबडू लागतो. पण आपण लहान चषकांतून सावकाश मद्य पीत गेलो आणि सेवक आपले रिकामे होणारे चषक परतपरत भरत राहिले तर मद्य आपल्या वृत्ती हळूहळू खुलवत जाते आणि आपल्याला प्रसन्न वाटते.'

ह्या प्रवचनाचे सर्वांनी टाळ्या पिटून स्वागत केले.

मग तो तरुण पुढे आला. आपल्या वीणेच्या तारा त्याने त्या दुहेरी बासरीच्या सुराशी जुळविल्या आणि वीणा वाजवीत तिच्या साथीवर त्याने काही मधुर गीते म्हटली. एकजण म्हणाला की, 'सॉक्रेटिसने मद्याविषयी जे म्हटले होते ते संगीताविषयीसुद्धा सत्य आहे. ह्या तरुणांचे सुरेख रूप आणि संगीताचे सुस्वर ह्यांचा इतका सुंदर मिलाफ झाला आहे की आमच्या साऱ्या व्यथांना कुणीतरी हलक्या हाताने थोपटून निजविले आहे आणि कामदेवाच्या आराधनेचे विचार मनात संचार करू लागले आहेत.

मग गायक-नर्तक काही काळ विश्रांतीसाठी परतले. गप्पा सुरू झाल्या तेव्हा कुणीतरी अशी सूचना केली, की प्रत्येकाने त्याला स्वतःचा जो सर्वश्रेष्ठ गुण वाटतो आणि स्वतःजवळची जी सर्वांत मूल्यवान चीज वाटते ती मंडळींना सांगावी. हे संभाषण खूप वेळ रंगले. अनेकांनी अनेक मनोरंजक कल्पना व उपपत्ती पुढे मांडल्या, आणि त्या ओघात बरीच कुतूहलजनक माहितीही लोकांना झाली. उदा., एकाने असे सांगितले, की होमरच्या म्हणण्याप्रमाणे मद्य पिताना त्याची चव वाढवायला ते पिण्यापूर्वी कांदा खावा. ह्यावर कुणीतरी म्हणाले की निकोरोटॉसचे नुकतेच लग्न झाले आहे. तो आता नक्की कांदे खाईल कारण त्यामुळे मद्याची चव वाढली नाही तरी त्याचे चुंबन कुणी घेत नव्हते अशी त्याच्या बायकोची खात्री पटेल.

तासाभरात तो तरुण आणि त्याच्याबरोबरच्या दोन्ही मुली परतल्या. कुंभाराचे एक चाक आणण्यात आले आणि ते गरगर फिरत असताना ती नर्तिका त्याच्यावर कसरत करून दाखविणार होती. पण ह्या वेळी सॉक्रेटिसने एक सूचना केली. सायरेक्युसहून आलेल्या त्या गृहस्थाला तो म्हणाला, "मघाशी आमची चर्चा चालू असताना मी 'बुद्धिमान' आहे असे तुम्ही म्हणाला होता. ते कसेही असो, मला एक सूचना करावीशी वाटते. म्हणजे हा तुम्ही बरोबर आणलेला तरूण आणि ही मुलगी यांना कष्टही कमी पडतील आणि ते जे करीत असतील ते पाहून आम्हाला आनंदही अधिक होईल. धारदार तलवारीमधून कोलांट्या घेण्यात फार धोका असतो आणि म्हणून मेजवानीच्या प्रसंगी असे प्रयोग करण्यात औचित्य नसते असे मला वाटते. किंवा ह्या तरुण, देखण्या मुलांना आपल्या शरीरांना वेडेवाकडेपणे वाकविताना पाहण्यात मौज नसते. स्थिर, विश्रांत अवस्थेत त्यांचे दर्शन घेणेच अधिक सुखावह असते.'

'सॉक्रेटिस, तुमचे म्हणणे अगदी बरोबर आहे,' तो म्हणाला. 'मी आता असे एक दृश्य निर्माण करतो, की ते पाहून तुम्हाला मनापासून आनंद होईल.' तो तयारी करण्यासाठी आपल्या मंडळीला घेऊन आत गेला आणि मंडळीत एका विषयावर चर्चा सुरू झाली. शारीरिक प्रेम आणि आणि आध्यात्मिक प्रेम ह्यांच्यात नेमका भेद काय आणि त्यांच्यांत अधिक श्रेष्ठ कोणते? सॉक्रेटिसला परत एकदा दीर्घ प्रवचन करण्याची संधी मिळाली.

चर्चा संपत आली तेव्हा पहाट फुटू लागली होती. ऑटोलिकस रोजच्या मेहनतीचा भाग म्हणून पहाटे दूरवर चालायला जाई. तेव्हा तो आणि त्याचे वडील निघाले. पण जाण्यापूर्वी वडिलांनी सॉक्रेटिसकडे वळून त्याने मांडलेल्या अनेक उत्कृष्ट विचारांबद्दल त्याचे आभार मानले.

इतक्यात दालनात एक सुशोभित आसन मांडण्यात आले. मग त्या नटमंडळीचा प्रमुख पुढे आला आणि म्हणाला, 'सद्गृहस्थ हो ! हे ॲरिएड्नी आणि डायोनिसस ह्यांच्यासाठी खास राखून ठेवलेले मंदिर आहे. प्रथम ॲरिएड्नी प्रवेश करील आणि नंतर देवसभेत मद्यप्राशन केल्याने आरक्त झालेल्या नेत्रांचा डायोनिसस तिला येऊन भेटेल. आणि मग ती दोघे एकत्र क्रीडा करतील.'

ॲरिएड्नीने प्रवेश केला, आणि ती आसनावर स्थानापन्न झाली. डायोनिसस कुठे दिसत नव्हता, पण त्याच्या सान्निध्याची सूचना देणारे बासरीवरील बॅकिक संगीत ऐकू येऊ लागले. मग नटांनी जो अभिनय केला त्याचे प्रेक्षकांना अतिशय कौतुक वाटले. कारण ॲरिएड्नीने ते सूर ऐकल्याबरोबर तिला झालेला आनंद तिच्या मुद्रेवर पसरला. ती डायोनिससला भेटायला गेली नाही, आसनावरून उठलीही नाही पण आपल्या स्थानावर बसून राहणे तिला अवघड जात होते अशीच तिची चर्या दिसत होती. डायोनिससला तिचे दर्शन झाले तेव्हा तो नृत्य करीत तिच्या जवळ गेला आणि अतिशय प्रेमाने तिला आपल्या मांडीवर बसवून आपल्या बाहूंनी त्याने तिला कवटाळले आणि तिचे चुंबन घेतले. तिची मुद्रा सलज्ज, विनीत दिसत होती; पण तिनेही त्याला प्रतिआलिंगन देऊन तिचे चुंबन घेतले. प्रेक्षकांनी टाळ्यांचा कडकडाट केला. मग डायोनिसस उठला, त्याने हात देऊन ॲरिएड्नीला उठविले आणि एकमेकांचे चुंबन घेण्यात एकमेकांना कवटाळण्यात दंग असलेल्या प्रेमिक जोडप्याचे चित्र प्रेक्षकांना दिसले. डायोनिससचे पुरुषी देखणेपण आणि ॲरिएड्नीचे कोमल सौंदर्य खुलून दिसत होते. आता

त्यांच्या कृतीत अभिनयामुळे निर्माण होणारे विडंबन दिसून येत नव्हते; ती दोघे खरोखरच एकमेकांची चुंबने घेत होती. प्रेक्षकांना उत्साहाचे भरते येऊ लागले. डायोनिससने ॲरिएड्नीला 'तुझे माझ्या-वर खरोखरच प्रेम आहे का,' असे विचारलेले त्यांनी ऐकले आणि ॲरिएड्नीने हळूच 'हो' म्हणून शपथे-वर जे सांगितले तेही त्यांच्या कानी आले. आणि ते तिने इतके मनःपूर्वक सांगितले होते, की केवळ डायोनिससलाच नव्हे, तर सर्व प्रेक्षकांनाही त्या दोघांचे खरोखरच एकमेकांवर उत्कट प्रेम आहे अशी खात्री पटली. आता ती दोघे कोणत्या भूमिका वठवत नव्हती, त्यांच्या आयुष्याचा एक भाग प्रेक्षकांपुढे घडत होता. एकमेकांना दृढ आलिंगन दिलेल्या अवस्थेत त्यांना सोडून पाहुणे आता घरी परतायला निघाले. जे अविवाहित होते त्यांनी विवाह करण्याची शपथ घेतली आणि जे विवाहित होते त्यांच्या मनांत आपल्या पत्नीविषयीचे प्रेम स्फुरण पावू लागले. पण सॉक्रेटिस आणि कालियस लायकून तसेच त्याचा मुलगा ऑटोलिकस यांना गाठून त्यांच्याबरोबर फिरायला निघाले

मेजवानी संपली.

* * *

## व्हर्जिनिया ( १८ वे शतक ):

व्हर्जिनिया संस्थानाचा टाइडवॉटर हा भाग म्हणजे जमीन आणि जलप्रवाह यांचे मिळून बनलेले एक गुंतागुंतीचे जाळे आहे. चार प्रचंड नद्या–जेम्स, यॉर्क, रापाहॅनॉक आणि पोटोमॅक–त्याच्यातून वाहतात; भरतीबरोबर फोफावणाऱ्या ओहोटीबरोबर काहीशा कृश दिसणाऱ्या ह्या नद्यांना आडवेतिडवे अनेक फाटे फुटतात, टेम्सएवढ्या मोठाल्या उपनद्या त्यांना येऊन मिळतात. त्या काळी नांगराचा स्पर्श न झालेल्या भूमीवर औषधाला दगड, खडक आढळत नव्हता; जमीन कसदार होती हवामान सौम्य होते आणि पाऊस नियमित आणि भरपूर होता. काहीही पेरलेले उगवत असे, आणि काहीही उगवलेले तरारून वाढत असे. जमीन इतकी विपुल होती आणि झरे इतके मुबलक होते की, कुरणात घोडे, डुक्कर आणि गाई-बैल चरायला मोकळे सोडून देण्यात येत असत. त्यांची संख्या वाटेल तितकी फोफावे. अरण्यात आणि नदीकाठच्या जाळीतून वन्य पशूंचा आणि रानपक्ष्यांचा गजबजाट होता. रानटी बेरी, द्राक्षे, नट्स सगळीकडे आढळत. रेडइंडियन जमातींनी मका, बीन्स, बटाटे आणि युरोपला अपरिचित असलेल्या भाज्या यांची लागवड करून ह्या समृद्धीत भर घातली होती.

वसंत ऋतूत नद्यानाल्यांतून शाड आणि स्टर्जन माशांची एवढी दाटी असे, की कल्पना करवणार नाही. अक्षरशः लाखो माशांच्या थव्यांनी प्रवाह भरलेला असे. इतर प्रकारचे मासे आणि काल्व व खुबेही असेच मुबलक असत. युरोपमधल्या मोठ्यात मोठ्या कालवापेक्षाही मोठाली कालवं मिळत. कित्येक ठिकाणी ओहोटीच्या वेळी बादल्या भरभरून कालवं खरवडून काढता येत.

रेशमी, भरजरी असा हा समाज होता. तलवारींना सोन्याच्या मुठी असत, जोड्यांना चांदीची बकल्स लावीत. बाया फार्दिंगेल्स आणि पुरुष वर पावडर मारलेली विग वापरीत. कोच असत, निग्रो गुलाम असत आणि घरगुती नोकर लिव्हरी परिधान करीत. पाच हजार ते एक लाख एकरांच्या बागा (प्लँटेशन्स) मोठी गणली जात. रस्ते फारसे नव्हते आणि वहातूक नद्यांतून होत असे. मोठ्या बागांतून मळेवाल्यांनी बांधलेले मांगर नदीच्या काठाशीच असत आणि परदेशातून आलेली जहाजे आपला माल सरळ त्यांच्या वखारीत उतरवत आणि तंबाखूने भरलेली पिंपे जहाजावर चढवीत. ह्याने उतरविलेल्या मालाची किंमत तर भरून निघेच पण वर फायदा उरे. श्रीमंत मळेवाले आणि त्यांच्या बायका हिवाळ्याला सीझनसाठी लंडनला जात आणि त्यांचे मुलगे अनेकदा इंग्लंडमधील शाळांत शिकत.

विल्यमबर्ग ही राजधानी होती; तिसऱ्या विल्यमचे नाव तिला दिले होते. हे टुमदार गाव इंग्लंडमधल्या कुठल्याही परगण्यातल्या चांगल्या गावासारखे होते. गावामधून एक मैल लांबीचा 'ड्युक ऑफ ग्लाउस्टर स्ट्रीट' हा रस्ता जात होता, 'विल्यम आणि मेरी' हे नाव दिलेले कॉलेज गावात होते, आणि अर्थात् कॅपिटॉल आणि न्यायालय आणि गव्हर्मेंट हाउस हीही गावात होती. एका बादशाही प्रवृत्तीच्या गव्हर्नरने गव्हर्मेंट






हाउस इतक्या डामडौलाने सुशोभित केले होते आणि खर्चासाठी इतके भक्कम कर लोकांवर लादले होते की रागावलेल्या करदात्यांनी त्याचे नाव 'गव्हर्नरचा राजवाडा' असे ठेवले. ह्या सगळ्या इमारतींवर राणी ॲनच्या राजवटीतील 'ग्रँड युनियन' झेंडा फडफडत असे.

विल्यम्सबर्ग हे सरकारी आतिथ्याचे केंद्र होते. वर्षाचा बहुतेक भाग ते एखाद्या सुभ्याचे मुख्य ठाणे असलेल्या गावासारखे असे; पण 'सार्वजनिक प्रसंगांच्या' वेळी ते राजधानीचा रुबाब मिरवू लागे काही खास समारंभ, राजाराणीचे वाढदिवस आणि विशेषतः वसंत आणि शरद ऋतूंत जेव्हा असेंब्ली आणि दरबार दोनदा भरत ते प्रसंग म्हणजे सार्वजनिक प्रसंग. अशा वेळी आतिथ्याच्या भाराने प्रत्येक अधिकाऱ्याची पैशांची थैली रिकामी होत असे– विशेषतः गव्हर्नरची. गव्हर्नर गूचने आपल्या भावाला लिहिलेल्या काही पत्रांतून आपली भीती वारंवार व्यक्त केली होती. ज्या इतमामाने आपण जगत आहोत त्याच्यामुळे म्हातारपणी आपल्याला सुस्थितीत निवृत्त होता येणार नाही आणि सहा घोड्यांच्या कोचमधून आपण जे आता फिरतो त्याच्या ऐवजी पायी चालावे लागेल अशी त्याची भीती होती.

कुलॉडोनच्या विजयामुळे असा उत्सव साजरा करण्याचा प्रसंग प्राप्त झाला. १८ जुलै १७६४ मध्ये व्हर्जिनियात ही बातमी आली :

...... संध्याकाळी खूप गृहस्थ आणि स्त्रिया कॅपिटॉलवर जमल्या; बॉलडान्सला सुरवात झाली. नाचात काही काळ घालविल्यावर मंडळी रात्रीच्या खाण्यासाठी आत गेली. तीन वेगळ्या खोल्यांत, तीन टेबलांवर सुरेख खाद्यपदार्थ रचण्यात आले होते. सुमारे शंभर शंभर पक्वान्ने होती आणि कितीही चोखंदळ असलेल्या माणसाच्या पसंतीस तो उतरतील अशी ती रुचकर होती. अनेक प्रकारची अगदी निवडक आणि उत्कृष्ट मद्ये पुरविण्यात आली होती. 'राजाला आरोग्य–दीर्घायुष्य लाभो' म्हणून मद्य प्राशन करण्यात आले. मग प्रिन्स आणि प्रिन्सेस ऑफ् वेल्स, ड्यूक आणि राजघराण्यातील इतर मंडळी, मग गव्हर्नर, मग राजाच्या सैन्याला विजय लाभो म्हणून, मग व्हर्जिनियाची भरभराट होवो म्हणून, आणि मग राजनिष्ठेने प्रेरित झालेल्या अनेक प्रार्थना सफल व्हाव्या म्हणून अतिशय आनंदाने मद्य प्राशन करण्यात आले. प्रत्येक प्रार्थना-प्राशनाच्या वेळी तोफांची सलामी देण्यात येत असे. ह्यासाठी कॅपिटॉलला खास तोफा आणण्यात आल्या होत्या आणि प्रत्येक सलामीला अठरा ते वीस गोळे उडविण्यात आले. समारंभ रात्री दोन वाजेपर्यंत चालला आणि अतिशय सभ्यपणे आणि सुव्यवस्थित रीतीने पार पडला. जमलेल्या मंडळीचे चेहरे त्यांना मनापासून झालेल्या आनंदाने झळकत होते. गावातल्या सर्व घरांवर रोषणाई केली होती आणि बाजारच्या चौकात मोठी होळी पेटविण्यात आली होती. लोकांना तीन हॉग्जहेड्सभरून पंच वाटण्यात आला. लोकांचा आनंद आणि निष्ठा ओसंडत असतानाच हा समारंभ संपला.

विल्यम्सबर्गमध्ये जे घडायचे ते टाइडवॉटरमध्ये इतरत्र सर्वत्र थोड्याअधिक प्रमाणात घडायचे. पाहुणचार मेजवान्या सतत झडायच्या आणि पिणे फार मोठ्या प्रमाणावर, इंग्लंडपेक्षा कितीतरी जास्त चालायचे; आणि इंग्लंडही फारसे शुष्क नव्हते. ह्याचे एक कारण अर्थात हे होते की देशात समृद्धी होती. एका इंग्लिश प्रवाशाने असे लिहिले आहे, की ह्या देशात शेतकरी म्हणून पाचशे पौंडावर मी कितीतरी अधिक चांगले जीवन कंठू शकलो असतो आणि पैसाही खूप केला असता अशी माझी खात्री आहे. इंग्लंडमध्ये माझ्या गाठी दोन हजार पौंड असते, तरीही हे जमले नसते. शिवाय टाइडवॉटरच्या सखल भागात तापाने लोक बेजार असत आणि मद्य हा तापावरील परिणामकारक प्रतिबंधक उपाय आहे असा लोकांचा विश्वास होता. प्लँटरमंडळी भल्या पहाटे उठून सकाळच्या थंड प्रहरी घोड्यावरून सबंध मळ्यातून एक फेरी मारून यायची, तेव्हा निघण्यापूर्वी कित्येक दीर्घ घुटके घेऊन शरीरात जोम आणायची प्रथा होती. उकाड्याने हैराण करणाऱ्या दुपारी संपता संपत नसत आणि जीवघेणी तहान शमविण्यासाठी पेयाचा आश्रय घेण्यावाचून गत्यंतर नसे.

पण व्हर्जिनियाच्या प्लँटरचे वर्तन सर्वसाधारणपणे वर वर्णन केलेल्या समारंभासाठी असलेल्या मंडळी-सारखे सभ्य आणि सुव्यवस्थित असे. सद्‌गृहस्थाने मद्य प्यावे पण सद्‌गृहस्थाला साजेशा रीतीने ते पचवावे अशी अपेक्षा होती. झिंगून बेहोष झालेला सद्‌गृहस्थ क्वचित्‌च आढळे. जॉन इव्हलिनने दोन मेजवान्यांचे असे वर्णन केले आहे, की पाहुणे टेबला-खाली घरंगळत जाईपर्यंत त्यांना मद्य पुरवीत जायचे अशी आज्ञा यजमानाने त्या प्रसंगी केली होती. अशा प्रकारचा प्रसंग व्हर्जिनियाच्या बाबतीत नमूद केलेला आढळत नाही.

टाईडवॉटर व्हर्जिनिया इंग्लंडपेक्षा लहान होते आणि लोकसंख्याही कमी होती. त्यामुळे कुणी अनोळखी नसे. विल्यम्सबर्ग लंडनसारखे मोठे शहर नव्हते, ते एक लहान गाव होते. गर्दीत घुसून लपण्याची सोय नव्हती. प्रत्येकाला सर्वजण गव्हर्नर-पासून तो सर्वांत खालच्या नोकरापर्यंत सर्वजण ओळखीत. शिवाय प्रत्येक सद्‌गृहस्थावर लोकांना उदाहरण घालून द्यायची जबाबदारी असे. तो केवळ एक शेतकरी मळेवाला नसे; तो व्यापारी 'बिझिनेसमन'ही असे आणि कुणाही इंग्लिश स्क्वायरसारखा तो एक सार्वजनिक सेवक असे. स्क्वायर ज्याप्रमाणे मॅजिस्ट्रेटच्या बेंचवर किंवा हाउस ऑफ कॉमन्समध्ये आपले स्वाभाविक स्थान सुशोभित करी तसा व्हर्जिनियाचा प्लँटर असेंब्लीत किंवा कौन्सिलमध्ये सहभागी होई. तंबाखूच्या शेतीसाठी खूप मजूर लागत असल्यामुळे त्याला मजूर खूप संख्येने बाळगावे लागत आणि ते बहुधा निग्रो असत. १७४० मध्ये व्हर्जिनियात गोऱ्या माणसांपेक्षा निग्रो अधिक होते.

ह्या निग्रो मजुरांना पिण्यापासून दूर कसे ठेवावे हा मळेवाल्यांपुढील एक मोठा प्रश्न होता. एकदा तर खुद्द राजप्रतिनिधी असलेल्या गव्हर्नरने आपल्या नोकरांशी असा सौदा केला होता, की राणीच्या वाढदिवसासाठी म्हणून तो जी मेजवानी देत होता त्यावेळी कुणीही नोकराने पिऊन यायचे नाही आणि त्याच्या बदल्यात दुसऱ्या दिवशी त्यांना कितीही प्यायची मोकळीक राहील. विल्यम बिर्ड (दुसरा) हा वेस्टोव्हर ह्या प्रचंड प्लँटेशनचा मालक होता. त्याच्या घरी काम करणाऱ्या मुली जेव्हा त्याची रम चोरीत आणि बाटलीत पाणी भरून ठेवीत तेव्हा तो त्यांना चोप देत असे. त्याच्या वडिलांनी वेस्टइंडीजहून अमाप रम आयात करून मिळविलेली संपत्ती वारसाने त्याच्याकडे आली होती. पण स्वस्त रममुळे निग्रो मजुरावर जे परिणाम होत होते ते त्याला नापसंत होते.

पण विल्यम बिर्ड (दुसरा) हा एक अतिशय सुसंस्कृत आणि त्यावेळचा नामवंत असा सद्‌गृहस्थ होता आणि दारूबंदी करणे त्याला असंस्कृत वाटले असते. त्याचे शिक्षण इंग्लंडमध्ये झाले होते, तो मिडल टेंपलचा बॅरिस्टर होता आणि रॉयल सोसायटीचा सदस्यही होता. व्हर्जिनीया कौन्सिलचाही तो सभासद होता आणि अखेरीस त्याचा तो अध्यक्ष बनला. सॅम्युएल पेपिसप्रमाणेच खूप वर्षे त्याने शॉर्टहँडमध्ये एक दैनंदिनी राखली होती.

सपाटून पिण्यात बिर्डचा हात धरू शकतील असे फारच थोडे होते; पण आपल्या दैनंदिनीत एके दिवशी घडलेले जे प्रसंग त्याने नमूद केले आहेत त्यावरून मद्य पिण्याविषयीची त्यांची वृत्ती स्पष्ट होते. '....पार्सन आणि मी योग्य वेळी आणि व्यवस्थितपणे परतलो; पण माझा नोकर टॉम याने सभ्य गृहस्थाच्या घरी दारू पिऊन बेहोष पाहुण-चाराच्या नियमांचा भंग केला. जिचे वैवाहिक जीवन दुःखी होते अशी एक सभ्य स्त्री फार पीत असे, असे जेव्हा त्याला आढळून आले तेव्हा त्याला नवल वाटले असे त्याने नमूद केले आहे. पण तिचे नातलग 'ती स्वतःचे सांत्वन करीत आहे ह्या नावा-खाली ही गोष्ट दडवितात.'

'टोस्ट' करण्याच्या प्रथेमुळे अनेकदा कसोटी लागायचा प्रसंग येत असे कारण कुणी ना कुणी कुणासाठी 'टोस्ट' पिण्याचे ग्लास संपेपर्यंत पिण्याचे–आवाहन करीत असे. सोनेरी नालाच्या नाइट्‌सची–Knights of the Golden Horse Shoe–हकिकत वाचली तर ही प्रथा किती दृढमूल झाली याचे उदाहरण मिळते. एका गव्हर्नरने व्हर्जिनियाच्या पश्चिमेकडील पर्वतांचा शोध घेण्यासाठी संघटित केलेल्या मोहिमेत रेंज-










र्सच्या दोन तुकड्या आणि चार इंडियन स्काउट्स यांच्याबरोबर जे दहा सद्‌गृहस्थ सामील झाले होते, त्यांना गव्हर्नरने हा किताब दिला होता. टाइड-वॉटरच्या प्रदेशात दगडच सापडत नसल्याने घोड्यांना नाल लावायचे कारण नसे; पण ह्या मोहिमेत खडबडीत प्रदेशातून माग काढीत जाणे आवश्यक असल्यामुळे घोड्यांना खास नाल लाव-ण्यात आले होते. मोहिम संपल्यावर गव्हर्नरने ह्या प्रत्येक सद्‌गृहस्थाला तिच्या स्मरणार्थ एक सोन्याचा नाल दिला.

पश्चिमेच्या दिशेने इंडियन्सच्या टोळचांच्या ह्या दुर्गम प्रदेशातून प्रवास करण्यासाठी जी रसद घेतली होती तिच्यात व्हर्जिनिया वाइन्– पांढरी आणि लाल अशा दोन्ही– आयरिश व्हिस्की, ब्रँडी श्रब, दोन प्रकारची रम, शांपेन, कॅनरी, चेरी पंच आणि सायडर यांची अनेक पिंपे होती.

आपालाशियन्स पर्वताच्या अगदी शिखरावर जेव्हा टोळी पोचली तेव्हा सर्वांत उंच शिखराला राजाच्या नावावरून 'माउंट जॉर्ज' असे नाव, देण्यात आले. राजाच्या आरोग्याप्रीत्यर्थ आम्ही मद्य प्यालो आणि मग राजकुटुंबाच्या आरोग्या-प्रीत्यर्थ प्यालो. दुसऱ्या दिवशी त्यांनी श्नेनाण्डो ही रुंद नदी पार केली. ही अवघड कामगिरी होती. गव्हर्नरने पलीकडची सर्व भूमी राजाच्या नावाने खालसा केली. हा मोहिमेचा परमोच्च बिंदू होता आणि तो समारंभपूर्वक साजरा करण्यात आला.

'आम्ही छानदार जेवण केले,' बखरकार लिहितो 'आणि मग सर्व माणसांना एकत्र केले, त्यांच्या बंदुका भरल्या, राजाच्या आरोग्याप्रीत्यर्थ शांपेन प्यायलो आणि बंदुकीची फैर झाडली; मग राजकन्येच्या आरोग्याप्रीत्यर्थ बर्गंडी प्यायलो आणि फैर झाडली; मग राजकुटुंबातील इतर मंडळीच्या आरोग्याप्रीत्यर्थ क्लॅरेट प्यायलो आणि फैर झाडली; मग आम्ही गव्हर्नरच्या आरोग्या-प्रीत्यर्थ प्यालो आणि आणखी एक फैर झाडली.'

टाइडवॉटरमधील प्रासाद आणि मद्याची सुरेख सेलर्स दूर एकाकी अरण्यात असत. त्यांच्याकडे पोचायचे तर होडीतून किंवा रानावनातून जाणाऱ्या खडबडीत, धुळीने माखलेल्या रस्त्यांनी प्रवास करावा लागे. लहानपणी ऐकलेल्या परीकथांत राक्षसांचे किंवा पऱ्यांचे किल्ले दुर्गम अरण्यात असत त्यांची आठवण करून देणारे हे प्रासाद होते. इंग्लिश कंट्रिहाउसेसपेक्षा ते लहान असत, पण वर-पासून खालपर्यंतच्या सर्व खोल्यांतून कुटुंबीय आणि त्यांचा परिवार रहात असे. स्वयंपाकघर सोडले तर प्रत्येक खोलीत एकतरी पलंग आणि बिछायत असे. नोकरमंडळी ह्या मोठ्या घराच्या सभोवती अस-लेल्या, त्यांच्यासाठी बांधलेल्या खोपटातून रहात असत.

एकमेकांना भेटी देणे हा आवडता छंद होता. अठराव्या शतकाच्या मध्यापर्यंत टाइडवॉटरमध्ये जवळजवळ तीनशे प्रतिष्ठित कुटुंबे स्थिरावली होती. विवाहसंबंधांनी एकमेकांशी दृढपणे जोडल्या गेलेल्या ह्या कुटुंबांचा मिळून समाजातला उच्चवर्ग बनला होता. ते शासक होते प्रतिष्ठित व्यक्तीचा कुणाही इतर प्रतिष्ठत व्यक्तीशी जवळचा नात्याचा संबंध असल्यामुळे भेटीगाठी पूर्णपणे अनौपचारिक असत. प्रवासाला प्रारंभ केल्यावर तो कसा व कधी संपेल आणि मुक्कामाला कधी पोहोचता येईल हे अनिश्चित होते आणि जलदीने निरोप पोचवणे अशक्य होते. ह्यामुळे पाहुण्यांचे अनपेक्षितपणे होणारे आगमन ही नित्याची गोष्ट बनली होती. लोक घोडागाडीतून किंवा घोड्यावरून येत, घोड्यांना तबेल्यात पाठवून देत आणि सरळ घरात शिरत आणि पाहुणे म्हणून त्यांचे स्वागत होई. ते आठवडाभर रहात, मग दुसऱ्या मळ्याकडे मोर्चा फिरवीत. घरापासून ते असे महिनामहिना दूर असत.

एका प्लँटेशन–हाउसमध्ये ख्रिस्टमस घालविलेल्या एका फ्रेंच माणसाने आपले अनुभव नमूद करून ठेवले आहेत. त्याच्या यजमानाने आणि इतर पाहुण्यांनी अचानक असे ठरविले, की आपण मळ्या-तील शेते, बागा पाहू आणि शेजारच्या प्लँटरच्या घराला भेट देऊ.

...... तेव्हा कर्नल फिकसच्या घरी घोड्या-वरून दौडत आम्ही गेलो. आम्ही वीसएक मंडळी होतो पण त्याचे कुटुंब आणि नोकरचाकर मिळून एवढा मोठा परिवार होता, की त्याला अडचण अशी

काही वाटलीच नाही. आम्हा सर्वांसाठी बिछाने पुरविण्यात आले. एका बिछान्यावर दोघादोघांना निजावे लागले. आमचे आदरातिथ्य त्याने मोठ्या इतमामाने केले. उत्कृष्ट वाइन आणि इतर पेये आमच्या सेवेला हजर होती. अर्थात् आम्ही मद्यपानाची मौज चाखीत खूप वेळ काढला. त्याने तीन फिडल वाजविणारे, एक सोंगाड्या एक दोरीवरून खेळ करणारा डोंबारी, एक जमिनीवर कसरत करणारा डोंबारी ह्यांना बोलावून घेतले. आमची हवी तेवढी करमणूक झाली. थंडी अतिशय होती पण कुणालाही शेकोटीजवळ जायचे कारण नव्हते. कारण एका वेळेला एक गाडीभर लाकडे शेकोटीत जाळण्यात येत होती आणि सबंध खोली उबदार रहात होती ... दुसऱ्या दिवशी आम्ही दुपारपर्यंत मद्यपान केले आणि नदी ओलांडून पैलथडी जायचे ठरविले. कर्नलने बरेचसे मद्य आणि आपला एक पंचबोल आम्हाला भेट म्हणून दिला आणि आपली होडी आम्हाला वापरायला दिली.

अर्थात ह्याशिवाय नेहमीची कौटुंबिक स्नेहसंमेलने आणि मेळावेही असत आणि ते अनेक दिवस चालत. बॉल, कोंबड्यांच्या झुंजी, घोड्यांच्या शर्यती आणि घराच्या मागील भागातील खोलीत अखंड चाललेला पत्त्यांचा डाव ह्यांनी दिवस गजबजून जात. जेवण साधारणपणे दुपारी चार वाजता असे. ' पिण्यासाठी अनेक प्रकारच्या वाइन्स लेमन पंच, टॉडी, सायडर, पोर्टर, इ. असत. नाचगाणी, संगीत ह्यांनी परिसर निनादत असे. स्त्रिया थाटामाटाचा पोषाख करीत आणि नाचताना मागे जमिनीवर लोळणारे त्यांचे रेशमी गाउन्स सळसळत.'

विवाहानिमित्त किंवा अंत्ययात्रेनिमित्त दूर अंतरावरून येणाऱ्या पाहुण्यांची उत्तम सरबराई राखण्यात येत असे. १६६७ मधल्या एका अंत्ययात्रेच्या हिशोबात अशी नोंद आढळते : २५ गॅलन बिअर, २२ गॅलन सायडर, ब्रँडीचे ५ गॅलन आणि ५ पौंड साखर खर्च झाली.

जेवणाच्या वेळी घेण्यात येणारी हरतऱ्हेची मद्ये पाहिली तर विशिष्ट प्रकारच्या खाद्यपदार्थांबरोबर विशिष्ट मद्य घेतले पाहिजे असे काही संकेत नव्हते असे आढळते. इंग्लंडप्रमाणेच व्हर्जिनियामध्ये परदेशी मद्याविषयी अधिक रुची होती आणि मळेवाल्यांच्या सेलर्सप्रमाणेच रस्त्यावरील टॅव्हर्न्स आणि इन्समध्ये परदेशी मद्यांचा भरपूर साठा असे. याशिवाय व्हर्जिनिया बिअरची पिपे, सायडर आणि पेरी, मीड, पीच ब्रँडी, कार्डियल आणि घरगुती भट्टयांवर बनविलेली इतर मद्ये ब्रेडइतक्याच मुबलक प्रमाणावर उपलब्ध असत.

किंमतीवरून लोकांच्या अभिरुचीची कल्पना करता येते. इन्स आणि टॅव्हर्न्समध्ये किंमती कायद्याने निश्चित केलेल्या असत. व्हर्जिनियाची बियर क्वार्टला दोन पेनी एवढ्या किंमतीला मिळे. मडिरा वाईनचा भाव दोन शिलिंगाला एक क्वार्ट असा होता आणि क्लॅरेटची किंमत जवळ जवळ ह्याच्या दुप्पट होती.

गहू, बॅरल बनविण्यासाठी आवश्यक असलेले लाकूड आणि व्हर्जिनियातील इतर पैदास यांच्या बदल्यात मडिराची आयात होत असे. एखाद्या वेळी प्लँटर्सचा एखादा गट एक जहाज भाड्याने घेई, त्याच्यात गहू, मका, लाकडाच्या फळ्या भरून ते मडिराला पाठवून देई आणि त्याच्या बदल्यात मद्य घेऊन ते जहाज परत येई.

त्या काळात मडिरा वाइनमध्ये ब्रँडी घालून ती ' भक्कम ' करण्यात येत नसे. म्हणजे तिच्यातील मद्यार्काचे प्रमाण १२% ते १५% असे. आज ते १८% असते. थंडीमुळे घूसर बनून जर मडिरा वाइन बिघडली तर गरम केल्याने ती परत स्वच्छ होत असे हे अनेकांना, उदा. विल्यम बिर्ड (दुसरा) याला चांगले माहीत होते. ' ही वाइन बिघडते ती मुख्यतः थंडीने, पण बिघडली तरी कडकडीत उन्हात थोडे दिवस गरम केल्याने तिचे पहिले रूप तिला पूर्णपणे परत प्राप्त होते. इतर मद्यांचे असे नसते ' असे त्याने म्हटले आहे. निकोप असलेली मडिरा जर उबदार ठिकाणी साठवून ठेवली, तर अतिशय चांगली राहते असेही त्याने नमूद केले आहे. इतर कोणतीही वाइन मडिराइतको टिकून राहत नाही अशी वस्तुस्थिती आहे; पण ही माहिती लाभायचा प्रसंग त्याच्यावर बहुधा आला नसेल.

टॉमस जेफरसन खाद्यपेयांचा चोखंदळ रसिक म्हणून प्रसिद्ध होता. एका राजकीय प्रतिस्पर्ध्याने








आपल्या एका भाषणात जेफरसनने 'स्वदेशी अन्नाचा आणि पक्वान्नांचा त्याग' केल्याबद्दल आणि "साध्यासुध्या, घरगुती 'रोस्ट-बीफ'शी बेइमान झाल्याबद्दल" त्याचा निषेधही केला होता. फ्रान्समध्ये १६ व्या लुइच्या दरबारी अँम्बॅसडर म्हणून पाच वर्षे घालवून जेफरसन जेव्हा परतला तेव्हा ह्या प्रसिद्धीला आणि टीकेला सुरवात झाली.

जेफरसनला चित्रविचित्र, अनवट, सूक्ष्म, तरल रुचीचे पदार्थ आवडायचे. मद्य ही त्याच्या दृष्टीने एक जीवनावश्यक गोष्ट होती. व्हिस्की त्याला अजिबात पसंत नसे. कुणाही फ्रेंच माणसासारखे त्याचेही मत असे होते, की 'ज्या देशात वाइन्स स्वस्त असतात तो देश दारुडा बनत नाही.' सायडर आणि चांगली वेस्ट इंडियन रम ही मद्ये त्याच्या अतिशय आवडीची होती. ब्रिटिशांनी जेव्हा रिचमंड गाव जिंकून घेतले तेव्हा जेफरसनचे सेलर भरगच्च भरलेले होते आणि बारा वर्षे जुनी असलेल्या अँटिग्युआ रमचा मुबलक साठा त्याच्यात होता. ब्रिटिशांनी सर्व सेलर पिऊन फस्त केले. पण जेफरसनचा एक गुलाम आयझॅक ह्याने मागाहून म्हटल्याप्रमाणे 'प्यायल्यामुळे जेफरसनमध्ये कधी काही बदल घडून आला असे कुणाच्या ऐकिवात नाही.'

जॉर्ज वॉशिंग्टनची पसंती क्लॅरेटकडे झुकत होती यात काही शंका नाही. मार्क्विस द शातेल्यु ह्याने जेव्हा त्याला एक क्लॅरेटचा सबंध कास्क दिला तेव्हा तो अतिशय संकोचून गेला. 'ह्यातून माझी सुटका तुम्ही एकाच मार्गाने करू शकाल. चांगल्या क्लॅरेटचा ग्लास प्राशन केल्यामुळे न चुकता जो उल्हास लाभतो त्याच्यात वारंवार सहभागी होण्याचे वचन तुम्ही दिले पाहिजे.'

पण तंबाखूची अतिरेकी लागवड केल्याने टाईडवॉटरच्या जमिनीचा कस कमी होत गेला, आणि हे सुवर्णयुग संपत आले. अनेकांचे डोळे पश्चिमेकडे लागले. मातबर प्लँटर्सना जुन्या पद्धतीच्या पाहुणचाराचा भार सहन करणे अधिकाधिक कठीण होऊ लागले. शिवाय आतापावेतो नद्या रहदारीचे प्रमुख मार्ग उरले नव्हते. जमिनीवरून प्रवास करणे आता अधिक सोपे बनले होते. रस्ते अजून कच्चे, धुळीने माखलेले होते खरे; पण लांब वळणे घेऊन ते घोडागाड्यांना उथळ भागांकडे आणून सोडीत. येथे गाडी पात्रातून जाऊ शकत असे किंवा तराफ्यांवरून त्यांना पैलथडी नेण्यात येत असे. व्हर्जिनियन्स सामान्यपणे सहा घोड्यांच्या गाड्यांतून प्रवास करीत, वेग ताशी आठ–नऊ मैल असे आणि अनेकदा भोजनासाठी म्हणून साठ-साठ मैल अंतरावर ते जात.

जॉर्ज वॉशिंग्टनचे घर माउंट व्हर्नॉनला होते आणि गृहस्थाच्या खाजगी, साध्या, घरगुती जीवनाची त्याला आवड होती. राष्ट्राध्यक्ष झाल्यावर आपले माउंट व्हर्नॉनचे घर म्हणजे खूप मंडळी वसतीला येणाऱ्या एखाद्या पथिकाश्रमासारखे बनले आहे असे त्याने खिन्नपणे म्हटले आहे. जेफरसनची स्थितीसुद्धा अशीच झाली. एकावेळी पन्नास अनपेक्षित पाहुण्यांना जेवणे वाढून वाढून तो थकला. पाहुण्यांनी त्याच्या घरी जेवून जेवून त्याला त्याच्या घरातूनच बाहेर घालविले असे म्हणावे लागते. त्याने माँटिसेलो ह्या आपल्या मूळ गावाहून शंभर मैल अंतरावर स्वत:साठी एक दुसरे घर बांधले. पाहुणचाराच्या भारापासून सुटका करून घेण्यासाठी तो तेथे वर्षातून तीनचारदा जाऊन रहात असे.

चॅथॅमच्या फिट्झ ह्यू ह्या जमीनदाराचीही गत अशीच झाली. दक्षिणोत्तर जाणाऱ्या, वर्दळीच्या प्रमुख मार्गाजवळ त्याचे घर होते आणि अनेक संपन्न कुटुंबांत त्याची नातीगोती होती. घोडागाडीतून प्रवास करणारे कुणीनाकुणी त्याला नेहमी भेटायला येत असत. त्याच्या सदैव उघड्या असलेल्या दरवाजातून येणारा जाणारा प्रवाह कधीच थांबत नव्हता. ह्या पाहुणचाराने तिजोरी रिती होईल हे अखेरीस जेव्हा त्याच्या ध्यानात आले तेव्हा त्याने दूर रानात एक घर बांधले आणि तेथे तो निवांतपणे आणि नेमस्त खर्चात राहू लागला. जॉर्ज वॉशिंग्टनला त्याच्या पहिल्या घराची जशी आठवण राहिली तशी अनेकांना राहिली असणार. 'चॅथॅमच्या तुमच्या घरी तुमच्या महॉगनी टेबलाशी पाय ताणून मी जितक्या वेळा बसलो आहे तितक्यांदा जगात दुसरीकडे कुठेही बसलेलो नाही; आणि तुमच्या सुग्रास जेवणाचा, सुरेख मद्यांचा आणि सोबतीला असलेल्या पाहुण्यांच्या प्रसन्न संगतीचा

जितका आस्वाद घेतला आहे तितका दुसऱ्या कशाचाही घेतलेला नाही.' जुन्या मित्राकडून ह्यापेक्षा अधिक भावपूर्ण शब्दांची अपेक्षा कुणाला धरता येणार नाही. एका प्रवाशाने अठराव्या शतकातील व्हर्जिनियन्सविषयी म्हटले होते ते सत्य होते, 'त्यांचे आनंदी सहजीवन त्यांच्याच वसंत ऋतूसारखे होते, जितके उबदार तितकेच कांतिमान्.'

* * *

## ऑक्सफर्ड (१९२१-२४):

माझ्या लहानपणी आम्हा मुलांना अधून-मधून कधीकाळी जेव्हा मद्य देत तेव्हा ती मोठी अप्रूपाची गोष्ट असे. मद्य घेणे हा प्रौढांचा अधिकार असे आणि अगदी खास प्रसंगी आम्हाला त्याच्यात सहभागी करीत. शाळेत मद्य पिणे; हे तंबाखू जसा निषिद्ध मानण्यात येत असे, तसे निषिद्ध नव्हते. हाउसमास्टर्स वरच्या वर्गातील मुलांसाठी मधून-मधून सौम्य 'ग्रॉग' बनवीत. एका सणाच्या दिवशी, संबंध दिवस सुट्टी असताना माझा एक सोबती गावातल्या एका हॉटेलात लिक्युअर्स पिऊन झिंगून आला होता. ते दृष्य पाहून माझी झालेली चमत्कारिक अवस्था मला अजून आठवते. मी विद्यापीठात गेलो तेव्हा मद्य प्यायला लागलो. दारू पिऊन झिंगून जाण्यासाठी मजा आणि वेगवेगळ्या मद्यांच्या विशिष्ट चवी चाखण्यातील मजा ह्यांमधील भेद मला समजायला लागला. बरीच वर्षे मला पहिल्या प्रकारची मजा अधिक पसंद असे.

ऑक्सफर्डमधील माझी पिढी (१९२१-१९२४) ही एकोणिसाव्या शतकातील सामाजिक प्रथा बऱ्याच प्रमाणात जशाच्या तशा टिकवून धरणारी शेवटची पिढी होती, अशी माझी कल्पना आहे. पहिल्या महायुद्धात सैनिक म्हणून लढलेली आणि युद्ध संपल्यावर ऑक्सफर्डला शिक्षणासाठी आलेली मंडळी शिक्षण आटोपून परतली होती. शेतांनी वेढलेले बाजाराचे गाव हे ऑक्सफर्डचे स्वरूप अजून टिकून होते. फारच थोड्या विद्यार्थ्यांच्या मोटारी होत्या. गावात मुली फारशा दिसत नसत. टर्म चालू असताना रात्रीकरता परगावी जाण्याची प्रथा नव्हती. आमच्या नंतरच्या पिढीने लंडनशी जवळचे संबंध जडवून घरले होते, मुली मोटारीतून ऑक्सफर्डला वारंवार येऊ लागल्या विद्यार्थी मोटारीने परगावी जाऊ लागले. कॉक्टेल्स ढवळण्याच्या काचेच्या सळया ग्लासात किणकिणू लागल्या, ग्रामोफोनमधून जाझ संगीत निनादू लागले. कॉली कारखान्याने गावाला वेढून टाकले. पण मी ऑक्सफर्डला होतो तेव्हा आमचे जीवन विद्यापीठांच्या तटात बंदिस्त होते. आमच्या वडिलांची पिढी ऑक्सफर्डला जे जीवन जगली जवळजवळ तसेच जीवन काही काळ आम्हीही जगलो. हा आनंदाचा, उल्हासाचा काळ होता पण तो टिकून राहणे अशक्य होते. बिअर हे आमचे नेहमी प्यायचे मद्य होते. हे मी साधारण स्थितीतल्या विद्यार्थ्याविषयी म्हणत आहे. काही थोडे श्रीमंत विद्यार्थी होते आणि ते खूप शॅम्पेन आणि व्हिस्की पीत. काही गरीब विद्यार्थी होते आणि ते कोको पिऊन दिवस काढीत अशी आख्यायिका होती. माझ्यासारखा साधारण स्थितीतला विद्यार्थी दर टर्मला शंभर पौंड खर्च करी आणि तीन वर्षांच्या अभ्यासक्रमाच्या अखेरीस तीनशे पौंडांचे कर्ज करून ठेवीत असे. दुपारचा लंच विद्यार्थ्यांच्या खोल्यांतून वाढण्यात येत असे. सोबत बिअरचे जग्ज असत. संध्याकाळी विद्यार्थी जेथे एकत्र जेवीत त्या दालनात बिअर नेहमी पिण्यात येत असे. माझ्या कॉलेजमध्ये 'स्कान्सिंग'ची प्रथा असे. म्हणजे कोणी शिष्टाचाराचा भंग केला- उदा० एखाद्या स्त्रीचा नामनिर्देश केला किंवा परभाषेतील एखादे वचन उद्धृत केले- तर दंड म्हणून त्या टेबलावर जेवणाऱ्या सर्वांना त्याला बिअर द्यावी लागे. काही दिवस सकाळी ब्रेकफास्टबरोबर मी बिअरचा एक टँकार्ड पीत असे. असे करणारा मी एकटाच होतो. पण ही बिअर मला पुरवितांना काही कुरकूर झाली नाही.

माझ्या कॉलेजचे डीन-प्राचार्य सपाटून पीत आणि भिंतींशी चाचपडत कॉमन-रूममधून आपल्या खोलीकडे जाताना ते अनेकदा दिसत. 'बंप-सपर्स' आणि 'स्मोकर्स' हे प्रसंग साजरे केले जात तेव्हा सबंध कॉलेजच्या कॉलेज मद्योत्सवात रंगून जाई. माझ्या कॉलेजच्या पहिल्या वर्षी नवीन मुलांसाठी म्हणून एक पार्टी देण्यात येत असे. तिला 'फ्रेशर्स-ब्लाईंड' म्हणत. पार्टीत विद्यार्थी पिऊन धुंद होत. आणि बहुतेकजणांना दुसऱ्या दिवशी आजारी पडावे लागे. पण कॅनडा, ऑस्ट्रेलियामधून आलेल्या कित्येक विद्यार्थ्यांनी इतका दंगा केला की ही प्रथा

बंद करावी लागली. कॉलेजच्या 'बटरी' मधून सर्व प्रकारचे मद्य विद्यार्थ्यांना मिळू शकत असे पण आमच्या साप्ताहिक खाद्यपेयांच्या यादीकडे 'बर्सर' ची नजर असे आणि एखादा अतिरेकानें मद्यसेवन करीत आहे असे त्याला आढळून आले तर त्या विद्यार्थ्याची कानउघाडणी होत असे. गावाच्या मद्याच्या दुकानात माझे आणि माझ्या दोस्तांचे खाते होते. कॉलेजच्या बटरीवर आम्ही फक्त बिअर आणि तेथे मिळणारी एक सौम्य क्लॅरेट ह्यांच्यासाठीच अवलंबून असू. आम्हा विद्यार्थ्यांचे अनेक क्लब होते, आणि एखाद्या विद्यार्थ्याच्या खोलीत जेव्हा अशा क्लबची बैठक भरे तेव्हा सामान्यपणे ही क्लॅरेट पिण्यात येत असे. माझ्या माहितीतील कुणीही विद्यार्थी खोलीत जिनची बाटली ठेवीत नसे. दारुडेपणामुळे एकाच विद्यार्थ्याला ऑक्सफर्डमधून घालवून देण्यात आले होते आणि हा दारुडेपणा त्याचा स्वतःचा नव्हता. त्याची खोली तळमजल्यावर होती आणि तिच्या खिडकीतून गल्लीत उभ्या असलेल्या आपल्या मित्राला आथित्यशीलतेने तो व्हिस्कीचे टंबलर्स भरून देत राहिला. वेळ उत्तररात्रीची होती. दुसऱ्यादिवशी हा मित्र पोलिसांना बेशुद्धावस्थेत आढळला. ही फार कठोर शिक्षा झाली असेच मला नेहमी वाटत आले आहे. बिचारा तीन हजार मैल अंतरावरून अमेरिकेतून युरोपीय संस्कृती स्वतःच रिचवायला आला होता.

ऑक्सफर्डमध्ये तेव्हा स्वतःच्या जागा असलेले सहा-सात क्लब होते. ग्रिडसारखे कित्येक क्लब अतिशय सभ्य आणि प्रतिष्ठित होते; इतर होगार्थने चित्रित केलेल्या गुत्त्यांसारखे होते. ह्या गुत्त्यांतील सर्वांत उल्लेखनीय क्लबचे नाव 'धि हिपोक्रिट्स' असे होते. सेंट आल्डेट्स चौकात एका सायकलच्या दुकानावरील ट्युडरकालीन खोल्यांत तो भरत असे. ही इमारत आता पाडण्यात आली आहे. येथे सर्वात लोकप्रिय असलेले मद्य म्हणजे मातीच्या टॅन्काईसमधून पिण्यात येणारी लाल बर्गंडी. ह्या क्लबचा एक कायमचा नियम असा होता की सभ्य गृहस्थांनी बागडावे पण नृत्य करू नये – 'Gentlemen may prance but not dance' ह्या क्लबांतील स्वतःची जागा असलेला सर्वात जुना क्लब म्हणजे 'धि न्यू रिफॉर्म क्लब.' हा शिप स्ट्रीटवर कॉर्न मार्केटच्या एका टोकाशी होता. त्याला लॉइड जॉर्जकडून देणगी मिळत असे. त्याच्यातून तळमळीचे लिबरल कार्यकर्ते बाहेर पडतील अशी लॉईड जॉर्जची आशा होती. बेबंदपणे रंगढंग करण्याचे ते एक सुखी स्थळ बनले. आमच्या सवयी अधिक विलासी, उधळ्या बनल्या. माझ्या शेवटच्या वर्षी 'न्यू रिफॉर्म'मध्ये आम्ही भर सकाळच्या प्रहरी खूप शांपेन पीत असू आणि खिडक्यात उभे राहून एका लेक्चरपासून दुसऱ्या लेक्चरकडे घाईघाईने जाणाऱ्या, गाउन्स परिधान केलेल्या, विद्यार्थ्यांची टवाळी करीत असू. ऑक्सफर्ड युनियनमध्ये दुपारच्या चहाच्या वेळी क्रॅम्पेट्सबरोबर व्हिस्की प्यायचीही लाट आली. माझ्या शेवटच्यावर्षी मी आणि माझे बहुतेक मित्र आठवड्यातून तीन–चारदा तरी दारू पिऊन झिंगत असू असे म्हणणे अतिशयोक्तीचे ठरणार नाही. आम्ही चांगलेच तर्र असू आणि कित्येकदा कुणाला तरी आमचे कपडे उतरवून आम्हांला बिछान्यावर झोपवावे लागत असे. पण हे कित्येकदा बहुतेकदा आम्ही रंगात आलेले असू, खूप टिंगलटवाळचा 'मर्कटचेष्टा करू आणि कुणालाही त्या पाहून हसू लोटले असते असे आम्हाला वाटे. आमची वृत्ती मात्र कधी भांडखोर, विनाशक बनायची नाही. त्या वयात दारू चढण्यासाठी फारसे प्यावे लागत नसे आणि प्रत्यक्षात दारूचा जेवढा अंमल आमच्यावर चढलेला असे त्यापेक्षा आमच्या 'यौवनमदा'मुळे आमचे वर्तन अधिक ढंगदार होत असे. आमच्यापैकी फारसे कुणी दारुडे बनले नाहीत.

पीत असलेल्या मद्याच्या विशिष्ट रुचीचा आस्वाद घेण्यात आम्ही फारसे पडलो नाही. एका कादंबरीत, दोन विद्यार्थी एका सेलरमधील वेगवेगळ्या बुधल्यांतील क्लॅरेट्च्या भिन्न रुचीशी परिचय करून घेतात, ह्या प्रसंगाचे वर्णन मी केले आहे. त्या वयात ह्या प्रकारचा अनुभव मला कधी घेता आला नाही. किंबहुना वीस वर्षाचा असताना क्लॅरेट आणि बर्गंडी ह्यांच्यात मला स्पष्टपणे भेद करता येत असे, असे काही मला वाटत नाही. पोर्टची गोष्ट वेगळी होती. पोर्टचे सेवन करण्याची परंपरा अजून रेंगाळत होती. पुष्कळ कॉलेजांकडे सुरेख व्हिंटाज पोर्टचा खूप साठा होता. आणि त्याच्यातून

विद्यार्थ्यांना काही भाग, अगदी मर्यादित असा मिळत असे. पोर्ट आम्ही आदराने पिऊ आणि त्याचे रसग्रहण करायलाही आम्ही शिकलो. १९०४ चे पोर्ट तेव्हा अगदी उमेदीत होते, निदान उत्कृष्ट अवस्थेत होते. गोड मद्य चवीने पिणे ही काहीशी लाजिरवाणी गोष्ट आहे असे आम्हाला तेव्हा वाटत नसे आणि अजूनही मला तसे वाटत नाही. yquem ची प्रतिष्ठा तेव्हा अर्थात अनन्यसाधारण होती. आपल्या मुरब्बीपणाची लोकांवर छाप पाडायला म्हणून ती प्यायला मी सुरवात केली, आणि तिच्यामुळे हळूहळू इतर पांढऱ्या बोर्दो मद्यांकडे मी गेलो. 'टोके' हे मद्य तेव्हा मिळू शकत असे आणि ते लोकांच्या अतिशय आवडीचे होते. ब्रिस्टोल मिल्क आणि ब्राऊन बँग नावाची गडद तपकिरी शेरीही लोकांच्या पसंतीच्या होत्या. जे, जे आम्हाला उपलब्ध होऊ शकले त्याची चव चाखायचे आम्ही सोडले नाही पण जेवताना प्यायच्या मद्यांचे आकर्षण आम्हाला सर्वात कमी होते. लंच किंवा डिनर घेताना आम्ही ती संकेतांप्रमाणे पीत असू पण जेवणानंतर जी अधिक कडक, धुंदी आणणारी मद्ये मिळत त्यांची वाट आम्ही पहात वसू.

मला असे सांगण्यात आले आहे की हल्ली लोक खाजगी रीतीने दूध पितात. आणि जेव्हा ते पार्ट्या देतात तेव्हा मुलींना भुलवायला म्हणून त्या ते देतात. तुमचे बाप तुमच्यापेक्षा किती छान होते आणि तुमच्यापेक्षा तरुणपणात त्यांनी किती मस्त मजा केली ह्याची तरुणांना सतत आठवण करून दिली तर ते वैतागतात हे मला माहित आहे. पण आम्ही तसे होतो आणि आम्ही तशी मजा केली.

## आयर्लंड २० वे शतक

मी आयर्लंडला गेलो आणि दक्षिण-पश्चिम किनाऱ्यावरील एका लहान गावी मी आलो. आता माझी खूप दिवसांपासूनची एक रोमँटिक कल्पना आहे. डोंगरदऱ्यातून, शेतनाल्यातून प्रवास करीत करीत मी एका खेड्यात येईन आणि त्याचे सर्व रहिवासी नाचत असतील आणि माझे स्वागत करतील अशी ती कल्पना. ह्या लहान गावात मी दोन दिवस राहिल्यानंतर माझ्या ध्यानात आले की ही गोष्ट घडून आली आहे.

आता ते नाचतच होते, असं अगदी नाही. पण गावात अठ्ठेचाळीस पब्ज (pubs) होते. तपकिरी डोळ्यांच्या ज्या मध्यमवयीन स्त्रीने मला आपल्या खोलीत बियर प्यायला बोलावले– तिची सायकल भिंतीशी उभी होती आणि सुरेख शेकोटी पेटत होती. तिने मला हे सांगितले. 'अठ्ठेचाळीस आणि दोन आंधळी' १८०० वस्तीच्या गावात अठ्ठेचाळीस! बाहेर ओलाचिंब भन्नाट पाऊस रस्ते झोडपत होता. "नाहीतर तुम्ही दिवस संपवणार कसा?" तिने विचारले.

"छे! छे!" जेम्स नावाचा एक माणूस 'फॉलीज स्नग' ह्या पबमध्ये मला म्हणाला. "पंचावन आणि दोन आंधळी." गावाच्या कडेला, पुलाशेजारी, रात्री जरा उशीराच एका बाईने दार उघडून मला पबमध्ये घेतले. आणि आपल्या मुलीशेजारी ती परत जाऊन बसली. जपमाळ ओढणे परत सुरू केले. त्यांचे उरकल्यावर मी बियरची बाटली मागवली. मुलगी म्हणाली, "बासस्ट आहेत." पण मी परतताना कडी काढायला गेलो तेव्हा तोपर्यंत गप्प असलेली तिची आई कोपऱ्यातून म्हणाली, "आणखी दोन आंधळी आहेत. नमस्कार. या आता."

मी ज्या गावांना गेलो आहे त्यांच्यातले हे सर्वात सुंदर गाव आहे; असे मला वाटते. आणि ते नेमके का ह्याविषयी माझी खात्री नाही. ही 'पब्ज्' त्यांच्या सुरेखपणाचा केवळ एक भाग आहेत. सुखी जीवन जगण्यात दंग झालेल्या रहिवाशांनी घडवून आणलेल्या अनेक परिणामांपैकी तो एक परिणाम आहे.

"काय? चव छान आहे नां? मर्फच्या पबमध्ये बसलो असताना एका माणसाने विचारले. तो कोबी विकत घ्यायला आला होता. गेल्या अठरा महिन्यात त्याच्या घशातून एक थेंब खाली उतरला नव्हता. त्याचा पगडा आपल्यावर बसतो आहे असे त्याला आढळून आले तेव्हा त्याने सोडून दिले. पण त्यापूर्वी "संध्याकाळभरात पंधरा–सोळा पाइंट्स म्हणजे मला काही नव्हते, अगदी काहीच नव्हते" बाहेर पडताना तो मर्फला म्हणाला, "ही खूणगाठ पक्की असूदे हं. मी परत येईन सुद्धा." एखाद्या विचाराने










माणसाचा चेहरा असा उजळताना मी कधी पाहिला नव्हता. दार बंद करताना सोनेरी पदके आणि आंतरराष्ट्रीय बक्षिसे लटकविलेल्या नक्षीदार आरशात त्याच्या चेहऱ्याचे प्रतिबिंब पडले आणि तो मजेने हसला.

शांत जीवन आणि गप्पागोष्टी आणि कुत्र्यांच्या शर्यती आणि अंत्ययात्रा आणि बिलियर्ड–ह्या गावात आणि परिसरात जी जीवनशक्ती आहे तिचे हे आविष्कार आहेत.

भरदुपारची, कडक उन्हाची वेळ. एका पांदणीतून जाताना मी माझ्या सोबत्यांशी काही बोललो. "शू ! शू ! शू ! गप्प बसा.' एका वईखालून त्रस्त आवाज आला. वईच्या सावलीत एक म्हातारा लायब्ररीतून आणलेले एक पुस्तक वाचत होता. डोकीवर उंच हॅट होती. समोर खडकांनी बांध घातलेली वेडीवाकडी शेते आणि करडे सुळके, आकाशात प्रखर सूर्य प्रकाशत होता. येथे यावेळी वईच्या सावलीत बसलेल्या म्हाताऱ्याचा स्वास्थ्यभंग करणे म्हणजे काय ? पण मी असे करीत होतो ह्याची कल्पना मला नव्हती.

'देवाची इच्छा !' बोन्टाय लावलेला एक लहानखुरा माणूस म्हणाला. लहान मुलांच्या गोष्टी-तल्या नाकाड्या बुटक्यासारखा तो दिसत होता असे मला एकदा वाटले पण तो अधिककरून सशा-सारखाच दिसत होता. "नशीबाचे दान नीट पडले असते तर मी आज फॉरिन लिजनमध्ये असतो." मर्फच्या पबच्या मागल्या खोलीतून बिलीयर्ड टेबलावर त्याने एक दणदणीत स्ट्रोक मारला.

मागे जो माणूस उभा होता तो शांतपणे हॅटस्टँड-वर असलेल्या सर्व हॅट्स एकामागून एक डोक्यावर घालून पहात होता, आणि दरवेळी हॅट कशीकाय वाटते हे कपाळाला आठ्या घालून पारखत होता. त्याने त्या सर्व परत स्टँडवर ठेवल्या आणि आपला शॉट मारला. बाहेरील हिरवळीचा ओलसर वास आणि बियरचा वास पसरला होता. वेळ पहाटेची तीन वाजताची.

दुसऱ्या दिवशी कुणाची अंत्ययात्रा होती. सबंध गाव मागून गेला. "कोण वारलं ?" एका अतिशय पोक्त दिसणाऱ्या मुलाला मी विचारले. "माहीत नाही." तो उत्तरला, "वडिलांनी मला जा म्हणून सांगितलं."

त्यादिवशी नंतर ज्याच्याकडे कुत्रा होता असा प्रत्येक आयर्लंडमधील मनुष्य त्या गावात आला. भोवतालच्या टेकड्यांवरून सात मैलांच्या परीघाचे एक गोल ड्रॅग बनविण्यात आले होते. त्याच्या आत कुत्र्यांना सोडून देण्यात आले आणि माणसे बाहेर राहिली. कोण जिंकतो त्याची वाट पहात ती खिडीत गर्दी करून उभी राहिली. विजयी कुत्रा भुंकत भुंकत पुढे आला, आणि सर्व माणसे गावाकडे परतली.

तो दिवस रवीवार होता. पब्ज सात वाजता बंद व्हायची होती पण आणखी दोन तास उघडी ठेवण्याची खास परवानगी मिळाली होती. नऊ वाजता आयर्लंडमधील कुत्र्यांच्या शर्यतीत भाग घेणारी ती सर्व माणसे वासष्ट पब्जमधून जमावाने बाहेर पडली. आणि रस्त्यांवर येऊन उभी राहिली. त्यांच्या एकमेकांशी चाललेल्या बोलण्याचा मंद, प्रसन्न मर्मरध्वनी ऐकू येत होता. पोलिसांनी फेरी मारली आणि सर्व पब्ज बंद झाल्याची खात्री करून घेतली. नऊ वाजून दहा मिनिटांनी आयर्लंडमधील कुत्र्यांच्या शर्यतीत भाग घेणारे ते सर्व लोक जमावाने परत आत शिरले. चित्रपटाचा आपण पाहिलेला एखादा भाग परत उलट क्रमाने दाखविण्यात यावा तसे काहीसे हे होते.

ते अगदी नाचत होते असे नाही; असं मी म्हटलं का ? पण ते नाचतही होते. एका लहान पांदणीत, सिमेंट कॉंक्रीटच्या एका छोट्या चौकात, हॉथॉर्न-खाली ते नाचत होते. चांदणे होते आणि नाचणारे सारे तरुण होते. एका विशेष आतिथ्यशील मुलाने जेव्हा मला नाचात भाग घ्यायला बोलावले तेव्हा मी खुळ्यासारखे अंधारात माझ्या 'फिशिंग बूट्स'कडे बोट दाखविले. संगीताचे तीक्ष्ण ध्वनी वाऱ्यावर पसरत होते. आणि पलीकडील उंच टेकड्या काळोखात हेलकावल्यासारख्या दिसत होत्या.

आम्ही जेव्हा ते गाव सोडले तेव्हा एका चौरस्त्या-वरील पबमध्ये आम्ही थांबलो. एका बाकावर भिंतीशी तीन माणसे बसली होती, आणि मधल्याने आम्हाला नम्रपणे गाणे म्हणण्याचा आग्रह केला.








"आम्हाला गाता आलं असतं तर! आम्हाला गायची सवय असती तर! आम्हाला गाता येतं असं एखादं एकतरी गाणं असतं तर! आमचा आवाज तसा असता तर! आम्हाला एखाद्या गाण्याचे शब्द येत असते तर!"

पण त्यांचा आग्रहच पडला. आम्हाला गाणे म्हणावेच लागले. मग त्यांच्यातल्या पहिल्याने गाणे म्हटले आणि मग दुसऱ्याने म्हटले आणि मग तिसऱ्याने म्हटले. तिसरा तोतरा होता. पण त्याने गाणे म्हटले. आम्ही पबमधून बाहेर पडलो तेव्हा सायकल हातात धरून येणारा एक माणूस आम्हाला म्हणाला, "छान, मवाळ दिवस आहे, नाही?" सुरेख, झिंगणारा माणूस चालण्याची लय काळजीपूर्वक सांभाळीत जसा डौलाने, सावकाश चालतो तसा तो चालला होता, तो त्या बासष्टांकडे परत निघाला होता. आम्ही पुढे निघालो.

सौंदर्य अनेकदा पहाणाऱ्याच्या दृष्टीत असते असे म्हणतात; चांगुलपणाच्या बाबतीतही हे खरे असणे शक्य आहे.

सौंदर्य अनेकदा पहाणाऱ्या दृष्टीत असते असे म्हणतात; चांगुलपणाच्या बाबतीतही हे खरे असणे शक्य आहे. तेव्हा मी तुम्हाला एवढेच सांगीन की हे चार अक्षरी नावाचे एक गाव आहे, त्यातली घरे सुरेख रंगीबेरंगी आहेत आणि त्याच्यात एकच लांब रस्ता आहे. तुम्हाला ते कुठे आढळते का पहा. पण कदाचित माझे बरोबर असेल आणि मला दिसलेला भलेपणा त्या गावातच असेल. मग तो तुम्हालाही आढळून येईल. जीवनाच्या शाहिरीचा हा एक प्रकार, हे एक जुने, चालू असलेले गाणे तुम्हाला ऐकू येईल.












संकलन- चारुदत्त भागवत

# १९ व्या शतकातील मद्यपानविषयक दोन मतप्रवाह :

[ मुंबई येथे 'द बाँबे टेंपरन्स युनियन' ही संस्था १९ शतकाच्या पूर्वार्धात स्थापन झाली होती. या संस्थेतर्फे मद्यपानप्रसारास आळा घालण्याकरिता चळवळ सुरू झाली. तिच्या १४ जानेवारी १८५३ रोजी झालेल्या वार्षिक सभेत मुंबईतील व बाहेरील विद्वान व समाजसेवक यांची भाषणे झाली. त्या भाषणांचा सारांश 'ज्ञानोदय' मासिकाच्या बाराव्या खंडात आला आहे ( १ फेब्रुवारी १९५३ ). त्यातील महत्त्वाचा मजकूर पुढे दिला आहे. —का. सं. ]

**सिद्धांत :**

दारूचीं दुकानें अगदीं अनर्थकारक आहेत आणि तीं काढून टाकावी असा सरकारचा धर्म आहे; आणि याप्रमाणें सरकारनें करावें अशी एतद्देशीय सुज्ञाची इच्छाही आहे.

हा सिद्धांत वाचून डाक्तर भाऊदाजीनें या विषयीं येणेप्रमाणें बोलणें लाविलें.

एतद्देशीय उंच जातीच्या विचारास व धर्मास विरुद्ध असें मद्यपान आहे ही गोष्ट जगप्रसिद्ध आहे. पूर्वीच्या राज्यांत मद्यपान मोठा गुन्हा आहे असें लोक व सरकार मानीत असत, व मद्यप्यास त्याप्रमाणे शिक्षाहि होत असे. मद्यपान हें मोठें अप्रतिष्ठित व नाशकारक व्यसन होय व अत्यंत नीच व भ्रट जातींचे लोक मात्र तें करीत असत. तेव्हांच्या सरकारचा हेतु असा असें कीं दारवेचीं दुकानें बंद करून तो व्यापार अगदीं मोडून टाकावा परंतु दारू म्हणजे जमाबंदीचे मुख्य अधिष्ठान करून ठेवण्याचा त्या सरकारचा इरादा नसे. अलिकडेस मद्यपानाची भयास्पद वृद्धि होण्याचीं बलवत्तर कारणें अनेक आहेत. मद्यप्यास आता शिक्षा क्वचितच होती व मद्यपान करणें हा अन्याय किंवा अनाचार नव्हेच असा लोकांचा ग्रह बनत चालला आहे. सर्व युरोपियन त्यांत विशेषें करून मोठ्या योग्यतेचे आणि महत्त्वाचे ग्रहस्थ देखील पितात या सडीवरून जो प्राचीन कालीं मद्यपानाचा निषेध होऊन निंदा होत असे ती आतां पराकाष्ठेची कमती होत चालली आहे आणि सध्या तर लोकांची असी समजूत पडत चालली आहे कीं मद्यपान हें मोठें प्रतिष्ठीत व हितावह व्यसन आहे. अबकारी म्हणजे दारू विकूं देण्याविषयींचा परवानगीचा पट्टा सरकारातून मिळतो येणेकरून या अनिवार व अनर्थकारक अशा दुष्ट व्यसनाची सर्व हिंदुस्थानभर वृद्धि होऊन त्याचा लहान-थोर उंच नीच जातींत फार फैलाव होत चालला आहे. ही व्यसनरूप राक्षसी इंग्लंडांतून येथे आणली परंतु ती कां व कशाकरता हें न कळे. या देशातील लोकांचें हित करून त्यांचें सुख व संपत्ती वाढविण्यास व त्यांचे संरक्षण करण्यास तर नाहींच नाहीं. तर या हाल करणाऱ्या व दुष्ट व्यसनात निमग्न झालेल्या पुरुषांची खराबी व भ्रष्टता करून सरकारास फक्त जमाबंदी मात्र उत्पन्न व्हावी एतदर्थ आहे हे खचीत. हा मद्यपानरूप विषवृक्ष पूर्वी हिंदुस्थानांत नव्हता, त्याची पाळेमुळे इंग्रज सरकारच्या कारकीर्दीत युरोपियन लोकांचा रिवाज पाहून सर्वत्र संचरत चालली आहेत. या विषवृक्षाचा बीजारोप येथे होण्याच्या पूर्वी सर्व हिंदुस्थानभर शक्ति शत्रूचें साम्राज्य होतें. इतर सर्व निंदणाप्रमाणे हा विषवृक्ष येथे फार माजला. व मद्यपान न करणे हा जो










कांहीं एतद्देशीयांत गुण विशेष होता त्यांत आतां दारू ठांसण्यांत युरोपियनांस माजी पाडूं लागले. पराकाष्ठेची दारू पिऊन लुल्ल होण्याची खोडी लागल्याने एतद्देशीय लोक निरुपयोगी होऊन त्यांच्या नीतीरूप वर्तनावर पाणी पडत चालले. आणि जोपर्यंत सरकार पट्टा देण्याचें चालवील तोंपर्यंत हें व्यसन दूर करण्याचें कायदे होणें मुष्किल आहे. धान्यापेक्षां निंदण फार जलद वाढते. ते निंदण समूळ उपटून टाकल्याशिवाय धान्य पिकण्याचें नाहीं. याजकरितां मादक ज्या दारवा त्या विकण्याकरितां सरकारनें परवानगी देणें हें कायदा ठरवून बंद केलें नाहीं तर नीच व मध्यम प्रतीचे सर्व लोक आणि कित्येक उंच जातीचेहि थोडचा वर्षांत या अतिनीच अनाचारांत बुडून जातील आणि सर्व मातबर व गरीब देशाची या दुष्ट प्रवृत्तीच्या दाहानें व भूतचेष्टेनें अपरिहार्य हानी होऊन सर्व जातीचे लोक या फजीतखोर व निंदक व्यसनाच्या पायीं हाय हाय करीत बसतील यात संशय नाहीं.

डाक्तर भाऊदाजी बोलल्यावर त्याच विषयावर साताऱ्यातील रेवरेंड वुड साहेबानें येणेंप्रमाणें भाषण केलें :

दारूच्या योगाने लोक अगदीं गरीबीं पावतात आणि इतकेंच केवळ नाहीं तर ते जिवाचाही घात करणारे असे क्रूर होतात, आणि कज्जा, तंटा, रोग, बेशुद्धपणा हे तर त्यांच्या पाठीमागें लागूनच राहातात अशी आमची खात्री झाली आहे. आणि केवळ आमचीच झाली असें नाहीं तर दुसऱ्याहि लोकांची याविषयीं पक्की खात्री होऊन गेली आहे. आतां आम्ही आपलें बोलणें एकीकडे ठेवून याविषयीं दुसऱ्या वजनदार मनुष्यानीं जें लिहिलें तेंच सांगतो.

सर आस्टली कुप्पर साहेब म्हणतो कीं दारूचा मी हाडवैरी आहे आणि मी तिला घरीं कधीं येऊं देत नाहीं; जसी एकाद्या राक्षसाची बंदी करावी तसी केली आहे. दारूबाजाची बिघडलेली प्रकृति त्यांचीं रोगट पोटें, वगैरे पाहून जर कोणी विचार करील तर त्याची पक्की खात्री होईल कीं दारू हें वीषच आहे.

कलकतारेव्यु पत्रांत असें लिहिलें आहे कीं फ्रान्स देशांत वाटर्लू लढाईमध्यें जीं माणसें मरण पावलीं त्याच्या तिप्पट या बंगाल इलाख्यांतील पलटणी शिपायी लोक मद्यपानरूप अनर्थांपासून दरवर्षास मरण पावतात यात संशय नाही. तसेंच हिंदुस्थानच्या सेनापतीनें गतवर्षी फेब्रूएरी महिन्यांत भाषण केलें कीं जे अपराध मजपुढें तपासायास येत असत ते होण्याचें कारण बहुत करून दारूच होती.

आणखीहि असलीं उदाहरणें बहुत आहेत तीं सर्व काढावयास अवसर नाहीं परंतु यावर माझें म्हणणें इतकेंच कीं असें बहुत करून अपराधांचें कारण जर दारू आहे तर तिचा बंदोबस्त करायास सरकारनें झटूं नये कीं काय ? दारूखाने सरकारने लोकांच्या हितार्थ घालविले आहेत असें त्याच्यानें स्थापवेल काय ? आणि सरकार दुकानें घालायास परवानगी देतें म्हणून लोक दारू पिण्यांत हुशार होतात असें नव्हें काय ? आणि जो मक्तेदार रुपये वाढवून मक्ता घेतो तो दुकानें वाढवून व पुष्कळांला बोलावूनहि आपला नफा करायास चुकेल काय ? आणि असें करितां करितां मक्ता वाढला तरी ते कबूल करून मक्ता घेतात यावरून हा अनर्थ पराकाष्ठेचा वाढत चालला नाहीं काय ? एक दोन उदाहरणें पाहा. सातार प्रांतांत सन १८५१ सालांत १५७३५ रुपये होता आणि सन १८५२ त १९८८३ रुपये झाला म्हणजे एका वर्षांतच चतुर्थांश वाढला. पुण्यांत १८५१ मध्ये ४८००० होता आणि १८५२ त ५२००० झाला. म्हणजे एका वर्षात चार हजारांचा फरक पडला आणि याच प्रमाणें बहुधा इतर प्रांतीं असेल. पुण्यांत मद्यपान वगैरे कैफनाशक जी मंडळी स्थापीत आहे तिच्या रपोटांत लिहिलें आहे कीं इकडे आसपासच्या गांवीं दारूचीं दुकानें होऊन जिकडे तिकडे छाकटे होतात व कज्जे तंटे असीं तुफानें फार चालतात. तसेंच सातार प्रांतांतहि चालू झालें आहे. तेथें गल्लोगल्लीं पीटें होऊन रस्त्यांत लोक छाकटे पडलेले आढळतात. मुंबईमध्यें कसकसीं दुकानें वाढतात व दिवसान दिवस गल्लोगल्लींत कसे छाकटे होऊन अनर्थ होतात हें सर्वांस माहित आहेच तर या सर्व गोष्टी पाहून आमचें मत असें आहे कीं हा मद्यपान रूप माहा अनर्थ सरकारानें अगदीं बंद करून टाकावा.

याप्रमाणें वुड साहेब बोलल्यावर बोएन साहेब व टेलर साहेब इत्यादिकांनीं दारू व अफीण यांविषयीं भाषण केलें तें पुढील अंकांत लिहिलें जाईल.

* * * *

## सोम व सुरा :

[ १६ जानेवारी १८९९ च्या 'सुधारक' पत्रातून राजारामशास्त्री भागवत यांनी एक पत्र लिहून मद्यपानाबाबतची आपली मते मांडली आहेत. प्रस्तुत पत्र येथे दिले आहे. – का. सं. ]

रा. रा. सुधारककर्ते यांस :–

सा. न. वि. वि. "सुरा, सोम, मधु" हे तीन शब्द माज आणणाऱ्या तीन पातळ पदार्थांस लावलेले वैदिक भाषेत आढळतात. पहिले दोन शब्द "सु" धातूपासून आले आहेत, "मधु" शब्द "मद" पासून आला आहे. "सु" धातूचा अर्थ "पातळ पदार्थांत विकृति करणे" असा आहे. "मधु" हे मद्य मूळचे मधापासून होत असून, त्याचा इंग्रजीतल्या mead शब्दाशी संबंध दिसतो.

"सोम" शब्दाची व्युत्पत्ति दोन प्रकारे करता येते. हरिश्चंद्राच्या कथेत हा "अंज.सव" म्हणजे "सोम" शुनःशेपाने पाहिल्याचा उल्लेख केला आहे. "अंजःसव" म्हणजे "ताबडतोब विकृति होऊन बनणारा मादक पदार्थ." "सुरा" पदार्थ "अंजःसव" नव्हे, कारण ती तयार होण्यास काही दिवस लागत. "अंजःसव" म्हणजे "तूर्तदान आणि महापुण्य" पडल्यामुळे तो पसरला व "सुरा" पाठीं पडली – अशी हकीकत दिसते. ताबडतोब विकृति होऊन माज आणणारा पदार्थ हाती लागला, म्हणजे माज आणण्याची योग्यता येण्यास काही दिवस लागणाऱ्या पदार्थाकडे पूर्वी इतके पिणाऱ्या लोकांचें लक्ष्य जाणाचा संभव नाही. ही "सोम" शब्दाची व्युत्पत्ति ऐतरेयावरून दिली आहे. सोम हा भांगेच्या तोडीचा माज आणणारा रस. सुरेच्या संबंधाचा अगदी पहिला मंत्रः–

"स्वादीं त्वा स्वादुना तीव्रां तीव्रेणाऽमृतामृतेन मधुमतीं मधुमता सृजामि सं सोमेन। सोमोऽस्यश्विभ्यां पच्यस्व सरस्वत्यै पच्यस्वेंद्राय सुत्राम्णे पच्यस्व" ( मं. १ अध्या. १९ माध्यंदिन संहिता ) असा आहे. "सुरेमध्ये सोम मिसळतो; सुरा व सोम हे दोन्ही पदार्थ गोड, तिखट, मुर्दाडपणा घालवणारे, माज आणणारे" किंवा "मधु" नावाचे मद्य "आंत पडलेले"– असा पहिल्या भागाचा भावार्थ आहे. दुसऱ्या भागात, "सोमा"स पक्वपणा आणावयास सांगितला आहे, त्यापक्षीं "सोम" पदार्थ इंग्रजीतल्या "येस्ट" ( yeast )च्या तोडीचा असावा अशी, शंका येत आहे. दोघे अश्विनीकुमार, सरस्वती, इंद्र सुत्रामा–इतक्यां देवतांस "सोम" आत मिसळून मादकपणा वाढवलेला "सुरा" पदार्थ मनस्वी आवडे. "सुत्राम्या( मा )" वरून या याज्ञिक कर्मास "सौत्रामणी" म्हणतात. आता सौत्रामणीचे थोडक्यात विवेचन करूया. यांत पहिल्याने "सुरा" आली पाहिजे.

मोड आलेले भात, मोड आलेले सातु, लाह्या, पिंपळी वगैरे वासाची द्रव्ये, इतके पदार्थ पहिल्याने तयार हवेत. या चार पदार्थांची "शष्प, तोक्म, लाज, नग्नहू" अशी नावे आहेत. या पदार्थांचे पीठ करावयाचे. नंतर बरेच पाणी घालून, तांदुळांचा आणि सांव्यांचा– असे दोन भात निराळे शिजावयाचे. त्याची ऊन ऊन पेज काढून, तींत पिठाचा तिसरा भाग टाकावयाचा. याप्रमाणे पीठ टाकलेल्या पेजेस "मासर" म्हणतात. पुढे तांदुळांच्या व सांव्यांच्या भातात तिसरा भाग टाकून, दोन भातांचे व दोन मासरांचे मिश्रण करून, त्या मिश्रणाचे भांडे तीन रात्री एका खाड्यात ठेवायाचे व राहिलेला पूर्णाचा तिसरा भाग तीन दिवसांत भांड्यात टाकून संपवायाचा. "स्वादीं त्वा" हा मंत्र भातांचे व मासरांचे मिश्रण करताना म्हणावयाचा. या कृतीचा विचार करता "सोम" हा इंग्रजीतल्या "येस्ट" च्या तोडीचा पदार्थ असावा, हे अनुमान बरोबर दिसते. पहिल्या रात्रीस एका गाईचे, दुसऱ्या रात्रीस दोन गाईंचे, तिसऱ्या रात्रीस तीन गाईंचे दूध भांड्यात पडे. पुढे बैलाच्या व घोड्याच्या केसांचे वस्त्र केलेले असे, त्यांतून भांड्यातला प्रवाही पदार्थ गाळावा लागे. हा गाळलेला पदार्थ पळसाच्या भांड्यांत ठेवीत. पुढे बकऱ्याच्या व मेंढ्याच्या ऊर्णावस्त्रातून वेतांच्या भांड्यात गाळून दूध तयार करीत. या दुधाचे तीन भाग करून ते पिंपळाचे, उंबराचे व वडाचे अशा तीन लाकडी भांड्यात ठेवीत. यांस "पयोग्रह" म्हणत. जवळजवळ याचप्रमाणे तीन "सुराग्रह" तयार









होत. देवतांवरून या तीन पयोग्रहास व सुराग्रहास "अश्विन, सारस्वत" व "ऐंद्र" म्हणत. त्यां त्यां देवतांस उद्देशून होम झाल्यानंतर अध्वर्यू वगैरे तीन ऋत्विजांस "अश्विन" व होता वगैरे तीन ऋत्विजांस "सारस्वत" ग्रह प्यावयास मिळे; "ऐंद्र" सगळा राहिलेला यजमानाने प्यावयाचा. जास्त माहिती कोणास हवी असल्यास त्याने माध्यंदिन संहितेचा १९ वा अध्याय पहावा.

"एह गमन्नृषयः **सोमशिता** अयास्यो अंगिरसो नवग्वाः" अयास्य आणि अंगिरसांपैकी नवग्व ऋषि **सोमाने तीव्र झालेले** येथे आले आहेत ( ऋग्वेद १०.१०८.८ ) असल्या स्थळी "सोम" शब्दाच्या अर्थाविषयी मतभेदांस जागा नाही. "सोम" म्हणजे मादक रस; मग तो काढताच माज आणणारा असो वा माज आणण्यास तीन किंवा तिहींहूनही जास्त दिवस लागणारा असो. पूर्वीचे ऋषि दारूबाज नसले, तर भांगट म्हणावे. पिवळे किंवा तांबडे पाणी पिणारे नसले, तर हिरवे पाणी पिणारे मानावे – पण कोणते तरी माज आणणारे पाणी पिण्याचा संप्रदाय होता, याविषयी शंका रहात नाही.

असुरांची गोष्ट निराळी, पण "सुर" म्हटले की "सुरा" हवी. अमृतमंथनाचे वेळी एकाएकी निघालेली "पवित्र सुरा" घेतली, म्हणून **सुर** हे योग्य नाव मिळाले. "दितेः पुत्रा न तां राजन् जगृहुर्वरुणात्मजाम् । अदितेस्तु सुता वीरा जगृहुस्तामनिंदिताम् ॥ ३७॥ **असुरास्तेन** दैतेयाः **सुरा** स्तेनाऽदितेः सुताः ॥" हे श्लोक येणारा वाल्मिकिरामायणाचा बालकांडाचा ४५ ( पंचेचाळिसा ) वा अध्याय पाहिल्यास वाटेवरच्याचीही खात्री सहज होणार आहे. दितींच्या पुत्रांस हे पवित्र पेय न मिळाल्यामुळे असुर म्हणू लागले; अदितीच्या मुलांनी या पवित्र पेयाच्या ( वारुणीच्या ) लाभामुळे **सुर** हे नाव मिळविले व गाजविलेही. **असुरांचा** अनादी संप्रदाय सोडून त्यांचा पुरोहित शुक्र "सुरा" पिऊ लागला, ती त्यास अर्थाअर्थी बाधली व लौकरच सोडून द्यावी लागली. **असुरांस** सुरा बाधलीच पाहिजे; **सुरांस** सुरा बाधू शकत नाही– असा जुनाट समज दिसत आहे. ऋषि म्हटले म्हणजे **सुरांचे** भक्त, **असुरांचे** द्वेष्टे. ऋषींची सुरेवर व सोमावर, मिळून कोणत्या तरी रंगाच्या मादक पाण्यावर जास्त श्रद्धा असणे व त्यांचे त्यांच्याकडून जास्त सेवन होणे साहजिक आहे. आश्वलायन, स्त्री-पितरांचे पिंडावर "सुरा" ओतावयास सांगतो ती उगीच नव्हे.

तीर्थी हिंसा केलेल्या जनावराची सागुती व सुरा किंवा सोम म्हणजे कोणते तरी मादक पाणी, या दोहोंचे सेवन हा ब्राह्मणी धर्माचा भगवा झेंडा आहे. मद्यमांस पिण्याखाण्यांत जर पूर्वीचे ब्राह्मण अधर्म मानीत नसत, तर आजच्याही ब्राह्मणांनी– ते पूर्वीच्या ब्राह्मणांचे वारशी वंशज असल्यास–त्यात अधर्म मानता कामा नये. यावरून असे कोणी समजू नये की, **प्रत्येक ब्राह्मणाने** मद्यमांस घशाखाली उतरवलेच पाहिजे; ज्यास रोज किंवा कधीकधी उतरवावेसे वाटेल, तो तो रोज किंवा कधीकधी उतरवील आणि ज्यास कधीही उतरवू नयेसे वाटेल, तो ते कधीही उतरवणार नाही. ब्राह्मणांमध्ये व क्षत्रियांमध्ये उत्तररामचरित्रातले वसिष्ठ व जनक अनुक्रमे असावे यातच ब्राह्मणी धर्माचा थोरपणा आहे. बौद्धांच्या किंवा जैनांच्या नादास लागून, ब्राह्मणांनी खाण्यापिण्याच्या जुलुमास सुरुवात केली. हा बौद्धपणा किंवा जैनपणा आजचे ब्राह्मण जेंव्हा झुगारून देतील, तेंव्हा त्यांचे ढिले पडलेले ब्राह्मणपण पूर्वीच्याप्रमाणे पुनः घट्ट होण्याचा संभव आहे.

जर ब्राह्मणपणा हवा, तर ब्राह्मणी धर्म हवा; जर ब्राह्मणी धर्म हवा, तर मद्यमांसाच्या निषेधाचा **जुलूम** नको आहे; मद्यमांस सेवन न करणारांचे मद्यमांस सेवन करणारांशी खाण्यापिण्याचे दळणवळण सुरू झाले पाहिजे आहे. मद्यमांस सेवन करणारा मद्यमांस सेवन न करणारा स्नेही घरी जेवायास आल्यास त्याच्या पानावर मद्यमांस खास ओतणार नाही. जर प्रो. जिन्सीवाल्यांस व त्यांच्या कळपातल्यांस बौद्धपणा किंवा जैनपणा हवा असला, तर तो ताइतांप्रमाणे गळयात किंवा प्रसंगी ललाटपट्टावरही भस्माच्या पट्याप्रमाणे त्यांनी बांधावा किंवा ओढावा; इतकेंच की, **ब्राह्मण** म्हणावयाचे सोडून द्यावे. **बौद्ध** म्हणवावे, **जैन** म्हणवावे किंवा दुसरे कोणते तरी नाव द्यावे; पण **ब्राह्मण** म्हणू नये, कारण **ब्राह्मण** म्हणणारास श्रौत किंवा स्मार्त शास्त्राचा आणि त्यातल्या शब्दांचा भलभलता अर्थ करणे शोभत नाही.

अनुक्रमणिका

ब्राह्मणी धर्माचे थोडक्यांत समर्थन करण्याचा हा सुप्रसंग आपणावर आणल्याबद्दल प्रोफेसर जिन्सीवाल्यांचे आभार मानण्यात येत आहेत, असले सुप्रसंग जिन्सीवालेसाहेब जितके जास्त आणतील, तितके जास्त आभार त्यांस दरोबस्त ब्राह्मणांकडून मिळणार आहेत. प्रच्छन्न बौद्ध किंवा प्रच्छन्न जैन जसजसे ब्राह्मणी धर्मावर शस्त्र जास्त उचलतील, तसतसा वरचा मळ सहज नाहींसा होत जाऊन, ब्राह्मणी धर्माच्या अंगचा उजळपणा लोकांच्या दृष्टीस जास्त पडू लागणार आहे. कळावे बहुत काय लिहिणे ही विनंति. ता. २५।१२।१८९८

राजारामशास्त्री भागवत

---



अनुक्रमणिका

यशवंत भालेराव

# अल्कोहोलचे शरीरावरील परिणाम

मद्य या पेयातील प्रमुख घटकाला अल्कोहोल म्हणतात. अल्कोहोल हा इंग्रजी भाषेतील शब्द मूळ अरबी भाषेतील Alkohl या शब्दावरून तयार झाला आहे. अरबी भाषेतील Kuhl, Koh'l किंवा Kohol हे शब्द 'अतिसूक्ष्म चूर्ण' या अर्थाचे आहेत. डोळ्यांचे सौंदर्यप्रसाधन म्हणून अरबी लोक अँटिमनी सल्फाइडाची अतिसूक्ष्म पावडर पापण्यांना लावीत. या पावडरीच्या तिकडील 'अल्कोहल' या नावावरून हा शब्द युरोपियन भाषांतही रूढ झाला आहे. या प्रमुख घटकाला 'इथिल अल्कोहोल' 'इथॅनॉल' 'ग्रेन अल्कोहोल' आणि 'प्रुफ स्पिरिट' अशीही नावे आहेत.

मद्ययुक्त पेये तयार करताना त्यांत इतर काही अल्कोहोले ('अॅमिल' 'ब्युटिल' वगैरे), अम्ले, आल्डिहायडे, एस्टर्स, कीटोने, फिनॉलि, टॅनिने, अनेक अकार्बनी पदार्थ, खनिजे आणि जीवनसत्त्वे हे इतर पदार्थही तयार होतात. या इतर पदार्थांना 'सहजात पदार्थ' (कोजीनर्स) म्हणतात. मात्र ज्याच्या शरीरावरील परिणामाकरिताच मद्य सेवनाची प्रवृत्ती उत्पन्न होते, तो एकमेव पदार्थ म्हणजे 'इथिल अल्कोहोल' किंवा 'इथॅनॉल' हाच असून प्रस्तुत लेखात त्याचा उल्लेख 'अल्कोहोल' म्हणूनच केला आहे.

अल्कोहोलयुक्त पेय जेव्हा जठरात जाते तेव्हा त्यामधील जाठररसामुळे ते अधिक विरल बनते व तांबडतोब सर्व शरीरात विखुरले जाते. तत्पूर्वीच मुखातील लाळही त्याचे थोडेबहुत विरलीकरण करते. व्हिस्कीचा (४०–५० % अल्कोहोल) घोट तोंडात घेऊन खळखळून गुळणा करून टाकल्यानंतर केवळ ५ ते १० मिनिटांतच श्लेष्मकलास्तरास चिकटलेले सर्वंचे सर्व अल्कोहोल पूर्णपणे नाहीसे होते. यावरून मुखातही अल्कोहोलाचे अभिशोषण होत असावे. अन्नाचे अभिशोषण होण्यापूर्वी त्यावर जशा काही पचन प्रक्रिया व्हाव्या लागतात, तशा कोणत्याही प्रक्रियांशिवायच अल्कोहोलाचे जठर आणि लहान आतड्यातून अभिशोषण होते अल्कोहोलाचा अल्प रेण्वीय भार आणि त्याची पाण्यातील सहज विद्राव्यता हे गुणधर्म त्याच्या अतिजलद अभिशोषणास कारणीभूत होतात. हे अभिशोषण संपूर्णपणे 'निष्क्रिय' स्वरूपाचे म्हणजे केवळ भौतिकी नियमांना अनुसरूनच होते. जठर श्लेष्मकलास्तरातील सूक्ष्म केशवाहिन्यांतून अभिशोषण झाल्यानंतर उरलेले अल्कोहोल लहान आतड्याच्या श्लेष्मकलास्तरातील केशवाहिन्यांतून सरळ रक्तप्रवाहात येते.

पेय प्रकार, जठर परिस्थिती, मानसिक स्थिती वगैरे गोष्टींचा अभिशोषणावर परिणाम होतो. अल्कोहोलाची अधिक सांद्रता असणारी पेये उदा. व्हिस्की, रिकाम्या जठरात शिरताच जठराचे निर्गमद्वार (पायलॉरिक ऑरिफिस) संकोच पावते व पेय जठरातच काही काळ रोखून धरले जाते. यामुळे पुढे लहान आतड्यात होणारे जलद अभिशोषण लांबणीवर पडते. कार्बन डायऑक्साइडयुक्त पेयास (सोडा वॉटर) हे मिसळून घेतल्यास अभिशोषणाची गती वाढते. बीर मधील अल्कोहोल (५%) कार्बोहायड्रेट मिश्रित असल्यामुळे त्याच्या अभिशोषणास वेळ लागतो. पेय प्रकारातील 'कॉकटेल' (निरनिराळ्या मद्ययुक्त पेयांचे मिश्रण) मधील अल्कोहोल अतिजलद अवशोषिले जाते. जठरात अन्नपदार्थ असल्यास विशेषेकरून वसायुक्त पदार्थ असल्यास अभिशोषण मंदावते. एका प्रयोगात २ औंस

अनुक्रमणिका






अल्कोहोल ४ औंस पाण्यात घालून पिण्यास दिल्यानंतर ५० मिनिटांनी रक्तातील अल्कोहोलाचे प्रमाण ०.१०२% झाल्याचे आढळले. आणखी काही दिवसांनंतर त्याच व्यक्तीस प्रथम २ पौंड उकडलेले बटाटे खावयास देऊन नंतर तेवढेच अल्कोहोल प्यावयास दिले. यावेळी रक्तातील त्याची पातळी ०.१०२% होण्यास १२० मिनिटे लागली. इतर कोणत्याही वसा ( स्निग्ध पदार्थ ) प्रकारापेक्षा दुधातील वसा अल्कोहोल अभिशोषण अधिक लांबवते.

जठर आणि लहान आतड्यातून अभिशोषिलेले अल्कोहोल केशवाहिन्यांद्वारे छोट्या नीलांत व नंतर प्रवेशिका नीलेतून ( पोर्टल व्हेन ) यकृतात येते. म्हणजेच सर्वच्या सर्व अभिशोषिलेले अल्कोहोल प्रथम यकृतातच येते. यकृतात यकृत रोहिणी रक्त आणीत असते व या दोन रक्तांची तेथे संरमिसळ होते. यकृतात अल्कोहोलवर चयापचयात्मक प्रक्रिया मोठ्या प्रमाणावर होतात. तरीदेखील काही भाग हृदयाच्या उजव्या बाजूस, तेथून फुप्फुसात आणि परत हृदयाच्या डाव्या भागात येऊन शुद्ध रक्तप्रवाहातून शरीरातील ऊतकापर्यंत ( टिश्यूपर्यंत ) पोहोच्तोच. अल्कोहोलची ही शरीरातील विभागणी ऊतकांच्या जलसाठ्यावर अवलंबून असते. रक्त आणि मेंदू यासारखा अधिक पाणी असलेल्या ऊतकातून स्नायू, हाडे, इत्यादि अल्पपाणी असलेल्या ऊतकापेक्षा अधिक अल्कोहोल विभागले जाते.

जसा ग्लुकोजचा यकृतात ग्लायकोजेन स्वरूपात साठा केला जातो तसा कोणत्याही शरीरऊतकात अभिशोषित अल्कोहोलाचा साठा केला जात नाही. शरीर अल्कोहोलची विल्हेवाट करावयास ताबडतोब सुरवात करते. मद्यपान व भोजन एकाच वेळी केल्यास रक्तातील अल्कोहोल अधिक जलद नाहीसे होते, असे आढळून आले आहे; परंतु याचे नक्की कारण समजलेले नाही.

अल्कोहोल उत्सर्जनाचे (एक्स्क्रीशन) चार मार्ग आहेत : १) मूत्रातून, २) उच्छ्वसनातून, ३) घामातून आणि ४) चयापचयाद्वारे.

१) मूत्रातून दरताशी ०.२% अल्कोहॉल उत्सर्जित होते. २) उच्छ्वसनाद्वारे दरताशी ०.२२% आणि ३) घामातून ०.१% पेक्षाही कमी प्रमाणात उत्सर्जन होते.

४) अभिशोषिलेल्या एकूण अल्कोहोलपैकी ९०% अल्कोहोलचे चयापचयाद्वारे ज्वलन केले जाते. यकृतात होणारी ही विशिष्ट क्रिया ऑक्सिडीकरणाची असते व तीमुळे अल्कोहोलचे शेवटी कार्बन डायऑक्साइड व पाणी यांत रूपांतर होते. या प्रक्रियेकरिता 'अल्कोहोल डिहायड्रोजिनेज' नावाच्या एन्झाइमची जरूरी असते व ते यकृतात भरपूर प्रमाणात असते. यकृत विकृतीत ऑक्सिडिकरणात व्यत्यय येतो. प्रथिने, ग्लुकोज इत्यादींपासून जशी ऊर्जा उत्पन्न होते तशीच ऊर्जा अल्कोहोल चयापचयातूनही उत्पन्न होते. याच कारणामुळे अल्कोहोलला 'अन्न' म्हणतात.

ऑक्सिडिकरणाचे प्रमाण प्रत्येक व्यक्तीत निरनिराळे असते व ते यकृताच्या क्रियाशीलतेवर अवलंबून असते. रक्तातील एकूण अल्कोहोलापैकी सर्वसाधारणपणे दर ताशी ०.०१५% अल्कोहोल कमी होत असते. कमी होण्याचे प्रमाण व्यक्तिशः कायम असते. निरनिराळ्या व्यक्तींत ते ०.०१०% ०.०२०% पर्यंत असू शकते. म्हणजेच काही शरीरे अल्कोहोलचा इतरांपेक्षा जलद वापर करू शकतात.

शरीर वजनाचा रक्तातील अल्कोहोल प्रमाण कमी करण्यावर परिणाम होतो. उदा. १५० पौंड वजनाची व्यक्ती आणि ३०० पौंड वजनाची व्यक्ती यांच्या यकृताच्या वजनातही दुपटीचा फरक असतो. त्यामुळे अधिक वजन असलेल्या व्यक्तीच्या शरीरातील अल्कोहोलाचा नाशही दुपटीने होईल. अल्कोहोलच्या रक्तातील कमी होण्याच्या प्रमाणावर व्यायाम अति – थंडी किंवा अवसाद (शॉक) परिणाम करीत नाहीत.

मद्यसेवन पद्धतीचा रक्तातील अल्कोहोल प्रमाणावर परिणाम होतो. ८ औंस व्हिस्की एकाच मात्रेत घेतल्यानंतर केवळ १½ तासानंतर रक्तातील अल्कोहोलची पातळी सर्वोच्च बिंदू गाठते. ( ०.२% पेक्षा जास्त ) या उलट २½ औंस अल्कोहोल ( व्हिस्की ) दर तीन तासांनी सेवन करीत,

राहिल्यास रक्तातील पातळी ०·५% च्या वर जात नाही.

अल्कोहोलचे निरनिराळ्या शरीरभागांवरील परिणाम :

१ ) त्वचा :

अल्कोहोल सेवनानंतर त्वचेतील रक्तवाहिन्या विस्फारित होतात आणि चेहरा, मान व छाती या ठिकाणी रक्तिमा येतो. त्वचेत तापमान संवेदनशील तंत्रिका विस्कटलेल्या असल्यामुळे उष्णता वाढल्याची (उबदार वाटणे) जाणीव होते; परंतु तापमापकाने बघितल्यास बदल आढळत नाही. अल्कोहोल बाहेरून लाविल्यास त्यात त्वग्-वसा ( सीबम ) विरघळल्यामुळे जंतुनाशके खोल शिरण्यास मदत होते. काही बाहेरून लावण्याच्या सूक्ष्मजंतूनाशकांचा अल्कोहोल घटक असतो.

२ ) जठरांत्रमार्ग (जठर व आतडी)

जेवणापूर्वी मध्यमप्रमाणात अल्कोहोल सेवन केल्याने चिंता व थकवा नाहीशी होतात; तणाव कमी होऊन अन्नपचन सुलभ बनते. याशिवाय श्लेष्म-कलास्तरावर सौम्य क्षोभक परिणाम होऊन जाठर-रसाचे उत्पादन वाढते. जठरात १५%–२०% अल्कोहोल सांद्रित झाल्यास मात्र रसोत्पादन मंदावते व जठरशोथ होतो. रक्तातील अल्कोहोलचे प्रमाण ०·१२% वर जाताच उलट्या होतात. क्षोभक परिणामामुळे भूक वाढते. अल्कोहोलयुक्त पेयातील काही सहजात पदार्थ, टॅनिने, एस्टर्स, वगैरे या भूक वाढीस मदतच करतात. वारंवार होणारा मद्यातिरेक मात्र जठरांत्रमार्गावर हानिकारक परिणाम करतो. अन्नपदार्थांच्या अभिशोषणात व्यत्यय येऊन जीवन-सत्त्वांची न्यूनता उत्पन्न होते. अन्नाचे पचन न होता ते कुजून त्यातील विषारी पदार्थ अभिशोषिले जातात व त्यापासून यकृत सूत्रण ( लिव्हर सिन्हासिस ) रोग होतो.

३) मध्यवर्ती तंत्रिका तंत्र :

अल्कोहोल सेवनाचे तीव्र परिणाम मेंदूपुरतेच मर्यादित असतात; परंतु चिरकारी परिणामांत मेरुरज्जुशोथ ( मायेलायटिझ ), मस्तिष्कशोथ, बहुतंत्रिकाशोथ यांचा समावेश होतो.

ईथर या भूल देण्याकरिता वापरण्यात येणाऱ्या औषधाचा शोध लागण्यापूर्वी रोग्याला भरपूर मद्य पाजून बेशुद्धी आणीत व त्या अवस्थेतच शस्त्र-क्रिया उरकीत. कालांतराने ही बेशुद्धी अवसादजन्य मृत्यूस कारणीभूत असल्याचे समजले व नव्या औष-धांच्या शोधानंतर अल्कोहोलचा भूलीकरिता होणारा उपयोग बंद झाला. औषधविज्ञानदृष्टया अल्कोहोल एक औषध असून ते विषण्णता उत्पादक (डिप्रेसंट) वर्गात मोडते.

मेंदूवरील अल्कोहोलचा परिणाम द्विदशात्मक स्वरूपाचा ( बायफेजिक ) असतो. रक्तातील त्याचे प्रमाण अल्प असेल, तर काही क्रिया उत्तेजित होतात; परंतु प्रमाण जसजसे वाढते तसतसा विषण्णतोत्पादक परिणाम वाढत जाऊन गुंगी, धुंदी व बेशुद्धी येते. उत्तेजितावस्थेत सामाजिक बंधने तुटल्यासारखे वागणे, वाचाळपणा, चित्तवृत्ती बदल आणि अनियंत्रित भावनाविवशता यांचा समावेश होतो. मेंदूतील अल्कोहोलचे मापन अशक्य अस-ल्यामुळे रक्तातील अल्कोहोलचे प्रमाण व शारी-रिक कृती यांची नेहमी सांगड घालतात. हे प्रमाण ०·१% झाले असता बहुतेकांचे शारीरिक कार्य मंदावते. पुष्कळ वेळा हे प्रमाण केवळ ०·०३–०·०५% असतानाच असमर्थता ( इककॅपॅसिटेशन ) उद्भवते. सर्वसाधारणपणे अल्कोहोल मादकते-विषयी ( इन्टॉक्सिकेशन ) पुढील अनुमान करतात.

१ ) प्रमाण ०·०५ % पेक्षा कमी मादकता बहुधा आढळत नाही.

२ ) प्रमाण ०·१० % – ०·१५ % तीनां-पैकी दोघात मादकता आढळते.

३ ) प्रमाण ०·२० % पेक्षा जास्त असल्यास मादकता निश्चित आढळतेच.

४ ) प्रमाण ०·४ % आढळलेली व्यक्ती बेशुद्ध असते आणि ते ०·५ % वर गेल्यास मेंदूतील श्वसनकेंद्र आणि हृदयकेंद्रांवर गंभीर परिणाम होऊन मृत्यू संभवतो.

विचारशक्ती, शिक्षण, स्मरणशक्ती, निर्णयशक्ती या मेंदूच्या सर्वोच्च क्रियांवर अल्कोहोल परिणाम करते. एका प्रयोगात २ औंस अल्कोहोल घेतलेल्या बुद्धिमान तरुणांची चिन्हांकित तर्कशास्त्रातील प्रश्न सोडविण्याची शक्ती वाढलेली आढळली. त्याच तरुणांना ६ औंस अल्कोहोल दिल्यानंतर प्रश्न








सोडवणे जड जाऊ लागले. दुसऱ्या एका प्रयोगात मद्याच्या परिणामाखाली असताना शिकलेल्या गोष्टींचे स्मरण मद्यसेवनानेच ताजे होत असल्याचे आणि शुद्धीवर असताना शिकलेल्या गोष्टींचे स्मरण शुद्ध असतानाच उत्तम होते. असे आढळून आले.

अल्कोहोल भावनांवर विशेष परिणाम करते. अनेकजण त्याच्या चिंता–दमन करण्याच्या ( अँगझायटी–सप्रेसिव्ह ) गुणाकरिताच मद्यसेवनास उद्युक्त होतात. काही वेळा आणि योग्य परिस्थितीतील अल्कोहोल तणाव आणि चिंता पूर्णपणे घालवते एवढेच नव्हे तर बेफिकिरी, आनंद आणि सुखभ्रम ( युफोरिया ) उत्पन्न करते. परिणामी लाजाळू धीट बनतात, सभ्य असभ्य बनतात, दडपलेल्या लैंगिक भावनांच्या जागी रंगेलपणा येतो, भित्रे शूर बनतात, मितभाषी शांत तोंडाळ बनतात किंवा धांगडधिंगा करतात. मद्यासक्तांमध्ये ( अल्कोहोलिक्स ) मात्र मद्यातिरेकामुळे तणाव आणि चिंता वाटून भावनाही निराळे स्वरूप धारण करतात.

४) हृदय आणि रुधिराभिसरण :

२–३ औंस व्हिस्की नाडीची गती रक्तदाब आणि रक्तप्रवाह पाचपटींनी वाढविते. पण हा परिणाम फक्त पंधरा मिनिटेच टिकतो. अल्कोहोल हृद्-उत्तेजक असल्याचा कोणताही पुरावा उपलब्ध नाही. परिसरीय रक्तवाहिन्यांचे विस्फारण आणि उबेची भावना यांविषयी मागे उल्लेख आला आहे. हृद्रोगावर अल्कोहोलाचा चिकित्सात्मक उपयोग जसा होत नाही, तसाच अल्पसेवनाने दुष्परिणामही होत नाही.

५) यकृत

अल्कोहोलच्या अतिसेवनामुळे इतरांपेक्षा सहापटींनी अधिक वेळा यकृत-सूत्रण हा रोग होतो. केवळ अल्कोहोलमुळेच हा रोग होतो असे नसून याला आहारदोषही मदत करीत असावेत. मद्यासक्तांच्या यकृताची क्रियाशीलता बिघडल्याचे आढळते. तरीही १२ मद्यासक्तांमध्ये एखाद्यालाच ही विकृती होण्याचा संभव असतो.

६) कामोत्तेजक (अ‍ॅफ्रोडिझिअ‍ॅक) गुणधर्म :

अल्कोहोल कामोत्तेजक असल्याची समजूत खोटी आहे. शेक्सपिअरने ' मॅक्बेथ ' मधील एका पात्राच्या तोंडी याविषयी एक अत्यंत सूचक वाक्य घातले आहे.

' ते (मद्य) संभोगेच्छा प्रबळ करते, परंतु प्रत्यक्ष कृती फुसकीच करते."

'It provokes the desire, But It takes away the performance."

प्रस्तुत विवेचनावरून अल्कोहोलमध्ये काही चांगले गुणधर्म असल्याचे लक्षात येईल. अल्पप्रमाणात नियमित सेवन करणारांमध्ये कोणतेही विकृतिजनक दुष्परिणाम दिसून येत नाहीत. अतिसेवनामुळे व मद्यासक्तीमुळे दुष्परिणाम होतात, हे सिद्ध झाले आहे- म्हणूनच अल्कोहोल मानवाला मिळालेले वरदान व शाप दोन्ही आहे. मानवी विचारप्रणालींवर ज्या चार महान विचारवंतांचा प्रभाव पडून गेला आहे, त्यांपैकी दोघे, येशू ख्रिस्त आणि सॉक्रेटिस, गोड मद्याचे सेवन करीत तर इतर दोघे, गौतम बुद्ध आणि महंमद पैगंबर, मद्याच्या थेंबालाही स्पर्श करीत नसत. मद्यपानाविषयी आजही दुमत कायमच आहे.

हफेस्टॉस, ह्या रुप्याला बाक देऊन त्याचे चिलखत बनवू नकोस माझ्यासाठी, पण एक पोकळ प्याला बनव ! अगदी खोल प्याला, आणि त्याच्यावर चांदण्या जडवू नकोस किंवा रथ किंवा उग्र व्याध कोरू नकोस; पण बहरलेल्या वेलींची नक्षी काढ त्याच्यावर आणि हसऱ्या फुलांचे ताटवे आणि प्रसन्न बॅकस.

- ॲनॅक्रिऑन, लेस्बॉस (ख्रि. पू. ६ वे शतक)

अ. ना. ठाकूर

# मदात्यय ( अल्कोहोलिझम )

मद्यपानाच्या अतिरेकामुळे उद्‌भवणाऱ्या विकृती-संबंधीची समस्या मानवापुढे प्राचीन काळापासून आहे व तेव्हापासून ही विकृती म्हणूनच मानली गेली असली पाहिजे. कारण रोमन तत्त्वज्ञ सेनेका (इ. स. पू. सुमारे ५४ ते इ. स. ३९) यांनी मद्याच्या अतिरेकी सेवनाने उद्भवलेल्या विकृतीचा उल्लेख 'वेडाचा एक प्रकार' असा केलेला आढळतो. मद्या-तिरेकाने उद्भवणाऱ्या विकृतीसाठी वापरण्यात येणारा 'अल्कोहोलिझम' हा शब्द मात्र अलीकडेच प्रचारात आला आहे. स्वीडिश डॉक्टर मॅग्नस हस यांनी ही इंग्रजी संज्ञा १८४९ साली प्रथम आपल्या एका लेखात वापरली व नंतर थोड्याच काळाने ती विविध युरोपीय भाषांत रूढ झाली. कधीकधी या संज्ञेऐवजी 'डिप्सोमॅनिया' ही संज्ञाही वापरली जाते. संस्कृत भाषेत याच अर्थाची मदात्यय ही संज्ञा रूढ आहे; तसेच मद्यासक्ती हीही संज्ञा पर्यायी ठरू शकेल.

मदात्यय या संज्ञेच्या व्याख्येविषयी बरेच मतभेद दिसून येतात. अगदी मर्यादित व्याख्येत या संज्ञेने अल्कोहोलाचा विषारी परिणाम तेवढा सूचित होतो. अगदी जुन्या व काहीशा विस्तृत व्याख्येनुसार अल्को-होलयुक्त पेयांच्या किंवा मद्याच्या जादा सेवनामुळे उद्भवणारी रोगट स्थिती म्हणजे मदात्यय होय. व्याख्या करणाऱ्या तज्ज्ञाच्या विषयानुसारही व्याख्येत किती तफावत पडू शकते ते पुढील दोन निरनिराळ्या तज्ज्ञांच्या मदात्ययाच्या व्याख्यांवरून दिसून येईल. सर जॉर्ज न्यूमन यांनी वैद्यकीय दृष्ट्या केलेली व्याख्या अशी : 'मदात्यय म्हणजे मद्यपानाची सवय अथवा रूढी नव्हे, तर मद्यपानामुळे उद्भवणारी रोगट स्थिती होय.' या व्याख्येपेक्षा अगदी भिन्न व्याख्या प्रा. अलेक्झांडर एल्स्टर या अर्थशास्त्रज्ञांनी दिली असून त्यांच्या मते या संज्ञेत मद्यपान ही एक सर्वसामान्य अशी सामाजिक घटना आहे, हे गृहीत धरले पाहिजे आणि म्हणून मद्यपान नियमित आहे की अनियमित आहे अथवा ते सौम्य आहे की जादा प्रमाणात आहे, हे या संदर्भात अनावश्यक समजले पाहिजे. डॉक्टरांच्या सल्ल्यानुसार करावे लागणारे मद्यपान मात्र या संज्ञेतून वगळले पाहिजे. अलीकडील वैद्यकीय विचारानुसार मदात्ययाचे दोन प्रकार होतात. एक म्हणजे तीव्र मदात्यय : यामध्ये जादा प्रमाणात अल्कोहोल पोटात गेल्याने येणारा तात्पुरता कैफ वा होणारा क्षोभ येतो. तर वरचेवर आणि दीर्घ काळपर्यंत जास्त प्रमाणात मद्यसेवन केल्याने उद्‌भवणारी रोगग्रस्त स्थिती चिरकारी वा जुनाट मदात्यय या प्रकारात येते व याच स्थितीचा येथे विचार केला आहे.

मदात्यय हा मादक पदार्थांच्या आसक्तीचाच एक प्रकार आहे. दोन्ही आसक्तींमध्ये साम्य आढ-ळते: उदाहरणार्थ अपेक्षित परिणाम साधण्यासाठी दोन्हींमध्ये मादक पदार्थांची मात्रा वाढविण्याची गरज असते. तसेच मादक पदार्थांचे सेवन बंद केल्यास विशेष प्रकारची विपरीत लक्षणे दिसून येतात. मात्र मदात्यय व इतर मादक पदार्थांची आसक्ती यांमध्ये काही भेदही आहेत. उदाहरणार्थ अफूची मात्रा हळूहळू वाढवत नेऊन १०० पट एवढी करून ती पचविता येते; परंतु मदात्ययात एवढ्या मोठ्या प्रमाणात मद्य कधीही घेता येणे शक्य नसते. शिवाय मद्यपान बंद केल्याने जी विप-रीत लक्षणे दिसतात ती सर्व व्यक्तींमध्ये आढळ-तीलच असे नाही आणि आढळली तरी ती सर्वांमध्ये सारखी असतील असेही नाही.

जागतिक आरोग्य संघटनेने मादक पदार्थांच्या आसक्तीची वा व्यसनाची जी व्याख्या केली आहे ती

अनुक्रमणिका

मदात्ययाच्या व्याख्येशी बरीचशी जुळणारी आहे. पुनःपुन्हा मादक पदार्थ घेऊन येणारी तात्पुरती वा दीर्घकालीन धुंदी, अशी ही व्याख्या असून तिची पुढील वैशिष्टचे आहेत : (१) मादक पदार्थ अखंडपणे घेत रहाण्याची गरज असते व ते कोणत्याही प्रकारे मिळविण्याची प्रवृत्ती असते; (२) मादक पदार्थाची मात्रा वाढत जाते; (३) व्यक्ती शारीरिक व मानसिक दृष्टचा मादक पदार्थावर अवलंबून रहाते आणि (४) व्यक्ती व समाजावर व्यसनाचे दुष्परिणाम होतात. अमेरिकेतील रटगर्ट्स विद्यापीठातील प्रा. मार्क केलर यांनी केलेली मदात्ययाची व्याख्या या व्याख्येशी जुळणारी आहे; ती अशी : 'मदात्यय ही चिरकारी विकृती असून तिच्यामध्ये मद्यसेवन हे सामाजिक रूढी म्हणून वा औषधी उपयोगाकरिता घेतले जात नाही आणि या मद्यसेवनामुळे पिणाऱ्याचे आरोग्य बिघडते आणि त्याच्या सामाजिक स्थानाला व आर्थिक स्थितीला धोका पोचतो.' अशा प्रकारे मदात्ययामध्ये मद्य अखंडपणे प्यावेसे वाटते व त्याची मात्रा वाढत जाते. परिणामी शारीरिक, मानसिक, सामाजिक आणि आर्थिक हानी पोचते. मद्यसेवनावर मदात्ययी व्यक्ती नियंत्रण ठेवू शकत नाही आणि शारीरिक व मानसिक दृष्टचाही अशी व्यक्ती मद्यावर अवलंबून रहाते. अशा तऱ्हेने दैनंदिन जीवनात ज्या व्यक्तीचे जगणे मद्याशिवाय अशक्य होते, मद्यपानाची उत्कट इच्छा जिला काबूत ठेवता येत नाही आणि मद्यपानाचा विपरीत परिणाम जिच्या शरीरावर, मनावर तसेच सामाजिक व आर्थिक जीवनावर झाला आहे, अशा व्यक्तीला मदात्ययी म्हणतात व त्या व्यक्तीच्या या चिरकारी विकृतीला मदात्यय म्हणतात. थोडक्यात सांगायचे झाल्यास मदात्यय म्हणजे मद्यसेवनाचा अतिरेक करण्याची अनिवार्य इच्छा वा आसक्ती होय.

मदात्ययाची विकृती जडण्यामागे निश्चित कारणे कोणती आहेत, याविषयी अचूक माहिती अजून मिळालेली नाही. या कारणांविषयी विविध मतप्रणाली असून त्यांच्यात बरीच तफावत आहे. सामान्यपणे मानसिक वा शारीरिक विकृतीतून माणूस मदात्ययी बनत असावा, असे पुष्कळांचे मत आहे. दुःख, ताण, काळजी, निराशा, इत्यादी भावना विसरण्यासाठी मद्याचा आश्रय घेतला जातो. तसेच आनंदी व उल्हसित वाटते म्हणून मद्य घेतले जाते व थोडचा मद्याने हा हेतू साध्यही होतो. परंतु काही वेळा वरील भावना नाहीशा होण्याऐवजी नुसत्या दडपल्या जातात. उदाहरणार्थ लाजाळू व्यक्ती धीट होते. तर भित्रा माणूस शौर्याचा आव आणतो. आहे त्या परिस्थितीशी जुळवून घेण्यास असमर्थ असलेली व्यक्ती अशी वस्तुस्थिती (उदाहरणार्थ गरिबी) मद्यपानाद्वारे नाकारू बघते व शेवटी मदात्ययी बनते. कधीकधी सभोवतालची स्थिती मानसिक संघर्षाची असल्यानेही माणूस मद्याकडे वळतो. आत्मघात, वर्चस्व गाजविण्याची इच्छा, शत्रुत्व, एकाकीपणा, न्यूनगंड इत्यादी अबोध मनातील भावनाही व्यक्ती मदात्ययी होण्यास कारणीभूत असू शकतात. समलिंगी संभोगाची इच्छा दडपून टाकल्यामुळेही मद्याविषयीची अनिवार्य इच्छा निर्माण होत असावी.

शारीरिक त्रुटी अथवा विकृतीही मदात्ययी होण्यामागे असाव्यात, असे शास्त्रज्ञांचे मत आहे. उलट काहींच्या मते या त्रुटी मदात्ययाने उद्‌भवलेल्या असतात. उपजत किंवा नंतर उद्‌भवलेल्या जीवरासायनिक त्रुटींमुळे मदात्यय विकृती जडते. उदाहरणार्थ अंतःस्रावी ग्रंथीतील दोषामुळे अथवा चयापचयातील बिघाडामुळे मद्याविषयीची आसक्ती ताब्यात ठेवता येत नाही. रक्तामधील क्लोराइडाची पातळी कमी झाल्याने अथवा मेंदूमधील पेशींचे कार्य नीट चालण्यासाठी त्यांना अल्कोहोलाची गरज भासू लागल्याने ही विकृती येत असावी, असेही काहींचे मत आहे. काहींच्या मते अवपोषण अथवा विशिष्ट जीवनसत्त्वांची शरीरातील कमतरता मदात्ययास कारणीभूत होते; तर इतरांना मदात्यय ही एक अन्नविषयक ॲलर्जी (अधिहर्षता) वाटते.

अलीकडील विचारसरणीनुसार लहानपणीच या रोगाची चिन्हे मूलात दिसू शकतात. शिशुवयात मातापित्यांचे प्रेम न मिळणे, अतिशय लाड होणे इत्यादी दोषांतून विकारक्षम असे व्यक्तिमत्व तयार होते. अशी विकारक्षम व्यक्ती कुमारावस्थेच्या सुमारास विकृत लैंगिक भावना जोपासू लागते आणि मद्याची नशा आपले प्रश्न सोडविण्यास मदत करू शकेल याची तिला जाणीव होऊ लागते. याच वेळेला

या भावनांना आळा घातला गेला नाही, तर अशी व्यक्ती हळूहळू मदात्ययी होण्याची शक्यता असते. कारण सामान्यपणे प्रथम चारचौघात बरे दिसावे म्हणून मद्य घेण्यास सुरुवात होते; परंतु मद्याचा ताण कमी करण्याच्या गुणामुळे आणि त्यामुळे काही काळ आनंदी व उल्हसित वाटते म्हणून एकटेपणी मद्यसेवन सुरू होते. पहिल्यासारखाच परिणाम साधण्यासाठी पुढे मद्याचे प्रमाण वाढत जाते. नंतर आपले हे व्यसन इतरांपासून दडवून ठेवण्यासाठी मद्य चोरून पिण्याची प्रवृत्ती निर्माण होते. अशा तऱ्हेने हळूहळू हे व्यसन वाढत जाऊन शेवटी मदात्ययाची अवस्था गाठली जाते. या अवस्थेत कधीकधी आवडत नसले, तरीही मदात्ययीला मद्यपान थांबविता येत नाही.

मद्याचे प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष असे अनेक परिणाम व्यक्तीवर होतात. यातूनच विविध प्रकारच्या शारीरिक व मानसिक विकृती निर्माण होतात. मद्यपानामुळे चेहरा सुजलेला व डोळे तांबडे झालेले दिसतात. कधीकधी मद्यामुळे गालाचे व नाकाचे स्नायू वाढून नाक मोठे झाल्यासारखे ( व्हिस्की किंवा ब्रँडी नोज ) दिसते. मद्यपी व्यक्तीचा आवाज घोगरा होतो, चालताना पावले वेडीवाकडी पडतात, तर बोटे कापत असतात. ही वरवरची लक्षणे सर्व मदात्ययींत आढळतातच असे नाही. अर्थात् खालील विकृतीही सर्वांमध्येच आढळणार नाहीत.

बेशुद्धी, अवपोषण, जीवनसत्त्वांची कमतरता व तिच्यामुळे उद्‌भवणारे विकार, अस्वस्थता, थकवा, अपचन, थुंकीतून रक्त पडणे, छातीत व पोटात तीव्र वेदना होणे, भूक मंदावणे, कावीळ, आकडी, पचनज व्रण ( पेप्टिक अल्सर ), त्वचा रोग, मज्जातंतूंची दाहयुक्त सूज, यकृतसूत्रण रोग (लिव्हर सिरॉसिस), अग्निपिंडाची दाहयुक्त सूज, बहुतंत्रिका-शोथ ( पॉलिन्यूरायटीस ), वर्निकचा रोग ( म्हणजे तीव्र जैव रासायनिक बदल होऊन दुहेरी दृष्टी, मानसिक विकृती व मज्जासंस्थेत काही दोष येणे ही लक्षणे असलेला रोग ), कोर्सॉकॉव्हची विकृती ( म्हणजे स्मरणशक्ती नष्ट होणे, चटकन खोटी उत्तरे देणे, कपोलकल्पित घडामोडी सांगणे इत्यादी लक्षणे असणारा रोग ), मुग्धभ्रांती भ्रम ( संपूर्ण शरीराला कंप सुटणे, दृष्टी व श्रवण यांविषयी निराधार भ्रम होणे इत्यादी लक्षणे असलेला रोग), पॅरानोइया इत्यादी विकृती मदात्ययाने उद्‌भवू शकतात. तसेच मदात्ययी व्यक्तीवर थंडी व उष्णता यांचा चटकन परिणाम होतो. अन्ननलिका व यकृत यांचा कर्करोग झालेल्या रोग्यांमध्ये मदात्ययींचे प्रमाण जास्त आढळते. औदासिन्य येणे, वृत्ती बेपर्वा होणे, विचारात गोंधळ निर्माण होणे, भावनाविवशपणे वागणे, चिकाटी व जबाबदारीची जाणीव कमी होणे, बंडखोरी करणे इत्यादी वर्तन-तऱ्हा मदात्ययींत आढळतात. तसेच असा माणूस आक्रमक, अहंकेंद्री, चिंताग्रस्त, आत्मघात वा परघात करणारा असाही बनू शकतो.

केंद्रीय मज्जासंस्था अल्कोहोलमुळे बधीर होत असल्याने तिचे विविध अवयवावर असलेले नियंत्रण कमी होते व त्यामुळे अशा अवयवांवर प्रत्यक्ष मद्यपानामुळे झालेले परिणाम अधिक गंभीर होऊ शकतात. वरीलपैकी अनेक गुंतागुंतीच्या विकृती या मद्याच्या विषारी परिणामाच्या जोडीने अवपोषणा-मुळेही उद्भवलेल्या असू शकतात. कारण मद्यामुळे भूक मंदावते, चयापचयातील समतोल बिघडतो व अल्कोहोलात कॅलरी मूल्य असले, तरी पोषण मूल्य नसते आणि या गोष्टींमुळे अवपोषण होते.

शारीरिक व मानसिक परिणामांशिवाय मदात्य-याचे समाजावर व आर्थिक व्यवस्थेवरही परिणाम होत असतात. मदात्ययी व्यक्तीची कुटुंबाविषयीची तसेच समाजाबद्दलच्या जबाबदारीची जाणीव कमी होते. त्यामुळे अशा व्यक्तीवर अवलंबून असलेल्या माणसांपुढे आर्थिक व सामाजिक समस्या उभ्या रहातात. या समस्या केवळ कुटुंबियांपुरत्याच मर्यादित न रहाता नातेवाईक व मित्रमंडळींनाही जाणवतात. यातूनच गृहविच्छेद, घटस्फोट इत्यादी घटना घडून येतात. मदात्ययाने औद्योगिक नुकसान होते. कारण मदात्ययीचे मन व शरीर खंगलेले असल्याने काम मंदावते, आजारामुळे व इतर कारणांमुळे कामगारांची गैरहजेरी वाढते. आपल्या कर्तव्याविषयी उपेक्षा वाढते. अशा प्रकारे मदात्यया-मुळे सुमारे ४ टक्के कामाचे तास वाया जातात, असा अंदाज आहे. मद्यपानामुळे गंभीर अपघातांचे




अनुक्रमणिका

प्रमाण वाढते, गुन्हेगारी वृत्ती बळावते व परिणामी समाजजीवन विस्कळित होते. यातूनच आत्महत्या, खून, लैंगिक गुन्हे इत्यादीही घडून येतात. गुन्हेगारी व मदात्यय यांच्यात काही तरी परस्परसंबंध असावा, असे आढळून आले आहे. तुरुंग व वेडयांची इस्पितळे यांतून ५० टक्के व्यक्ती मदात्ययी असल्याचे काही ठिकाणी आढळून आले आहे. वैद्यकीय दृष्टयाही हा प्रश्न महत्त्वाचा झाला आहे. मदात्ययाने माणसाचे आयुर्मान सुमारे १० ते १२ वर्षे घटते व मृत्यूचे प्रमाण वाढते. मानवी मृत्यूस कारणीभूत होणाऱ्या रोगांत हृदयविकार, कर्करोग व मानसिक रोग यानंतर मदात्ययाचा क्रम लागतो. मुलांवरही या विकृतीचा परिणाम होऊ शकतो. अशा मुलांची मज्जासंस्था सदोष असू शकते. त्यामुळे मुलांत काही विकृती राहून जातात व थोडयाशा मद्याने ही मुले आत्मघातास वा खून करण्यास प्रवृत्त होऊ शकतात. मदात्ययाने उद्‌भवणाऱ्या समस्या लक्षात घेतल्यास एकूण आर्थिक ताणही पुष्कळच पडतो. समाजकल्याण व संकटग्रस्त यांकरिता उभारलेल्या निधीवर हा आर्थिक भार पडतो. अमेरिकन शासनाला केवळ याकरिता सालिना १५ अब्ज डॉलर खर्च करावे लागतात. शिवाय अमेरिकेतील जनरल मोटर्स या कंपनीचे डॉक्टर निकोलास पेस यांच्या मतानुसार मदात्ययी कामगार वर्षातून ९३ दिवस गैरहजर रहातो व अशा कामगारांमधील आजाराचे व अपघाताचे प्रमाण इतर कामगारांपेक्षा चौपट असते. अशा प्रकारे मदात्यय ही सर्वच दृष्टींनी एक गहन समस्या होऊ पहात आहे.

मदात्यय ही केवळ शारीरिक व मानसिक विकृतीच नसून ती एक सामाजिक व काही प्रमाणात आर्थिक समस्याही आहे. त्यामुळे मदात्ययावरील उपचार करताना या सर्व बाजूंनी विचार करणे आवश्यक असते. उपचार करण्यापूर्वी रुग्णाच्या मदात्ययाचा प्रकार, त्याच्या मानसिक व शारीरिक विकृती इत्यादी गोष्टी लक्षात घ्याव्या लागतात. मदात्यय हे एक व्यसन असल्याने इतर व्यसनांप्रमाणेच हे व्यसन सुटणे मुख्यत्वे रोग्याकडून मिळणाऱ्या सहकार्यावर व बरे होण्याच्या त्याच्या निश्चयावर अवलंबून असते. याबाबतीत दुसरा कोणताही सोपा व सरळ मार्ग नाही. मदात्ययावरील उपचार हे गुंतागुंतीचे असून ते दीर्घकाळ करावे लागतात. शिवाय ते समाधानकारकपणे यशस्वी ठरतीलच, याचीही खात्री नसते. कारण मद्यसेवन पूर्णपणे थांबणे हाच रुग्ण खडखडीत बरा झाल्याचा पुरावा आहे; मात्र थोडेसेच मद्य पुन्हा घेतल्याने आजार उलटतो व आधीचे श्रम वाया जातात. मदात्ययावरील उपचारांची पुढील तीन गटांत विभागणी करता येते : (१) औषधोपचार, (२) मानसोपचार व (३) सामाजिक–आर्थिक पुनर्वसन.

रुग्णाच्या मनात मद्यपानाच्या विरुद्ध भावना निर्माण करण्याची योजना औषधोपचाराद्वारे करण्यात येते व अशा प्रकारे रुग्णाभोवती औषधी रसायनांची तटबंदी उभारण्याचा प्रयत्न करण्यात येतो. याकरिता इमिटीन, ॲपोमॉर्फीन, डायसल्फिरॅम इत्यादी वांतिकारक औषधे देतात. मात्र अशी औषधे केवळ तज्ञ व्यक्तींमार्फतच देण्यात येतात कारण ती अपायकारकही ठरू शकतात. असे औषध घेतल्याने मळमळू लागते, उलटी होते व परिणामी रुग्णांच्या मनात मद्याविषयी घृणा निर्माण होते. तसेच छातीत धडधडणे, भीती वाटणे अशा प्रकारची लक्षणेही या औषधांमुळे उद्‌भवतात आणि या भीतीपोटी मद्य सुटते, असे तज्ञांचे मत आहे. यांपैकी डायसल्फिरॅम हे औषध महत्त्वाचे व डेन्मार्कमध्ये विशेष गुणकारी ठरले आहे. ते डेन्मार्कमधील एरिक जेकबसन यांनी १९४८ साली शोधून काढले आहे. अल्कोहोलचा चयापचय होताना ॲसिटाल्डिहाइड नावाचे विषारी द्रव्य तयार होते व लगेच त्याचे निरुपद्रवी पदार्थात रूपांतर करून शरीर त्याची विल्हेवाट लावते. मात्र अल्कोहोलच्या जोडीने थोडे डायसल्फिरॅम घेतल्याने ॲसिटाल्डिहाइडचे असे रूपांतर होणे थांबते आणि ॲसिटाल्डिहाइडच्या विषारी क्रियेमुळे खूप आजारी असल्यासारखे वाटते, रक्तदाब कमी होतो, सुस्ती येते व मद्याविषयी घृणा निर्माण होते आणि एकूण या भयानक परिणामांमुळे पुन्हा मद्यपानाची इच्छा होत नाही. जपानमध्ये असेच परिणाम करणारे परंतु काहीसे सौम्य असलेले सायट्रेटेड कॅल्शियम सायनाइड हे औषध मदात्ययावर वापरले जाते. मात्र अशी औषधे मद्यपान पूर्णपणे थांबेपर्यंत चालू ठेवावी

लागतात. अर्थात् कधीकधी रोगी मद्यपानाऐवजी औषध घेणेच थांबवितो आणि रोग्याची सहकार्य करण्याची इच्छा नसल्याने प्रयोग अयशस्वी होतो. काही वेळा मद्यपान एकदम थांबल्यामुळे रुग्णाचे सर्व शरीर कंप पावते व त्याला भयानक निराधार भ्रम होतात. अशा वेळी शामक औषधे देऊन डॉक्टर रोग्याची काळजी घेतात.

याशिवाय काही औषधोपचार सहाय्यक असे आहेत. याबाबतीत औषधोपचाराद्वारे प्रथम रोग्याचे आरोग्य सुधारण्यात येते व नंतर त्याच्यावर मानसोपचार केले जातात. अशा वेळी अधिवृक्क पिंडातील ( ॲड्रिनल ) स्टेरॉइडे, ॲड्रिनो–कॉर्टिकोट्रॉपिक हॉर्मोन व विविध प्रकारची जीवनसत्त्वे देऊन रोग्याची शारीरिक स्थिती तंदुरुस्त केली जाते.

मानसशास्त्रीय उपचार अनेक प्रकारचे असून त्यांमध्ये मानसिक विकृतीचे मूळ शोधून काढून तदनुसार उपचार करावे लागतात. रुग्णाच्या मेंदूला गंभीर इजा पोचलेली नसल्यास दीर्घकाळ मानसोपचार करून रोगी बरा करणे शक्य असते. या उपचारांमध्ये रोग्याचे सहकार्य मिळविणे अतिशय आवश्यक असते व बहुधा उपचारात हाच मोठा अडथळा येतो. कारण रुग्ण आपण व्यसनी असल्याचे कबूल तर करीत नाहीच शिवाय दैनंदिन तणावांशी टक्कर देण्यास आपण समर्थ नाही, हेही त्याच्या लक्षात येत नाही. मानसोपचारांत मनोविश्लेषण, संमोहन, चर्चा इत्यादी गोष्टींचा समावेश असतो. रुग्णांचे गट करून व त्यांच्यातच चर्चा घडवून आणून जे मानसोपचार केले जातात, ते विशेष उपयुक्त ठरल्याचे आढळले आहे. प्रेमळ वागणूक व धार्मिक बाबी यांचाही या उपचारांत उपयोग होतो. रुग्ण मद्याच्या अमलाखाली असताना होणाऱ्या त्याच्या वर्तनाचे चलच्चित्रण करणे तसेच अशावेळी तो जे बोलतो त्याचे ध्वनिमुद्रण करणे अशांसारख्या आधुनिक सोयींचाही मानसोपचारात वापर होऊ लागला आहे.

मदात्ययी रुग्णांचे सामाजिक दृष्ट्या पुनर्वसन होणेही आवश्यक असते. यासाठी काही सामाजिक संस्था तसेच यासाठी असलेली व इतर काही रुग्णालये प्रयत्न करतात. तेथील सामाजिक कार्यकर्ते रुग्णाच्या वैयक्तिक व सामाजिक अडचणींकडे जातीने लक्ष देतात व या अडचणी निवारण्याचे प्रयत्न करतात. तसेच ज्या परिस्थितीमुळे मदात्ययाची विकृती उद्‌भवली आहे तशी परिस्थिती पुन्हा उद्‌भवू नये अशी विशेष खबरदारी घेण्यात येते. ‘अल्कोहोलिक्स ॲनॉनिमस’ नावाची संस्था मदात्ययींना मदत करण्यामध्ये आघाडीवर आहे. अमेरिकेच्या ओहायओ संस्थानातील ॲकरान येथे १० जून १९३५ रोजी केवळ दोघा अनामिक मद्यपी व्यक्तींनी स्थापलेल्या या संस्थेचे आता ९२ देशांतून ८० लाखांपेक्षा जास्त सभासद आहेत. मदात्ययी रुग्णांची आध्यात्मिक उन्नती घडवून आणणे, हा या संस्थेच्या कार्याचा पाया असून ही संस्था मदात्ययींना याबाबतीत स्वतःच स्वतःला मदत करण्यास उद्युक्त करते. या संस्थेच्या सभासदांच्या बायकांनी स्थापन केलेली ‘ॲल–ॲनोन’ व अशा घरांतील तरुणांनी स्थापन केलेली ‘ॲल–टीन’ या दोन संस्थांचे कार्यही जवळजवळ वरील संस्थेसारखेच आहे व त्या अनुक्रमे रुग्णाच्या कुटुंबियांना व अशा घरांतील तरुणांना मदात्ययाच्या समस्या सोडविण्यास व त्या उद्‌भवू न देण्यास मदत करतात. यांशिवाय मदात्ययाच्या समस्येविरुद्ध उभ्या राहिलेल्या अनेक सामाजिक संस्था जगभर निघत आहेत. त्यांपैकी अमेरिकेतील पुढील दोन संस्था विशेष महत्त्वाच्या आहेत. ‘अलाइड यूथ’ या संस्थेचा तरुणातील मद्यपान थांबविणे हा एकमेव हेतू आहे, तर ‘नॅशनल कॉउन्सिल ऑन अल्कोहोलिझम’ ही संस्था मदात्ययाविषयी सर्व माहिती व सल्ला देण्याचे काम करीत असते.

निरनिराळ्या देशांमधील मदात्ययी रुग्णांचे प्रमाण भिन्नभिन्न असल्याचे आढळते. तसेच नागरी व ग्रामीण भाग, वय, लिंग, वंश इत्यादींनुसारही मदात्ययाच्या प्रमाणात फरक पडलेला दिसून येतो. सामान्यतः पुरुषांमध्ये मदात्ययींचे प्रमाण स्त्रियांपेक्षा सहापट अधिक आढळते, तर ३० ते ५५ वर्षे या वयोगटात मदात्ययी व्यक्ती जास्त प्रमाणात आढळतात. १९७० च्या एका पहाणीनुसार एकट्या अमेरिकेत ५४ लाख लोक मदात्ययाने पछाडलेले होते व त्यांपैकी ९ लाख स्त्रिया असाव्यात. याचाच अर्थ

अमेरिकेतील २० वर्षांपुढील प्रौढांमध्ये २.४ टक्के लोक मदात्ययी होते. परंतु यामध्ये ज्यांना खरेखुरे मदात्ययी म्हणता येणार नाही, मात्र जे त्या मार्गावर आहेत, अशा ४० लाख लोकांचा समावेश केलेला नाही. काही देशांमधील मदात्ययी व्यक्तींचे शेकडा प्रमाण पुढे दिले आहे. परंतु हे आकडे निश्चित स्वरूपाचे नाहीत. कारण ते मदात्ययाच्या सारख्याच व्याख्येनुसार घेतलेले नाहीत. डॉ. ई. एम्. जेलिनेक यांच्या मते अमेरिकेतील मदात्ययाची व्याख्या ही फ्रान्समधील मदात्ययाच्या व्याख्येहून वेगळी आहे, तर फिनलंडमधील मदात्ययाची व्याख्या या दोन्ही व्याख्यांपेक्षाही भिन्न आहे.

**मदात्ययींचे प्रमाण दर्शक तक्ता :—**

| देश | कॅनडा | स्वीडन | फिनलंड | उत्तर आयर्लंड | इंग्लंड व वेल्स | इटली | चिली | स्वित्झर्लंड | फ्रान्स |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| प्रमाण % | २·४ | ३·५ | १·१ | ०·८ | १·१–११ | ०·४१ | ५·४ | २·२–१३ | १५ |








**ग्रंथ-परिचय : अ. र. कुलकर्णी**

# ड्रिंक : ॲन इकॉनॉमिक ॲंड सोशल स्टडी : हर्मन लेव्ही

[ हर्मन लेव्ही ह्यांचा प्रस्तुत ग्रंथ लंडन यथे १९५१ मध्ये 'रूटलेज ॲण्ड केगन पॉल लिमिटेड' ह्या प्रकाशनसंस्थेतर्फे प्रकाशित झाला. (पृ. २५६) त्याचा संक्षिप्त परिचय येथे दिला आहे. – का. सं. ]

– मद्यपानाची समस्या जागतिक स्वरूपाची असून तिला तिच्या वैद्यकीय बाजूबरोबरच सामाजिक, आर्थिक, नैतिक असे अनेक प्रकारचे संदर्भ असल्यामुळे ती अधिकच संकुल आणि वादग्रस्त झालेली आहे. अशा परिस्थितीत, मद्यपानाची वस्तुनिष्ठ चिकित्सा करून तिचे निष्कर्ष समाजापुढे ठेवणे हे त्या समस्येच्या विविध अंगोपांगांशी निगडित असलेल्या तज्ञांचे काम आहे; आणि अशा निष्कर्षांतूनच त्या समस्येचे एक सलग आणि बरेचसे स्पष्ट असे चित्र विचारकर्त्यांच्या समोर उभे राहील. हर्मन लेव्ही ह्यांच्या 'ड्रिंक : ॲन इकॉनॉमिक ॲण्ड सोशल स्टडी' (१९५१) ह्या ग्रंथात मद्यपानाचा असा सांगोपांग विचार करण्याच्या दृष्टीने एक भरीव प्रयत्न केलेला आहे.

मद्यपानाच्या समस्येचे स्वरूप, तिची व्याप्ती आणि तिच्यावर नियंत्रण ठेवण्याच्या कार्याची दिशा असे तीन विषय ह्या ग्रंथाच्या तीन विभागांतून चर्चिले आहेत. ह्या पुस्तकाच्या संदर्भात दोन गोष्टी लक्षात ठेवणे आवश्यक आहे. हे पुस्तक १९५१ साली प्रकाशित झालेले असल्यामुळे त्यातील विवेचनाला त्या सालाची मर्यादा आहे. तसेच त्यातील चर्चा मुख्यतः इंग्लंडमधील मद्यपानविषयक परिस्थितीला अनुलक्षून केलेली आहे.

मद्यार्काचे मानवी देहावर कोणते परिणाम होतात, ह्याची उपयुक्त चर्चा ग्रंथाच्या पहिल्याच प्रकरणात आढळते. मद्यार्क हा चेतक किंवा 'स्टिम्यूलंट' असतो अशी जी समजूत आहे तिला वैद्यकीय आधार नाही. तो एक अमली पदार्थ आहे. मेंदूतील मज्जांची नाजूक केंद्रे निवडून त्यावर तो परिणाम घडवून आणतो आणि विचार-भावनांवर नियंत्रण ठेवणारी यंत्रणा काही काळ निकामी करतो. त्यामुळे भयचिंता तात्पुरत्या दूर झाल्यासारख्या वाटतात; मनावरील ताण सैलावल्याची आणि एक प्रकारच्या आत्मविश्वासाची जाणीव होते; परंतु मेंदूतील नियंत्रक-यंत्रणेवर होणाऱ्या ह्या आघाताची अंतिम परिणती असंबद्ध वर्तनातही होते. शरीरावर परिणाम घडवून आणण्याची मद्यार्काची ही क्षमता लक्षात घेतल्यास मद्यार्क ही एक 'ड्रग' किंवा औषधी आहे, असे म्हणता येईल. शरीरात कार्यशक्ती निर्माण करण्यासाठी आवश्यक असलेले इंधनही मद्यार्कातून मिळत असल्यामुळे एका मर्यादित अर्थाने त्याला काही अन्नमूल्यही आहे; तथापि एक औषधी म्हणून मद्यार्काचे शरीरावर होणारे दुष्परिणाम लक्षात घेतले, तर ह्या अन्नमूल्याचे महत्त्व विचारार्ह ठरत नाही. भोजनाबरोबर परिमित मद्यपान केल्यास ते काही प्रमाणात उपकारक ठरेल. मर्यादित सेवनाने चिंतांचे ओझे थोडा वेळ विसरून माणूस सुखाने जेवणार असेल, तर त्याची भूक एरव्हीपेक्षा अधिक प्रदीप्त होईल आणि भोजनही त्याला अधिक आस्वाद्य वाटेल. भोजनाच्या वेळची ही मानसिक स्थिती पचनक्रियेलाही अनुकूल ठरेल. मद्यपान का केले जाते ? एक अमली पदार्थ म्हणूनच काही लोक मद्याकडे आकर्षिले जातात. काही विशिष्ट प्रकारची कामे करणारा कामगारवर्ग एक-नित्य नैमित्तिक म्हणून मद्यपान करताना आढळतो. ह्या कामगार-वर्गांत प्रवेश मिळाल्यानंतर संबंधित

कामगार मद्यपानापासून दूर राहूच शकत नाही. इतर कामगारांचे फार मोठे दडपण त्याच्यावर येत राहते आणि त्या दडपणाला बळी पडून तो एकदा पिऊ लागला, म्हणजे त्याच्या पिण्याला बहुधा मर्यादा राहत नाही. धार्मिक वा सामाजिक चालीरीतीचा भाग म्हणूनही मद्य दिले-घेतले जाते. ह्याबाबत व्यक्ती निर्णय-स्वातंत्र्य मिळणे दुरापास्त असते. ३) मद्यपानामुळे रोग बरे होतात; प्रकृती उत्तम राहते, अशा भावनेनेही लोक मद्य घेतात. अशा तऱ्हेच्या समजुतीला वैद्यकशास्त्राचा फारसा आधार नाहीच. तथापि अशा कल्पना मनात बाळगून मद्याच्या साहाय्याने स्वतःच स्वतःवर उपचार करून घेण्याची घातुक प्रवृत्ती सर्वसामान्यात बळावते. मलावरोधावर बीअर पिणे हा एक उपाय आहे अशी एखाद्याची समजूत झाली, तर जितकी अधिक बीअर प्यावी तितका मलावरोध अधिकाधिक कमी होईल अशीही त्याची कल्पना होणे अगदी शक्य आहे. इतकेच नव्हे तर ह्या उपायाने आपणास 'बरे वाटत' असल्याचा भ्रमही त्याचे मन जोपासत राहील.

मद्यपानामागची ही तीन प्रमुख कारणे पाहिली, तर ह्या समस्येचा समाजशास्त्रीय संदर्भ किती व्यापक आहे, ह्याची कल्पना करता येईल. शिवाय अमुक एक व्यक्ती किंवा समाजातील अमुक एक वर्ग मद्यपान अधिक प्रमाणावर करतो आणि इतर काही व्यक्ती वा वर्ग मद्यपान करीत नाहीत किंवा केले तर त्यांचे प्रमाण नेमस्त असते, ह्या वस्तुस्थितीचा उलगडा ही तीन कारणे नमूद करून होत नाही. कोणत्याही कृतीमागील उद्दिष्टे आणि प्रेरणा व्यक्तिसापेक्ष आणि गुंतागुंतीच्या असतात. तरीही त्याबाबत काही सामान्य सूत्र शोधण्याचा प्रयत्न करता येईल. विख्यात अर्थतज्ज्ञ ॲडम स्मिथ ह्याने आपल्या 'द वेल्थ ऑव्ह नेशन्स' ह्या ग्रंथात एक निरीक्षण दिले आहे, ते असे : ज्या देशात मद्यनिर्मिती विपुल प्रमाणावर होत असते, जेथे मद्य अगदी स्वस्त दराने मिळते तेथे अतिरिक्त मद्यपानाचे प्रमाण कमी असते; उदा, स्पेन, इटली, फ्रान्सचा दक्षिण भाग. ह्या उलट, जेथे मद्य तयार होत नाही; जेथे ते महाग असते अशा ठिकाणी 'दारूबाजी,' आढळते. उष्ण कटिबंधातील काही देशांकडे उदाहरण म्हणून बोट दाखविता येईल. एखादी फ्रेंच रेजिमेंट उत्तर फ्रान्समधून दक्षिण फ्रान्समध्ये येते, तेव्हा दक्षिण फ्रान्समधील स्वस्त आणि भरपूर मद्य त्या सैनिकांना झपाटून टाकते; पण काही महिन्यांनंतर ते सैनिक पुन्हा नेमस्त होतात. मद्याची 'नवलाई' त्यांच्या दृष्टीने संपलेली असते. जेथे मद्याला मोठी किंमत द्यावी लागते, तेथे फक्त श्रीमंत लोकच मद्य घेतात असे नव्हे. ज्यांना ती किंमत परवडण्यासारखी नसते, असे लोकही मद्यपेयांचे व्यसन करतात.

मद्यपान आणि हवामान ह्यांतही निर्णायक स्वरूपाचा संबंध आहे, असे म्हणता येत नाही. एकाच प्रकारचे हवामान असलेल्या दोन प्रदेशांत मद्यपानाबाबत वेगवेगळी परिस्थिती आढळते.

असमाधानी गृहजीवन जगणाऱ्यांना पब् किंवा मद्यालयातले मुक्त जीवन मोहविते. आपला बहुतेक फावला वेळ मद्यालयात घालविणारे स्त्री–पुरुष आढळतात. मद्यालय बंद झाल्याखेरीज हे लोक घरी जात नाहीत. काही लोकांची घरे चांगली नसतात. तेथे राहण्याची सोय चांगली नसल्यामुळे खऱ्याखुऱ्या अर्थाने कौटुंबिक जीवन जगताच येत नाही. अशा परिस्थितीतही माणसे मद्यालयाकडे वळतात. मद्याची धुंदी सामूहिकपणे अनुभविण्याचे आकर्षण काहींना असते. एकट्याने पिण्यापेक्षा दहा बारा किंवा त्यांहून अधिक लोकांनी एकत्र जमून मद्यपान करावे; सामाजिक निर्बंध विसरावे आणि एरव्ही न लाभणाऱ्या स्वातंत्र्याचा मनमुराद आस्वाद घ्यावा अशी वृत्ती ह्या सामूहिक मद्यपानामागे असते, मद्यामुळे रोग बरे होतात आणि कार्यक्षमता वाढते. ह्या समजुतीचा मद्यनिर्माते कौशल्याने उपयोग करून घेतात. बीअरच्या बाटल्या हातात घेऊन मेहनतीचे काम करणारे कामगार जाहिरातीत दाखविले जातात; 'मेडिकेडेट वाइन्स' सारखे शब्दप्रयोगही हेतुतः योजिले जातात. मद्यपानाच्या बाबतीत कार्यकारणांची विषारी वर्तुळे अनेकदा पाहावयास मिळतात. मद्यपानामुळे रोग होऊ शकतो; परंतु एखादा रोग झाल्यामुळे माणूस मद्य घेऊ लागतो; मद्यप्याला दारिद्र्य येते; परंतु दारिद्र्याचे दुःख विसरण्यासाठीही कोणी मद्यपी होतो. ही सारी

गुंतागुंत विचारात घेतली, की मद्यपान आणि अनैतिकता ह्यांची सरळ सांगड घालण्याच्या प्रवृत्ती-मागे पुरेसा सामाजिक विचार नाही, अशी जाणीव होते. दर महिन्याच्या आपल्या कौटुंबिक अंदाज-पत्रकाचा एकतृतीयांश किंवा चतुर्थांश भाग स्वतःच्या मद्यपानासाठी खर्च करणारे सुशिक्षित लोक सामा-जिक पहाणीत आढळून आलेले आहेत. काहींना वाटते, की ही स्वार्थी वृत्ती म्हणजे आदिम, रानटीमाण-साचे आजही आपणात असलेले अवशेष होत, किंवा गुलामांचे रक्त अद्याप आपणात खेळत असल्याचा प्रत्यय होय. आदिम माणूस आपल्यापुरते पहावयाचा; जे मिळेल ते पूर्ण संपेपर्यंत त्यावर तुटून पडायचा. गुलामांना स्वतःच्या मालमत्तेचा हक्क नव्हता त्यामुळे त्यांना काही शिल्लक टाकायची आवश्यकता नसे ! वस्तुस्थितीचे हे विश्लेषण अर्थातच फारसे पटण्यासारखे नाही; परंतु कुटुंबाकडे लावावयाचा बराचसा पैसा मद्यावर खर्च होतो, हे मात्र खरे.

मद्यपान करणाऱ्या माणसांचे समाजावर काय परिणाम होतात, ह्याचाही शोध घेण्याचा प्रयत्न झालेला आहे. अतिरिक्त मद्यपानाचा कार्यक्षमतेवर नक्की परिणाम होतो. जेथे कमालीचा अचूकपणा; सूक्ष्म दृष्टी, विचारपूर्वक पण तडकाफडकी निर्णय घेण्याची जबाबदारी आवश्यक असते, तेथे मद्या-पासून दूर राहणारी माणसे जास्त उपयुक्त ठरतात, असा अनुभव काही अहवालांत नमूद आहे. औद्योगिक कामगार, मोटर ड्रायव्हर्स ह्यांचे पिण्याचे व्यसन अपघात घडवून आणू शकेल. मद्यपान आणि गुन्हेगारी ह्यांच्यातही परस्परसंबंध असतो, असे मानणारे आहेत. तथापि पुष्कळसे गुन्हे मुळात गुन्हेगारी प्रवृत्तीमुळे होतात. मद्यसेवनामुळे गुन्हा करण्याची मूळचीच इच्छा ते करण्यापूर्वी अधिक तीव्रोत्कट होत असेल, असे काही तज्ज्ञांचे मत आहे. काही काही गुन्हे तर असे आहेत, की ते करण्यापूर्वी गुन्हेगार मद्यपान टाळतातच. उदा., घरफोडी वा दरोडे. दीर्घकालीन मदात्ययाने ( क्रॉनिक अल्को-होलिझम ) पछाडलेल्या लोकांकडून मात्र आक्रमक स्वरूपाचे गुन्हे घडल्याची बरीच उदाहरणे आहेत. एका सर्वेक्षण समितीने घेतलेल्या शोधात सर्व-सामान्य स्वरूपाचे सु. ४० टक्के गुन्हे प्रत्यक्षा-प्रत्यक्षपणे मद्यपानामुळे घडलेले होते.

लेव्ही ह्यांच्या ह्या ग्रंथात, मद्यपानसमस्येचे परिणाम निदर्शनास आणून देणाऱ्या काही 'केसीस' दिलेल्या आहेत : एक कारकून सांगतो, 'मी ज्या दिवशी पब्मध्ये जात नाही, त्या दिवशी झोप येण्यासाठी मला अॅस्पिरिनची एक गोळी घ्यावी लागते; दुसऱ्या दिवशी दोन गोळ्यांशिवाय भागत नाही आणि तिसऱ्या दिवशी... मला पब्मधे जावेच लागते...'

एका मध्यमवयीन गृहस्थाने आपल्या बायकोचा गळा दाबून तिला ठार केले. ती खूपच प्यायची आणि त्याच्यावर हल्ला करायची. एकदा बीअरच्या बाटल्या तिने त्याच्या कपाळावर हाणल्या होत्या. त्यानंतर एक दिवस एका हातात चाकू आणि दुसऱ्या हातात एक तीक्ष्ण पोकर घेऊन ती त्याच्या अंगावर धावली. झालेल्या झटापटीत नवऱ्याने तिचा गळा दाबला. न्यायमूर्तींनी त्याला फक्त पाच दिवसांच्या तुरुंगवासाची शिक्षा दिली....

मद्याच्या प्रभावाखाली असलेल्या एका माणसाने रेल्वे स्टेशनवर उभ्या असलेल्या एका माणसाला गाडीखाली ढकलले....

ग्रंथाच्या दुसऱ्या विभागात ह्या समस्येची सांख्यिकीय दृष्टिकोणातून केली जाणारी चौकशी ( स्टॅटिस्टिकल इंक्वायरी ); सांख्यिकीय विश्ले-षण आणि मद्यपानाचे प्रमाण कमी करण्यास अस-लेला वाव ह्या विषयांचा विचार करण्यात आला आहे. सांख्यिकीय सामग्री गोळा करण्याचे झालेले प्रयत्न, त्यांचे निष्कर्ष आणि महत्त्व सांगून अशा प्रयत्नांच्या मर्यादाही ग्रंथकर्त्यांने दाखवून दिलेल्या आहेत. मद्यपानासारखे सामाजिक प्रश्न एवढे गुंता-गुंतीचे आहेत की त्यांच्यासंबंधी केलेल्या संशोधना-तून येणाऱ्या माहितीला तिच्या अशा काही मर्यादा असणारच; परंतु पुष्कळदा संशोधनाची तंत्रेच अपुरी पडतात किंवा त्यांची दिशा चुकते. उदा. मद्यपान करणाऱ्या कुटुंबांचा मद्यपानावर होणारा खर्च किती, ह्याची सरासरी काढायची असेल, तर नित्य मद्यपान करणारी कुटुंबे निवडून त्यांचे सर्वेक्षण करायला हवे. असे न होता, अनेकदा प्रासंगिक मद्यपान

करणाऱ्या कुटुंबांचाही त्यात समावेश केला जातो. त्यामुळे येणारी सरासरी कमी होण्याची शक्यता असते. इंग्लंडमधील मद्यपानाचे सांख्यिकीय निष्कर्ष दाखविणारे काही तक्तेही ग्रंथात आहेत. मद्यपानावर होणारा खर्च हा राष्ट्रीय संपत्तीच्याच होणाऱ्या खर्चाचा एक भाग असल्यामुळे त्याचा विचार करणे सरकारला भाग पडते. राष्ट्रीय संपत्तीच्या एकूण व्ययात मद्यपानावर नागरिकांनी केलेल्या खर्चाचे प्रमाण मोठे असेल, तर ते कमी करण्यासाठी लोकशाहीवादी सरकारनेही आवश्यक तो हस्तक्षेप केला पाहिजे आणि ह्या खर्चांवर काही मर्यादा घातली पाहिजे. ह्यातून नागरिकांचा जो पैसा वाचेल तो सर्व त्यांच्या अधिक गरजेच्या वस्तूंसाठीच वापरला जाईल अशी अपेक्षा करता येत नसली, तरी असा बराचसा पैसा चांगल्या, विधायक कारणांसाठीच वापरला जातो, असे दाखविणारी उदाहरणे आहेत.

मद्यपानाची समस्या सोडविण्याचा समजुतदारपणे प्रयत्न करण्यावर ग्रंथकर्त्याचा भर आहे. ग्रंथाच्या तिसऱ्या विभागात हे स्पष्ट करण्यात आले आहे, की प्रश्न केवळ अतिरिक्त मद्यपानाचा असता तर तो सोडविणे तितकेसे अवघड नव्हते. मोटर भरधाव हाकण्यामुळे होणारे अपघात टाळण्यासाठी वेगावर कायद्याचे नियंत्रण जसे ठेवतात तसे काही बंधन मद्यपानावर ठेवता आले असते. मद्यपानाचे स्वातंत्र्य मान्य केल्यानंतर नेमस्त आणि अतिरिक्त मद्यपानात सर्वसामान्य स्वरूपाची अशी स्पष्ट रेषा आखून देणे कठीण आहे; तरीही मद्यपान कमी करण्याच्या दृष्टीने जे धोरण आखावयाचे त्यात अशा प्रकारची रेषा अनुस्यूत असायला हवी. त्याचप्रमाणे मद्यपानाचे आकर्षण अन्य कोठे वळवता येण्याची शक्यताही तपासून पाहावयास हवी. चित्रपटगृहे, क्रीडांगणे, सुंदर उद्याने यांमध्ये वाढ करणे; तसेच प्रेक्षणीय स्थळे पाहाण्यासाठी प्रवासखर्चात उदार सवलती देणे अशा काही धोरणांतून हे साधण्याच्या प्रयत्नांवर विचार करता येईल. दुसरा मार्ग लोकजागृतीचा. मद्यपानाचे दुष्परिणाम लोकांना समजावून देणे; त्यांना मद्य पिण्यापासून परावृत्त करणे हा. तिसरा मार्ग मद्यपाननियंत्रक कायद्याचा. समाज शैक्षणिक दृष्टया उन्नत झाला; त्याचे जीवनमान वाढले; गरजांमध्ये वैविध्य आले तर त्यामुळे मद्यपानाला आळा बसेल, अशी अपेक्षा व्यक्त केली जाते, तीत काही प्रमाणात तथ्यही आहे. तथापि ह्याबाबत प्रत्यक्ष पुरावा मिळाल्याखेरीज निश्चित काही सांगणे कठीण आहे. इंग्लंडसारख्या देशात आपल्या घरापुढील छोटया बागांत लोक रस घेऊन काम करतात, असे कांही सर्वेक्षणांत आढळून आले त्यांतील बऱ्याच लोकांना बाग असलेली घरे नव्याने मिळालेली होती आणि ती मिळण्यापूर्वी त्यांचा तो वेळ मद्यपानात जाई. गृहयोजना ह्या दिशेने अमलात आणल्या तर त्याचा काही लाभ होणे शक्य आहे. लोकांनी स्वेच्छेने मद्यपानापासून परावृत्त व्हावे ह्यासाठी 'टेपरन्स मूव्हमेंट' ह्या नावाने ओळखली जाणारी चळवळ अस्तित्वात आली. त्या चळवळीचे विस्तृत विवेचन लेव्ही ह्यांनी केलेले आहे, या चळवळीला मिळालेला प्रतिसाद लक्षणीय आहे. मद्यबंदीला कायद्याने आळा घालण्याबाबत दोन विचारप्रवाह दिसतात. पहिला, संपूर्ण दारूबंदी हा आणि दुसरा मर्यादित दारूबंदीचा. संपूर्ण दारूबंदीचा प्रयोग अमेरिकेत केला गेला आणि तो अयशस्वी ठरला; फिनलंड आइसलँडमध्ये हेच घडले; त्यामुळे संपूर्ण दारूबंदीच्या प्रयोगाच्या यशस्वितेबाबत अनेकांच्या मनात शंका असतात. संपूर्ण दारूबंदी न करता मद्यपानावर वेगवेगळ्या प्रकारे नियंत्रण कसे ठेवता येईल हा प्रश्नही ह्या ग्रंथात चर्चिला आहे. उदा. दारू पिऊन मोटर हाकणाऱ्याचे ड्रायव्हिंगचे लायसन्स रद्द करणे; दारूबाजास त्याच्या घरापासून दूर ठेवून त्याच्यावर सरकारने प्रत्यक्ष नियंत्रण ठेवणे; मद्यविक्रीच्या केंद्रांवर नियंत्रण ठेवणे; मद्यपानासाठी परवानापद्धत ठेवणे असे नियंत्रणाचे काही प्रकार आहेत. अशा प्रकारच्या नियंत्रणांचा काही उपयोग होतोच; मात्र ती नियंत्रणे अमलात आणण्यात तांत्रिक वा व्यावहारिक अडचणी बऱ्याच येऊ शकतात. परवानापद्धतीचा अनेक अंगांनी केलेला विचार आणि चिकित्सा एका स्वतंत्र प्रकरणात अंतर्भूत आहे. मद्यनिर्मितीचा व्यवसाय; त्याची व्याप्ती आणि सामर्थ्य ह्यांचे तपशीलवार वर्णन ग्रंथात दिलेले आहे. आपले हितसंबंध राखण्यासाठी हा व्यवसाय सातत्याने दक्ष असतो. त्यावर येणाऱ्या वा येऊ पाहणाऱ्या प्रत्येक नियंत्रणावर दडपण कसे आणता

येईल किंवा त्याला प्रभावी विरोधी प्रतिक्रिया कशी तावडतोब देता येईल, हे नेहमीच पाहिले जाते. मद्यपानविरोधी साहित्य शाळेच्या सक्तीच्या अभ्यासक्रमाचा भाग बनवावा, ह्या विचारालाही ह्या व्यवसायाने कसून विरोध केलेला आहे. असा विरोध व्यक्तविण्यासाठी ह्या व्यावसायिकांकडे स्वतःची पत्रे आहेत. मद्य खपविण्यासाठी जाहिरात मात्र भरपूर करण्यात येते. 'ज्यांना बीअरची चव ठाऊक नाही अशा हजारो लाखो तरुणांना आपण ती प्यायची सवय लावली पाहिजे' असे उद्‌गार इंग्लंडमधील 'ब्रूअर्स सोसायटी'च्या एका डायरेक्टराने काढले होते !

त्या प्रश्नाची संतुलता अशा अनेक प्रकारे स्पष्ट केल्यानंतरही तो सोडविण्याची आवश्यकता अखेरीस ग्रंथकाराने प्रतिपादिली आहे. प्रश्न गुंतागुंतीचा असला, म्हणून तो सोडविण्याबाबत नाउमेद होणे किंवा स्वयंतुष्ट वृत्तीने त्या प्रश्नाचे अस्तित्वच नाकारणे समाजाच्या दृष्टीने अत्यंत धोक्याचे ठरेल; असा इशाराही त्याने दिला आहे.

भारतीय समाजस्थितीच्या पार्श्वभूमीवर असाच एखादा चिकित्सक ग्रंथ या देशात निर्माण झाला तर 'मद्यबंदी'च्या वादग्रस्त प्रश्नाच्या अनेक बाजू प्रकाशात येतील असे वाटते.

---

ज्योतिषी माझी पत्रिका पाहून मला सांगतात
मी अल्पायुषी आहे.
सेल्युकस, मी आहे अल्पायुषी,
पण मला त्याची चिंता नाही.
सारेजण एकाच मार्गाने वैतरणेकडे निघालेले असतात.
आणि माझा मार्ग जर शीघ्र असेल
तर यमाचे दर्शन मला अगोदर होईल.
चला, आपण प्यायला बसू या.
कारण हे सत्य आहे, की जीवनाच्या मार्गावर
मद्य हा वारू असतो !
जे पायांनी वैतरणेकडे जातात त्यांच्या मार्गावर दगडधोंडे असतात.

**– अँटिपेटर, सायडॉन** ( ख्रि. पू. ५ वे शतक ).

मी ऐकली फुलून आलेल्या वसंताच्या पावलांची चाहूल,
मधाळ मद्याचा प्याला ! किती जलद मिसळता तो, पाहू या.

**– अल्कमन, स्पार्टा** ( ख्रि. पू. ६०० ).

अनुक्रमणिका

नरेश परळीकर

# मद्यपान आणि आदिवासी :

मद्यपानास आदिम जनजीवनात वैशिष्टयपूर्ण स्थान प्राप्त झालेले आहे. नागरी आणि ग्रामीण जनजीवनाशी तुलना करता आदिम जीवनाच्या मद्यपानामागील प्रेरणा आणि हेतू हे अगदीच भिन्न असतात. नागरी व ग्रामीण जीवनात मद्यपानाचा वापर करमणुकीसाठी, आरोग्यासाठी किंवा आयुष्यातील दुःख विसरण्यासाठी केला जाईल; परंतु आदिवासींच्या जीवनात मद्यपानाने व्यक्तीचे व समूहाचे संपूर्ण जीवनच व्यापून टाकले आहे. जन्म, बारसे, विवाह, सण, उत्सव, आजार, मृत्यू- इत्यादी जीवनातील अनेक महत्त्वाच्या प्रसंगी त्यांच्यात मद्यपान केले जाते.

मानव जातीचे आदिम अवस्थेतील सामाजिक वर्तन लक्षात घेता धर्म आणि यातुक्रिया यांचा त्यावर फार मोठा प्रभाव असलेला दिसून येतो. यातुक्रियेने प्रेरित झालेले मानवी जीवन प्रत्येक वस्तूमध्ये आत्म्याचे अस्तित्व मानीत होते. झाडे, फळे, फुले, नद्या, पर्वत, प्राणी, पक्षी या सर्व वस्तूंमध्ये आत्मा आहे अशी त्यांची श्रद्धा होती. मानवशास्त्रज्ञ ह्यालाच जडप्राणवाद म्हणतात.

निसर्गाच्या सान्निध्यात जीवन जगत असताना अनेकविध समस्या आणि आवाहने त्यांच्या समोर उभी असतात. वारा, वादळे, नद्यांना येणारे पूर यांसारखी नैसर्गिक संकटे; आजार, मृत्यू यांसारख्या कौटुंबिक किंवा सामूहिक जीवनात घडणाऱ्या घटना; यांना तोंड कसे द्यावे, ही आदिम जीवनातील एक समस्याच होती. निसर्गघटना नियंत्रित करण्यासाठी प्रत्येक वस्तूमधील स्थित असलेल्या आत्म्यास वश करून घेणे व आलेले अरिष्ट टाळणे हाच एक मार्ग उपलब्ध होता. यातूनच यातुक्रिया (Magic) निर्माण झाली आणि यातुक्रिया करणाऱ्या यातुकाला समूहात एक अनन्यसाधारण असे स्थान प्राप्त झाले.

यातुक हा दैवी शक्ती प्राप्त झालेला असा असतो. त्याला ती निसर्गतःच प्राप्त झालेली असते. कृषि-जीवन जसे विकसित झाले, तसे यातुकाचे महत्त्व वाढवणाऱ्या दोन अनुकूल घटना निर्माण झाल्या. एक म्हणजे समूहजीवन हे अधिकाधिक निसर्गावर अवलंबून राहू लागले, म्हणजे शेतीसाठी पावसाची आवश्यकता असल्यामुळे निसर्गाची लहर लागली तरच पाऊस येणार; शिवाय पिकावरील कीड, रोग यांसारखी संकटे; या वातावरणशास्त्रीय घटना नियंत्रित करण्यासाठी यातुकाच्या व्यवसायाची गरज निर्माण झाली. दुसरी घटना म्हणजे, कृषि-विकासाबरोबरच अर्थव्यवस्थेचाही विकास होऊ लागला. त्यामुळे यातुकाला स्वतःच्या यातुक्रियेच्या व्यवसायावरच निर्वाह करणे सोईचे बनले. म्हणून यातुकाच्या व्यवसायाला भरभराट येऊ लागली. निसर्गतःच एखाद्या व्यक्तीला चित्‌शक्तीचे (Spirit) वरदान प्राप्त होऊन संचार झाला तर उत्तमच; परंतु असे घडले नाही तर चित्‌शक्तीला आवाहन करून तिला वश करून घेणे भाग पडे. म्हणून तन्मयावस्था निर्माण होऊन संचार होण्यासाठी मद्याचा वापर आवश्यक ठरला. अशा-रीतीने संचार होऊन आत्मे वश झाले, की रोग बरे करता येतात, शकून सांगता येतात, पाऊस पाडता येतो, थांबवता येतो.

सुफलीकरणाचे विधी आदिम जीवनातील महत्त्व-पूर्ण असे धार्मिक विधी असतात. कृषिजीवनाच्या विकासाबरोबरच सुफलीकरणाच्या विधींना महत्त्व

अनुक्रमणिका






आले आणि स्त्रीपुरुष समूहाने हे विधी साजरे करीत असताना मद्यपानाचा उपयोग सुरू झाला. तन्मयावस्था ( Ecstasy ) प्राप्त होऊन संचार होण्यासाठी मद्यपान आणि इतर मादके (Narcotics) यांचा उपयोग सुरू झाला.

मद्याचा उपयोग केव्हा सुरू झाला हे निश्चितपणे सांगता येणार नाही. वेदवाङ्मयात सोमाचा उल्लेख आढळतो. सोम पिऊन झिंगलेल्या इंद्राची आणि देवांची अनेक वर्णने वेदवाङ्मयात आढळून येतात. अमरत्व प्राप्त करून देणारे पेय असे सोमाचे वर्णन केले जाते. परंतु या स्वरूपाचे उत्तेजन देणारे पेय त्यापूर्वीही असलेच पाहिजे.

व्याध संस्कृतीचे समृद्ध अनुभव पाठीशी घेऊन मानव जातीने अन्नसंग्रहाच्या अवस्थेत प्रवेश केला. फळे, कंदमुळे जमा करायची, खायची, साठवून ठेवायची. अशा प्रकारे फळांच्या, फळांच्या रसाच्या साठवणीतूनच मद्याचा शोध लागला असावा. फळांचा रस साठवल्यानंतर तो आंबतो, यामागील कार्यकारणभाव लक्षात आल्यानंतर आंबवण्याची क्रिया सुरू झाली. कृषिसंस्कृतीचा जसा उदय होत गेला तशी निरनिराळी धान्ये मद्यनिर्मितीसाठी वापरली गेली.

भारतामधील आदिवासींमध्ये मोहाची फुले, तांदूळ, गूळ या पदार्थांचा वापर मद्यनिर्मितीसाठी केला जातो. या शिवाय, द्राक्षे खजूर, उसाचा रस, बीट वगैरे शर्करायुक्त पदार्थ आंबले, की मद्य तयार होते, हे कळल्यानंतर मद्यनिर्मितीसाठी यांचाही वापर सुरू झाला.

बहुसंख्य आदिम जमातींमध्ये मद्यनिर्मिती हा एक आचारविधी आहे. मद्यपानामुळे शरीराला, मनाला मिळणारे उत्तेजन, या मागील कारणांचे शास्त्रीय ज्ञान नसल्यामुळे एरवीच्या अवस्थेपेक्षा मद्यपानानंतर निर्माण होणारी अवस्था 'चित्‌शक्ती'च्या संचाराने निर्माण होते असे समजले जाई.

ज्या वस्तूचे मद्य बनवले गेले, त्या वस्तूतील 'चित्‌शक्ती' मद्यपानाने, आपल्या शरीरात येते; अशी कल्पना असल्यामुळे, मद्यनिर्मितीच्या संबंधी असलेल्या सर्व वस्तूंना पावित्र्य प्राप्त झालेले दिसते.

काही जमातींत स्त्रियांना मोहाच्या झाडाला स्पर्श करू दिला जात नाही. मासिक पाळी चालू असताना मद्याला स्पर्श झाल्यास मद्य खराब होते, अशा समजुती आहेत. बिसनशिंगी माडिया या जमातीत, सुनेच्या नात्यातील स्त्रीने तांदुळाचे मद्य तयार करून कुटुंबप्रमुखाला द्यायचे असते; परंतु मोहाच्या झाडापासून तयार झालेले पहिले मद्य मात्र स्त्रियांना घेता येत नाही. मोहाच्या झाडासंबंधी आदिम समाजात अनेक कथा प्रचलित आहेत. वर उल्लेखिलेल्या माडिया जमातीतील एक कथा व्हेरियर एल्विन या मानवशास्त्रज्ञाने 'मारिया मर्डर अँड सुईसाइड' या त्याच्या ग्रंथात दिली आहे. ती अशी :

'फार फार वर्षांपूर्वी एका गृहस्थाच्या घरी काही पाहुणे आले होते. ह्या पाहुण्यांचा सत्कार करण्यासाठी काहीतरी घेऊन यावे म्हणून त्या गृहस्थाचा तरुण मुलगा बाहेर पडला. फिरत फिरत तो एक मोहाच्या झाडाजवळ आला. त्या झाडाखाली पाण्याने गच्च भरलेला एक खड्डा होता. पाण्यात खूप फुले पडलेली होती. अवतीभोवती पक्षी गाणी गात होते, फिरत बागडत होते, बेहोष झाले होते. त्या तरुणाने ते पाणी पिले. लगेच तो तरुणदेखील नाचू बागडू लागला. गाणे गाऊ लागला.'

तांदुळापासून निर्माण झालेले मद्य ही सर्व शक्तिमान परमेश्वराने माडियांना दिलेली देणगीच आहे, असे समजले जाते. तांदुळाच्या मद्यास अन्न म्हणून समजले जाते. माडियांच्या जन्मापासून मृत्यूपर्यंत मद्याची साथ असते. प्रत्येक उत्सवासाठी, सणासाठी, सुगीच्या दिवसात मद्य तयार केले जाते. गोंड जमातदेखील अतिरिक्त मद्यपान करणारी म्हणून प्रसिद्ध आहे. तेदेखील मोहाच्या फुलांचे मद्य पितात. काही ठिकाणी खजूर आंबवून मद्य तयार केले जाते. मोहाचे झाड पवित्र मानले जाते. उत्सवासाठी मोहाच्याच फुलांचे मद्य तयार केले जाते. या मद्यात अपवित्राला पवित्र करण्याचे सामर्थ्य आहे, असे मानले जाते. म्हणून मृताला स्मशानात नेल्यानंतर अंत्यविधी संपला, की मद्यपान केले जाते. गोंडांच्या जीवनातील प्रत्येक घटना मद्यपानाशी निगडित आहे. पुत्रजन्म, बारसे, विवाह,

अनुक्रमणिका

आजार, नवे पीक घरी आणण्याचा दिवस, पाहुण्यांचे आगमन या सर्व घटना मद्यपानाने साजऱ्या केल्या जातात. बैगा, बस्तरमधील भात्र या जमातीदेखील मोहाच्या झाडाला पवित्र मानतात. भात्र तर विवाहप्रसंगी बोहल्यावर मोहाच्या झाडाची फांदीच ठेवतात. माडिया जमातीत वरपिता लग्न ठरविण्या-साठी वधुपित्याकडे जातो तेव्हा मद्यकुंभ घेऊनच जातो. त्यावेळी वरपिता व वधुपिता यांच्यात पुढील प्रमाणे संवाद होतो :

> 'तुमच्या बागेत एक फूल उमलत आहे, असे आम्ही ऐकतो. आम्ही ते फूल खुडण्या-साठी व आमच्या केसात माळावे म्हणून आलो आहोत.' वधुपित्यास सोयरिक पसंत असेल तर तो वरपित्याकडील मद्यकुंभ घेतो. थोडेसे मद्य पूर्वजांच्या स्मृतीसाठी विशिष्ट ठिकाणी ठेवले जाते व बाकीचे सर्वजण पितात. सेमा व अंगामी नागांमध्ये तांदुळा-पासून मद्य तयार केले जाते. सेमा नागांमध्ये मद्यपान करण्यापूर्वी दोनचार थेंब मद्य आजूबाजूला शिंपडतात. सभोवताली अस-णारी भुते व असंतुष्ट आत्म्यांना घालवून देण्यासाठी याचा वापर केला जातो.

जुन्या मध्य प्रांतातील कलार ही जमात तर मद्य-निर्मितीसाठी प्रसिद्धच आहे. हेसुद्धा मोहाच्या फुलांचे मद्य तयार करून, पवित्र होण्यासाठी गोंडां-सारखेच स्मशानात मद्यपान करतात. कोरवा आणि बैगा जमातींत भुते गावात येऊ नयेत म्हणून गावाभोवती मद्याचे थेंब शिंपडले जातात. तसेच बैगा जमातीत कॉलरा या रोगासारखी एखादी साथ आल्यास मद्याचा मोठ्या प्रमाणावर उपयोग केला जातो व देवीलाही ते अर्पण केले जाते. आदिम जीवनातील मद्यपानाच्या कल्पना, मद्य-निर्मितीच्या वस्तू, पवित्रापवित्रतेचे विचार या सर्व जडप्राणवादी कल्पना आहेत. सृष्टीमध्ये अस्तित्वात असलेल्या निसर्गवस्तू आणि त्यांची शक्ती आपल्याला प्राप्त व्हावी म्हणून त्यांचा उपभोग घेणे ह्या घटना बहुतेक सर्वच आदिम समाजात दिसतात.

मद्य हे उत्तेजन देणारे पेय आहे. मदनोत्सवा-सारख्या ( orgy ) प्रसंगी चित्‌शक्तीचा संचार व्हावा म्हणून आदिम जनजीवनात जसा त्याचा उपयोग होई; तसाच रतिक्रीडेच्या प्रसंगी उन्माद आणणारे पेय म्हणूनसुद्धा त्याचा उपयोग केला जात असे. मद्याचा शरीरात होणारा संचार कामभावना उत्तेजित करतो या अनुभवाचा अर्थदेखील जडप्राण-वादाच्या आधारे लावता येऊ शकतो. मोहाच्या फुलांनी भिजलेले पाणी पिऊन पक्षांना गाणी गावी वाटतात, तशीच माणसालादेखील तन्मयावस्था प्राप्त होते.

मद्यपान, विशेषतः समूहमद्यपान, हे आदिम जनजीवनातील संस्थाबद्ध (Institutionalized) झालेले तथ्य ( Fact ) आहे. अनेक वास्तविक कार्ये या संस्थेने आदिम जनजीवनात केलेली आहेत. समूहातील सामाजिक बंध कायम ठेवण्याचे व प्रसंगी पक्के करण्याचे कार्य मद्यपानाने आदिम समाजात केले आहे.

आदिम समाजातील मद्यपानाची दुसरी बाजू आता आपल्याला विचारात घ्यायची आहे. अगदी जन्माला आलेल्या मुलाला बाहेरबाधा होऊ नये म्हणून जन्म झाल्याबरोबर मद्याचे दोन थेंब त्याच्या तोंडात टाकले जातात; तेव्हाच जणू काय 'पिण्याचे' बाळकडू त्याला मिळते. तेव्हापासून मृत्यूपर्यंत मद्याचा प्रभाव कसा असतो याचा आपण विचार केला. परंतु अतिरिक्त मद्यपानाने आदिवासी जीवन उद्ध्वस्त झाल्याचीदेखील उदाहरणे आहेत.

मद्याच्या धुंदीत बिसनशिंगी माडिया कसे खून करतात हे एल्विनने सांगितले आहे. अनेक आदिवासी जमातींच्या संदर्भात हे खरे आहे. इंग्रजांनी या देशात आपली सत्ता प्रस्थापित केल्यानंतर मद्याच्या निर्मिति-विक्रीसंबंधी जे कायदे करण्यात आले त्यामुळे बरीचशी परिवर्तने झाली. स्वातंत्र्यप्राप्ती-नंतर आदिवासी कल्याणाच्या ज्या निरनिराळ्या योजना आखल्या गेल्या, शिक्षणाचा प्रसार झाला, त्यामुळे या संदर्भात बराच बदल झालेला दिसतो. आधुनिकीकरणाचा प्रभाव या जमातींवर जसजसा पडत जाईल, तशा जुन्या कल्पना मागे पडून सुधार-लेल्या समाजाच्या बरोबरीने या जमातीही येऊ लागतील.



अनुक्रमणिका

वि. गो. खोबरेकर

# मराठेशाहीतील मद्यपानविषयक – धोरण आणि शासनव्यवस्था

मराठी राज्यात जे दारू करून विकत असत, त्यांना कलाल म्हणत. खाटीक किंवा तत्सम लोक दारूच्या भट्टया लावीत, दारू बनवीत व कलाल तिची विक्री करी. हे दारूविक्रीचे काम सरकारी परवान्यानेच होत असे.

शिवकालात द्राक्षाची किंवा मोहाची दारू पीत असत. पण दारूची दुकाने तुरळक होती व त्यांजवर कोतवालाची व इतर सरकारी अधिकाऱ्यांची करडी नजर असे. गावात अगर चार गावांकरिता एक, असे गावाबाहेर कलालाचे दुकान असे. कोणी व्यक्ती दारू पिऊन धुंद झालेली रस्त्यात किंवा वाडयात दृष्टीस पडल्यास त्यास सरकार मोठे शासन करीत असे.

शिवकालात बहुतेक अष्टप्रधान विद्वान ब्राह्मण असत. त्यांनी मराठी राज्यात दारू पिण्यापासून लोकांना परावृत्त करण्यासाठी, पिणाऱ्यास जबर दंडाची वा फटक्यांची कडक शिक्षा करण्यासाठी राजाकडून हुकूम काढविले होते. सैनिकांवर शराबी पिण्याची बंदी होती.[१]

थोरले माधवराव पेशवे यांनी न्यायाधीश रामशास्त्री प्रभुणे यांच्या सांगण्यावरून दारूविषयी तपशीलवार नियम करून ठेविले होते. पेशव्यांचे सरदार व जहागीरदार यांनी आपल्या अंकित प्रदेशांतील शहरांत दारू विकू नये, अशी अट सरंजाम देताना घालण्यात येई. शिंदे, होळकर, पवार, गायकवाड या मराठे सरदार-जहागीरदारांनीसुद्धा ही अट आपापल्या अखत्यारीत कसोशीने घातलेली दिसते. पेशवेकाली दारूचे प्राबल्य होऊ न देण्याचे एकूण धोरण होते.

दारूच्या फुलाची भट्टी लावून फूल सरकारी कारखान्याचे कामास नेण्यास व दारूची भट्टी जेजुरीस चालविण्यास छाट वा खाटकास सरकारकडून इ. स. १७७८ रात परवाना दिलेला आढळतो.* सरकारात या दारूभट्टीची रक्कम जमा झालेली दिसते.[२]

दारू पिण्याचा गुन्हा करणारे सापडल्यावर सरकारने दारूच्या भट्टया मना करण्यासाठी व कलालांना म्हणजे दारूविक्री करणाऱ्या दुकानदारांस दारूविक्री बंद करण्याचे हुकूम काढले.[३] ह्या हुकुमांची अंमलबजावणीही त्वरित करण्यात आली. त्यावेळेपासून सरकारच्या भीतीमुळे मराठी राज्यात दारू पिणे व त्यापासून उत्पन्न मिळविणे या बाबी बंद झाल्या. लोकहितवादी लिहितात, की त्यावेळी समाजात दारू उत्पन्न करणाऱ्यास नीच मानीत आणि कोणी आपली झाडे त्यास दारू करण्यास दिली तर त्यास बहिष्कृत करीत आणि कोकणात अशी चाल होती की, दारू करणारा हातात दारू घेऊन जर अंगावरून गेला, तर दर्शनदोषास्तव स्नान करीत. दारू प्यालेला ब्राह्मण आढळला, तर त्यास निंद्य मानून जातीत घेत नसत. त्याचा सर्वांकडून धिक्कार होत असे.[४]

पण पैसा मिळविण्याच्या लालसेने चोरून दारूचा साठा करून विकणे चालत असे. असे साठे व चोरटी दुकाने हुडकून काढण्यासाठी नाना फडणिसाने फिरस्ते प्यादे ठेविले होते. अशा एका पथकास इ. स. १७७६ त नारायण पेठेतील म्हातारी द्रविडी ब्राह्मण हिच्या घरी दारूने भरलेले वीस-पंचवीस शिसे व त्याजबरोबर खाण्यासाठी शिजविलेले मांस सापडले. ते जप्त करून तीस शासन करण्यात आले.[५]

---

१. आज्ञापत्र– वि. ज्ञा. वि. माला १९२३ पृ. २९ * भा. इ. सं. मं. जाने. जुलै १९५० ले. ११;
२. चापेकर, पेशवाईच्या सावलींत पृ. ४१; ३. पे. द. ४३ ले. ३६;
४. लोकहितवादी, शतपत्रें (सं. सहस्रबुद्धे) पृ. १३५–१३६; ५. पे. द. ४३ ले. १४४;

अनुक्रमणिका






मौजे पेठ पारगाव तालुका खेड सरकार जुन्नर येथील बाळाजी धोंडदेव कुळकर्णी हा ब्राह्मण कलावंतिणीसमागमे गमन, मांसभक्षण व सुरापान करण्यात अट्टल निघाला, त्यास पंक्तीबाह्य केले व पुण्यातील ब्रह्मवृंदांनी एकत्र येऊन पृथ्वीप्रदक्षिणा व तीर्थस्नाने असे प्रायश्चित्त सांगितले.[६]

मद्यपानाविरुद्ध पेशवे सरकारचा कटाक्ष होता.

मद्यपानाविषयी खालील नमुनेदार तक्रार विशेष उल्लेखनीय आहे. सई देशमुखीण चिकोडीकर हिने मद्यपान करून बाळाजी हरी जोगळेकर यासी बदकर्म केले. उभयतांस अटक करण्यात आली.

पेशव्यांच्या कारकीर्दीत ब्राह्मणांनी दारू पिऊ नये, असा शासनाचा दंडक होता. दारू पिणाऱ्या ब्राह्मणास कैद करून किल्ल्यावर पाठवीत असत. नाशिक येथील ब्राह्मणवृंद मद्यपान करतात; त्यात त्यांचा धर्माधिकारीही सामील आहे; हे वृत्त सवाई माधवराव पेशव्यांच्या कानी येताच, त्यांनी सर्वोत्तम शंकर नावाच्या खास अधिकाऱ्यास नाशिकला याची चौकशी करण्यास पाठविले आणि आज्ञा दिली की, धर्माधिकारी यात सापडले त्यांचे धर्माधिकारीपण ( वतन ) जप्त करावे व सरसुभ्याचे हिशेबी जमा करावे. तसेच गुन्हेगार ब्राह्मणास अटक करून त्यांना पक्क्या बंदोबस्ताने घोडप, पटा व मुल्हेर या किल्ल्यांवर अटकेत ठेवण्यास पाठविणे.[७]

पेशवाईत अधिकारी–पाटील–कुलकर्णी यांनीसुद्धा दारू पिऊ नये, असा दंडक होता. कसबे खेडचे पाटील विठोजी सुलतानजी सतकर हे दारू प्यायलेले सापडले असता त्यांजपासून दहा हजार रुपये गुन्हेगारी घ्यावी, असा हुकूम पेशवे सरकारातून झाला. त्यावर बाळोजी पलांडे यांनी रदबदली करून अन्याय माफ करण्यास विनंती केली. तेव्हा माफ करून पुन्हा प्यायलेला सापडल्यास त्याजकडून दहा हजार रुपये घेतले जातील, असा इशारा देऊन सोडून देण्यात आले. असे असता तो १७८७ च्या ऑगस्ट मासात दारू प्यायलेल्या स्थितीत कोतवालास सापडला. तेव्हा त्यास दहा हजार रुपये दंड ठोठावण्यात आला पण; त्याजवळ पैसे नसल्यामुळे व त्यास कोणी साक्षी रहाण्यास तयार होईना म्हणून त्याची निम्मी पाटीलकी वतनसंबंधे इनाम व हकदक, मानपान व इनाम जमीन एक चाहूर याची जप्ती केली.[८] राघो नारायण ब्राह्मण दारू पिऊन मावंद जेवणाच्या पंक्तीत बसल्याचे सापडल्यावर त्यास सर्व ब्राह्मणसमुदायाने प्रायश्चित्त घेण्यास सांगितले.[९]

पेशव्यांचे राज्य इ. स. १८१८ त खालसा झाले, तरी पेशवाईतील मद्यपानविषयक गुन्हे नोंदण्याची व शिक्षा करण्याची चाल पुढे ४/५ वर्षे चालूच राहिली. इ. स. १८२१–२२ त मद्यपानविषयक गुन्हा नोंदला गेला तो असा : परीट जातीची सासू दारू प्याली व सुनांस मारू लागली. एक सून तळ्यात जीव देण्यास गेली, ते महालच्या शिपायाने पाहिले. सासऱ्याने सासूस (बायकोस) आवरावे ते केले नाही. तेव्हा महालातून परीट सासऱ्यास आठ आणे दंड करण्यात आला.[१०]

यावरून असे दिसते की, तत्कालीन सरकार रयतेच्या भल्यासाठी दारूबंदीसारखे कायदे करून ते मोडणाऱ्यास कठोर शिक्षा करीत असे.

६. पे. द. भा. ४० ले. २९; ७. सवाई माधवराव रोजनिशी भा. ३ (८) पृ. १२०; ८. कित्ता पृ. ११९; ९. पे. द. ४३ ले. १५९; १०. आवळसकर 'नागाव' पृ. ९१.

प्र. शं. मराठे

# दारूबंदीकायदा हवाच : काही विचार

मानवी समाज नीतिमान, निर्व्यसनी व सदाचारी करण्यासाठी भारतात प्राचीन कालापासून अनेक संतांनी, विचारवंतांनी, द्रष्टया व ज्ञानी माणसांनी जीवापाड श्रम केले. अशा अनेक महात्म्यांनी आपले स्वतःचे चारित्र्य स्वच्छ व शुद्ध ठेवले होतेच; म्हणून त्यांच्या उपदेशाचा परिणाम होऊन अनेकांच्या जीवनात त्याग, सदाचार, ध्येयनिष्ठा या आदर्श गुणांना स्थान मिळाले; इतिहास तरी तसे सांगत आहेच.

परंतु नीतीची सक्ती जेव्हा कायद्याने होऊ लागली त्यावेळी, त्याचा परिणाम समाज ढोंगी व नकळत भ्रष्टाचारी बनण्यात झाला. माणूस हा दुबळा प्राणी आहे. पण एका विशिष्ट ध्येयाने प्रेरित झालेला माणूस हीही एक शक्तीच आहे असे बर्नार्ड शॉने मान्य केले. मानवाच्या आत्म्यापेक्षा त्याचे शरीर हे दुर्बल असते, म्हणून तो सतत मोहाच्या आधीन होतो. दारिद्र्य, संकटे यांनी ज्याच्या जीवनाचा उकिरडा झाला, ज्याचे मन पिचलेले असते अशा स्थितीत तो करतो काय? हे सारे दुःख विसरण्यासाठी, मद्यसेवन करून सर्व काही क्षणभर तरी विसरण्यासाठी या मानवाने धडपड केली. मग त्याच्या व इतरांच्या लक्षात आले, की या पेयाने शरीराचा नाश तर होतोच, शिवाय नीतिमत्तेबद्दलही काहीच वाटेनासे होते.

जॉन हॉपकिन्स विद्यापीठातील प्रसिद्ध डॉ. हॉवर्ड केली यांनी या पेयाचे अनेक वर्षे सूक्ष्म निरीक्षण करून व अभ्यास करून निष्कर्ष काढला की 'जगात असा एकही रोग नाही, की जो दारू पिण्याने बरा होतो.' डॉक्टर मंडळींना हे सारे माहीत आहे, सर्व वैद्यक क्षेत्रातली मंडळी हे मान्य करतात. यापुढे जाऊन डॉ. चार्ल्स एच्. मेयो तर म्हणतात, की 'औषधिज्ञान आता इतके पुढे गेले आहे, की औषध म्हणून दारूचा उपयोग कोणीच करू नये व करीतही नाहीत. दारूचे स्थान फार तर वाङ्मयात व फक्त विज्ञानातच राहील.'

हे लक्षात न घेता प्रकृतीकरिता भरमसाट परवाने देण्याची पद्धत सुरू झाली. महागडी इंग्रजी मद्ये श्रीमंत घेऊ लागले व समाजातील सर्वांत खालचा वर्ग स्वस्त व लवकर चढणारी 'खास स्वदेशी' पिऊ लागला. पण झाले असे, की या व्यसनी लोकांत विषमता निर्माण झाली. हातभट्टीची पिणाऱ्याला 'दारूड्या' व उच्च वर्णीयांच्या पिण्याला 'सोशल ड्रिंक' ( ? ) हा किताब मिळाला.

महात्मा गांधींचे म्हणणे असे, की 'मनुष्य हा काही केवळ खाणेपिणे व मजा करणे या स्वरूपाचे शरीराचे लाड करण्याकरिता जगत नाही, तर त्याचे शरीर हे ईश्वराचे निवासस्थान आहे. म्हणून हे मंदीर पवित्र मानले पाहिजे' आणि याच विचाराने म. गांधींनी दारूबंदीचा प्रसार केला व तोही ब्रिटिशांचे, परकीयांचे राज्य असतानाच. दारू पिणारा कळत न कळत आपल्या प्रिय माणसांना एका भयानक संकटात लोटून देतो, सर्व कुटुंबातील माणसांचा छळ करितो. अशी अनेक माणसे पिऊ लागली, तर सर्व सामाजिक जीवनात दुःख निर्माण होते. हे होऊ नये म्हणून निर्व्यसनी माणसांनी सारा भारत गजबजून जावा, असा महात्माजींचा उच्च हेतू होता.

मद्यपाननिषेध किंवा पिकेटिंग हा कार्यक्रम काँग्रेसच्या ठरावात कधीच समाविष्ट नव्हता; पण तो काळ पारतंत्र्याचा, भारताच्या गुलामगिरीचा

होता. म. गांधींचे पिकेटिंगबाबतचे उद्‌गार फारच अर्थपूर्ण आहेत. ते म्हणतात ‘पोलीस गस्त म्हणजे चोराविरुद्ध पिकेटिंगच नव्हे काय’? पिकेटिंग करणारा प्रेम या शस्त्राचा उपयोग करून आपल्या दुबळ्या बांधवाला दारू पिण्याच्या भयंकर पापापासून परावृत्त करू शकतो आणि सरकारला जर पूर्ण मद्यपानबंदी करण्याचा अधिकार असू शकतो, तर लोकांना तो का नसावा? नागपूर काँग्रेसच्या आधीपासूनच देशात कोठे तरी पिकेटिंग चालूच होते. नागपूरच्या काँग्रेसनंतर या चळवळीस विलक्षण वेग आला. नागपूर व धारवाड येथील गोळीबार हे या चळवळीतील संस्मरणीय प्रसंग होत. विशेष म्हणजे याच काळात ब्रह्मदेशातही ही मद्यपानविरुद्ध चळवळ चालूच होती.

मुंबई शहरात मे– जून १९२१ मध्ये पिकेटिंगला सुरुवात झाली. दारूच्या मक्तेदारांनी या आपत्तीमुळे ‘ठेक्याचे पैसे परत करतो व दुकाने बंद करतो’, असे वचन म. गांधींना दिले. पण त्याच वेळी गव्हर्नरसाहेबास अर्ज करून या चळवळीबद्दल तक्रार केली व गांधींना दिलेले वचन मोडून टाकले. म. गांधींनीही ही चळवळ बंद करून टाकली. या कार्यात केळकर, भोपटकर, परांजपे, गोखले वगैरे थोर लोकांनी पहिल्याच दिवशी पिकेटिंग केले; पण पुढे सरकारने कैदेऐवजी भरमसाट दंड ठोठावण्यास सुरुवात केली. शेकडो स्वयंसेवक तुरुंगात होतेच. दंडाच्या मोठ्या रकमा ऐकताच म. गांधींनी ही चळवळ बंद केली. पण या नवीन यादीत पुण्याने आपले नाव राखले, अशी म. गांधींनी कबूलीच देऊन टाकली.

या चळवळीचा विशेष परिणाम किती झाला याचे प्रत्यंतर पाहायचे असेल, तर अमेरिकेत त्या काळी प्रसिद्ध होणाऱ्या ‘ख्रिश्चन हेरल्ड’मध्ये छापून आलेला मजकूर पाहता येईल. तो असा : ‘दारूच्या खपात विलक्षण घट झाली आहे, सरकारी तिजोरी दिवसेंदिवस मोकळी होत चालली आहे. हिंदुस्थान देश कित्येक शतके या व्यसनामुळे बहकून गेला होता. तो देश आता पूर्ण शुद्धीवर आला असून या महात्म्याच्या झेंड्याखाली एकत्र आला आहे. मद्यासारख्या भयंकर रोगातून त्याला मुक्त व्हायचे आहे, ही गोष्ट कोणीही अडाणी माणूस हिंदुस्थान पाहून कबूल करीलच.’

दारूबंदीविरुद्ध दुसरी बाजू अशी : भारतात फक्त १५ टक्केच लोक दारू पितात व घाणेरडी, आंबलेली दारू पिऊन दरसाल ३००० माणसे मरतात. ही दारू स्वस्त मिळते. त्याला भांडवलही फार लागत नाही शिवाय लवकर नशा येते व प्रसंगी मरणाला जवळच्याच वाटेने जाता येते. पंधरा टक्के लोकांना व्यसनमुक्त करण्यापेक्षा देशातील दारिद्र्य, बेकारी, निरक्षरता वगैरे अनेक संकटे आव्हान देत असताना हा नशाबंदीचा खटाटोप का?

भारत देशाच्या नीतिमत्तेचा प्रश्न विचारात घेतला व पंधरा टक्के हा आकडा प्रत्यक्ष पिणाऱ्यांचा असला, तरी हजारो कुटुंबे व तरुण पिढी या व्यसनाने नामशेष होत आहे इकडे लक्ष दिले, तर नशाबंदी आवश्यकच आहे हे लक्षात यावे. ज्या देशात दारू कमी खपते तो देश वैभवसंपन्न, असे म्हणण्यास हरकत नाही.

खराब व घाणेरडी गावठी दारू तयार करणे व पिणे याचे मूळ कारण शोधायला फार दूर जायलाच नको. दारिद्र्य हेच याचे एकमेव कारण. गावठी पेय बनवण्यास भांडवल तर फारच कमी लागते. एक मण काळाकुट्ट गूळ– जो बाजारात खपत नाही– घेतला, तर त्यापासून २० बाटल्या दारू तयार करता येते. खर्च १५ रुपये व २० बाटल्या तयार. गुळाला ८ रुपये, नवसागर २० पैसे व इतर खर्च ६ ते ७ रुपये. यात पाणी घालून त्याचा तीव्रपणा कमी केला, तर सहा रुपये बाटली या दराने ती खपते. एका भट्टीवर २०० बाटल्या विकल्या जातात. म्हणजे श्रम थोडेसेच करून दररोज १०५ ते १८५ रुपये निव्वळ फायदा होतो. म्हणून हा धंदा अत्यंत तेजीत चालतो व अनेक उनाड बेकारांना काम मिळते. येथे शिक्षण– मग ते कोठलेही असो– अगदी कुचकामी ठरते. हिशेब केला तर महिन्याचे उत्पन्न तीन ते पाच हजार रुपये. मग साधारण ५०० रु. दर महिना पोलीसांना हप्ता द्यावा लागतो. म्हणजे पॉलीसी सरकारची पण हप्ते पोलीसांना! असे हे गणित. १५ रु. भांडवलावर चिक्कार धन मिळवणा-

त्याला दोष तरी कसा द्यावा? दारिद्रय व संरक्षणाची हमी! असले हातभट्टीतून निघालेले अमृत घेणारे घेतात व प्रसंगी सामुदायिक मरण पतकरतात. एकदम १०० माणसांचे खोपोली व तामिळनाडूत सामुदायिक मृत्यू होतात आणि ते वरचेवर होतात. तरीही लोक पितात, मरतात, अर्धपोटी राहतात; पण पितात. कारण संकटे, दारिद्रय व दुःख विसरण्याकरिता हेच एकमेव औषध व शिवाय अत्यंत स्वस्त!

टिंक्चरपासून हे पेय करताना एक पौंडाच्या टिंक्चर आयडीन पासून ११ बाटल्या गावठी वा स्वदेशी दारू तयार करता येते, हे किती लोकांना माहिती आहे? १०० रुपये खर्च व २५०० रु. प्राप्ती. ही सर्व माहिती टेकचंद समितीने दिली आहे.

रावली कँपमध्ये तर अनेक भट्टया भर दिवसा आढळतात. त्यांत छुपी तळघरे व लपवण्यासाठी खास जागाही तयार करतात. प्रसंगी बांधकामही करतात. याशिवाय, अंगुरासव, गाजरासव, अनेक आयुर्वेदिक अरिष्टे, टॉनिक्स अशी पेये सरसकट बाजारात मिळतातच. स्पिरीट व फ्रेंच पॉलीश यांचा इतका उपयोग करतात की प्रत्यक्ष पाहणीत छाती दडपल्यासारखी होते. या पेयाने क्षय रोग बरा होतो, अशी एक भाबडी समजूत ग्रामीण भागात आहेच. या पेयाचे पाच औंस जरी प्राशन केले, तरी मृत्यू येतोच असा अनुभव व निष्कर्ष. 'टॉनिक' पिऊन नागपूर शहरात नुकतीच एका आठवड्यात दोनशे माणसांनी इहलोकीची यात्रा संपविली.

दारूबंदी हवीच, यात शंका नाही. कायदा करून तो पोलीसांच्या स्वाधीन केला म्हणजे काय भयानक परिणाम होतात याचा अनुभव शासनाला आहेच. मग ही नशाबंदी व्हायची कशी? याच्या उलट फ्रान्समध्ये व पोलंडमध्ये केलेले प्रयोग फारच यशस्वी झालेले आहेत.

फ्रान्समध्ये तयार होणारी दारू पुरत नसे. त्यांना इतर देशांतून दारू आणावी लागत असे. अनेक नेत्यांना दारूबंदी व्हावी असे वाटत होते; पण त्यांनी कायदा न करता खालील प्रयोग केला. प्राथमिक शाळा, माध्यमिक शाळा, प्रार्थना स्थळे, रेडियो, टी. व्ही. यावर दारूमुळे होणारा शरीराचा नाश व खलास होणारी नीतिमत्ता यांचा प्रसार इतक्या धडाक्याने सुरू केला, की त्याला इतिहासात तोड नाही. आज फ्रान्सची स्थिती अशी आहे, की तेथेच तयार होणारी दारू त्यांना बाहेर निर्यात करावी लागते. पोलंडमध्ये 'नॅशनल कौन्सिल'ने तर १२०० विद्यार्थ्यांची तुकडी देशभर या दारूबंदी-करिता वापरली. परिणाम फारच उत्तम झाला. आज तर फ्रान्स व पोलंडमध्ये दूध व फळांच्या रसाचा खूपच वापर होतो. आजची तरुण पिढी तर नीतिमान व आरोग्यसंपन्न आहे.

भारतात कायदा करतात; पण तो वाऱ्यावर सोडून देतात. दारूबंदीकल्पना अत्यंत उदात्त व आदर्श आहे यात काय संशय? ह्या नशाबंदी कायद्यात नेत्यांचे व कार्यकर्त्यांचे मन नाही. महिलांनी हे काम स्वीकारल्यास चांगला परिणाम होईल. शिवाय आकाशवाणी, टी. व्ही. यांचा भरपूर उपयोग करून घ्यावा. धार्मिक प्रार्थना करतात त्याप्रमाणे दररोज प्रत्येक शाळेत या पेयाचे भयंकर शारीरिक परिणाम १० मिनिटे तरी या लहान लेकरांना समजावून सांगावेत. नक्की परिणाम होईल. हा शाळेतला प्रचार व कायदा यांच्या सहकार्याने बरेच काही काम होईल.

एकदा प्याल्यामुळे काय होते? असा प्रश्न अनेक जण विचारतात. पण केव्हातरी पिणारे व कधी तरी घेणारे मग सोशल पार्टी, वेट पार्टी अशा अनेक समारंभांना बळी पडतात आणि शेवटी यकृताचा विकार व जलोदराला सामोरे जातात. जलोदर त्यांना थेट वरची वाट दाखवतो. हे एकच पेय असे आहे, की जे दहा मिनिटातच शरीरात व रक्तामध्ये पसरते. मोटारीचे अनेक अपघात यामुळेच होतात. गाडी चालवणारा किंवा गाडीखाली सापडून मरणारा यांपैकी कोणीतरी प्यालेला असतो. अमेरिकेत अपघात झाला, तर प्रथम ड्रायव्हरचे रक्त तपासण्यास घेतात. भारतात अपघाताची जागा, त्याचे अंतर, कोणाच्या हद्दीत ती जागा? फुटपट्टीचा वापर व जाबजबाब यात तासचेतास जातात व त्यातून निष्पन्न काहीच होत नाही. शिवाय न्यायालयात हे प्रकरण गेले, तर काही महिने ते चालते व बहुतेक आरोपी सुटतो. एका केसकरिता

पाच सहा माणसे दर तारखेस विनाकारण अडकतात. आजची परिस्थिती तर अशी आहे, की २५००० ते ३०००० लोकांची रक्ततपासणी पडून आहे.

समाज नीतिमान व्हावा ही सरकारची इच्छा असली, तरी त्यांना जनतेची साथ पाहिजेच. कार्यकर्त्यांची फळी–फार मोठी–नेहमी तयार पाहिजे. गावठी दारूचे अड्डे कोठे असतात हे पोलीसांना नक्की माहिती असतेच; पण केव्हा तरी धाड घालायची व डायरी भरायची याशिवाय त्यांचे काम काहीच होत नाही. आज कॉलेज तरुण तर पिणे ही एक नवीन जगाची देणगी, 'फॅशन' समजतात व न पिणाऱ्याला 'बावळट' या वर्गात सोडून देतात. दारूबंदीमुळे सरकारी तिजोरीला फटका बसतो, ही बाब दुय्यम आहे. त्याचा विचार करूनच हा कायदा करण्यात येतो.

दारूबंदीचा कायदा आवश्यक आहेच, जनतेची साथ पाहिजे. पोलीसांवर विसंबून राहू नये. स्त्रियांनी यात सहभाग घेतलाच पाहिजे; नाही तर 'दारूबंदीचा कायदा व पोलीसांचा फायदा' असे काहीतरी आजच झाले आहे तेच पुढे चालू राहील.












एम.

# आधुनिक पाश्चात्य ‘ मद्यवर्ग ’

[ आयुर्वेदावरील प्रमाण ग्रंथांत ‘ मद्यवर्ग ’ हे प्रकरण समाविष्ट असते. ह्या प्रकरणात मद्यांचे वेगवेगळे प्रकार आणि त्यांचे गुणपरिणाम यांचे तपशिलवार वर्णन देण्यात येते. ह्या प्राचीन भारतीय मद्यवर्गाच्या धर्तीवर संक्षेपाने रचलेले आधुनिक पाश्चात्य मद्यवर्गाचे प्रकरण ह्या लेखाद्वारे वाचकापुढे मांडण्यात येत आहे. ]

वाइन्स, बिअर आणि स्पिरिट्स हे मद्याचे तीन प्रमुख प्रकार होत. ( १ ) वाइन्स : शब्दकोशात ‘ वाइन ’ ह्याची व्याख्या ‘ आंबलेला ( फर्मेन्टेड ) द्राक्षरस किंवा अन्य फळांपासून बनविण्यात आलेले मद्य अशी दिली आहे. हा भेद करण्याचे एक कारण आहे. शुद्ध द्राक्षरस आंबविला तर त्याची सरळ वाइन बनते. पण इतर फळांचे रस अधिक आम्ल-युक्त असतात आणि त्यांच्यापासून समाधानकारक मद्य बनवायचे तर त्यात साखरेची भर घालावी लागते. सफरचंदापासून केलेल्या वाइनला ‘सायडर’ म्हणतात, पेअरपासून बनविलेल्या वाइनला ‘पीटी’ म्हणतात; पण इतर फळांपासून बनविलेल्या वाइन्सचा त्या त्या फळाच्या नावाचा उल्लेख करून निर्देश करतात. उदा. ‘ एल्डरबरी वाइन, ’ ‘ अॅप्रिकॉट वाइन, ’ इत्यादी. सामान्यपणे ‘ वाइन ’ ह्या शब्दाने द्राक्षरसापासून बनविलेली वाइनच अभिप्रेत असते.

‘ आंवणे ’ हा शब्द काहीसा ग्राम्य असल्यामुळे ‘ फर्मेन्टेशन’साठी ‘ किण्वन ’ आणि ‘ फर्मेन्टेड’साठी ‘ किण्वित ’ हे शब्द वापरू. किण्वन ही निसर्गात स्वाभाविकपणे, आपोआप घडून येणारी प्रक्रिया आहे. समजा, जोराचा वारा आला, पिकलेली फळे झाडावरून खाली पडली. काहीशी फुटली, पाऊस पडला, पाणी साचले आणि नंतर सूर्याचे उबदार ऊन परत सगळीकडे पसरले. फळांच्या सालींवर यीस्टच्या सूक्ष्म पेशी असतात आणि त्यांची वाढ व्हायला अनुकूल परिसर आता लाभतो. कारण फळाच्या रसात साखरेचा संपृक्त द्रव असतो आणि उन्हाची उब ह्या प्रक्रियेला साहाय्य करते, यीस्टच्या पेशी वाढण्याच्या प्रक्रियेत अंतर्भूत असलेल्या रासायनिक प्रक्रियेत जे घडते ते हे. फळाच्या रसातील ग्लुकोजपासून इथिल आल्कोहोल आणि कार्बन डायऑक्साइड वायू निष्पन्न होतात.



$$C_6H_{12}O_6 \rightarrow 2\,C_2H_5OH + 2\,CO_2$$

ग्लुकोज — इथिल आॅल्कोहोल — कार्बन डायऑक्साइड.

अनेक प्रकारचे ऑल्कोहोल आहेत पण इथिल ऑल्कोहोल त्यातील सर्वांत साधा आहे आणि प्राशन करायला सुरक्षित असा तो ऑल्कोहोलचा एकमेव प्रकार आहे.

फळांच्या रसात वाढणाऱ्या यीस्टपेशी वेगाने फोफावतात आणि कोंड्यासारख्या कणांच्या रूपाने ह्या द्रावाच्या पृष्ठभागावर जमतात. कार्बन डाय-ऑक्साइड वायूचे बुडबुडे वर येऊ लागतात आणि आपल्याबरोबर सालींचे सूक्ष्म कण आणि इतर कण वर आणतात. साखरेचे ऑल्कोहोल मध्ये परिवर्तन होते. ही प्रक्रिया एका मर्यादेपर्यंत चालते आणि मग आपोआप थांबते. कारण द्रावातील आल्कोहोलचे प्रमाण जसजसे वाढत जाते तसतसा त्याचा यीस्ट पेशींच्या वाढीला अधिकाधिक प्रतिबंध होत जातो आणि जेव्हा हे प्रमाण ४ % ते १४ % टक्के ( आकारमानाने ) ह्याच्या दरम्यान येते तेव्हा ही








प्रक्रिया पूर्णपणे होते. इतर सूक्ष्म जंतू (बॅक्टिरिया) मरून जातात.

आता जो द्राव असतो– फळांच्या रसापासून निर्माण झालेला द्राव–त्याच्यात पाणी असते, सुमारे १० % आल्कोहोल असतो. काही अ–किण्वित अशी साखर असते आणि फळाचा नैसर्गिक स्वाद अजून तेथे रेंगाळत असतो. काही कार्बन डाय-ऑक्साइड वायूही त्याच्यात असेल. ही वाइन.

या पुढच्या रासायनिक प्रक्रियांतून ह्या द्रावात अम्ले आणि इतर पदार्थ निर्माण होतील आणि वाइन हे त्याचे स्वरूप नष्ट होईल.

माणसाला अशा रीतीने निसर्गातच वाइन्स सापडल्या असणार पण केवळ वाइन्स नव्हे. धान्यावर आणि मद्यावर ह्याच प्रकारची स्वाभाविक प्रक्रिया होते आणि अनुक्रमे बिअर आणि मीड निष्पन्न होतात.

वाइन्सचे – द्राक्षमद्याचे– प्रकार नेमके कोणते आहेत हे सांगणे कठीण आहे. कारण त्यांचे अनेक प्रकारे वर्गीकरण करण्यात येते. पण पुढील वर्गीकरण बरेचसे मान्य आहे. ह्या वर्गीकरणाप्रमाणे वाइन्सचे भेद असे पाडण्यात येतात : बीव्हरेज वाइन्स– उदा. क्लॅरेट, बर्गंडी, हॉक– आणि दृढीकृत (फॉर्टिफाइड) वाइन्स– उदा. शेरी, पोर्ट, मडिरा, इत्यादी. ह्या दोन वर्गांतील उपवर्ग म्हणजे, लाल किंवा पांढऱ्या वाइन्स, मधुर किंवा अमधुर ( ड्राय) वाइन्स आणि स्तब्ध (स्टिल) किंवा चमचमणाऱ्या (स्पार्क्लिंग) वाइन्स.

बिव्हरेज वाइन्स किंवा टेबल वाइन्स जेवताना योग्य त्या खाद्यपदार्थाबरोबर घोट घोट प्यायच्या असतात. लाल वाइन्सचा रंग ज्या काळ्या द्राक्षापासून त्या बनविलेल्या असतात त्यांच्या सालीपासून त्यांना लाभतो. लाल वाइन बनविताना ज्या भांड्यात– व्हॅट्समध्ये– रसाचे किण्वन होते त्याच्यात द्राक्षरस, द्राक्षांच्या साली, बिया ह्या साऱ्यांचे मिश्रण ओतण्यात येते. सालींच्या बाहेरच्या बाजूला यीस्ट पेशी असतात पण वाइनला तिचा लाल रंग चढतो तो सालींच्या आतल्या बाजूकडून. किण्वनप्रक्रियेच्या सुरवातीला जो आल्कोहोल तयार होतो तो लाल रंग शोषून घेतो.



पांढरी वाइन फक्त पांढऱ्या द्राक्षांपासून बनविण्यात येते असे जे अनेकांना वाटते ते खरे नाही. द्राक्षरसाचे किण्वन होताना जर साली काळजीपूर्वक वगळण्यात आल्या, तर काळ्या द्राक्षांपासून पांढरी वाइन बनविता येते. शांपेन ही पांढरी वाइन आहे पण ती काळी आणि पांढरी द्राक्षे एकत्र घेऊन त्यांच्यापासून बनविण्यात येते.

वाइन बनविण्याच्या चार पायऱ्या असतात : ( १ ) द्राक्षांचे पीक काढणे; (२) व्हिंटाज (द्राक्षे गोळा करणे आणि रस काढणे ); ( ३ ) किण्वन; ( ४ ) नंतरची प्रक्रिया.

उत्कृष्ट वाइन्स उत्कृष्ट जातींच्या द्राक्षवेलींपासून मिळणाऱ्या द्राक्षांपासून बनविलेल्या असतात. ह्या उत्कृष्ट जाती विशिष्ट प्रदेशातच उत्तम रीतीने बहरू शकतात. त्या त्या प्रदेशातील जमिनीच्या आणि हवापाण्याच्या गुणधर्मांमुळे हे घडून येते.

| द्राक्षवेलीच्या जातीचे नाव | प्रदेश | वाइन |
|---|---|---|
| कावर्ने सॉव्हिनॉन | मेडॉक | क्लॅरेट |
| सॉव्हिनॉन ब्लांक, सेमिलाँ मुस्कादेले | बॉर्दो | पांढरी बॉर्दो |
| पिनो | बर्गंडी | लाल बर्गंडी |
| रीझ्लिंग | ऱ्हाइन व्हॅली | हॉक, मोझेले |
| पालोमिनो | स्पेन | शेरी |
| शार्डोने | मॉर्न खोरे | शांपेन |

पांढरी बर्गंडी पिनो द्राक्षवेलीपासून, तसेच शार्डोनेपासूनही करतात; तसेच शांपेन बनविण्यासाठी पिनो द्राक्षेही वापरतात.

व्हिंटाज : उन्हाळ्याच्या अखेरीस द्राक्षे खुडण्यात येतात. योग्य वेळी ती खुडणे अत्यंत महत्त्वाचे असते. अधिक उशीर केला तर अधिक पिकलेली द्राक्षे मिळतील हे खरे आहे; पण पावसाची भीती असते. पावसाने सालींवरील यीस्ट धुवून जाते आणि मागाहून जरी द्राक्षरसात योग्य प्रमाणात यीस्ट घालण्याचा प्रयत्न केला, तरी इष्ट परिणाम साधला जात नाही. द्राक्षांचे घोस खुडताना त्यांची वर्गवारी करण्यात येते. उत्कृष्ट वाइन्स काळजीपूर्वक निवडलेल्या द्राक्षांपासून बनविण्यात येतात आणि वाइन कोणत्या प्रकारच्या द्राक्षापासून बन-

अनुक्रमणिका

विण्यात आली आहे ह्याची माहिती बाटलीवर देण्यात आलेली असते. अर्थात् किंमतही त्या प्रमाणात घेतात.

द्राक्षे खुडल्यानंतर त्यांचा लगेच रस काढण्यात येतो. (ह्याला शेरीचा अपवाद आहे. शेरी बनविण्यापूर्वी द्राक्षे चोवीस तास उन्हात सुकवितात). लाल वाइन बनविताना रसाबरोबर साली आणि बियाही व्हॅटमध्ये घालतात हे आपण पाहिलेच आहे. सुरवातीला होणारे किण्वन जोमदारपणे, खळबळ करीत होते. व्हॅटमध्ये पृष्ठभागावर साली, बिया आणि यीस्ट ह्यांचा थर जमतो आणि खाली द्राव असतो. हा द्राव कास्कमध्ये काढून घेतात आणि त्याच्यात किण्वनाची प्रक्रिया चालू राहते. पण ती चालू असताना अतिशय काळजी घ्यावी लागते. हवेचा आणि हवेतील जंतूंचा स्पर्श द्रावाला होणार नाही ह्याची खबरदारी घ्यावी लागते, बाष्पीभवनाने कमी झालेल्या द्रावाची भरपाई करण्यासाठी त्याच्यात चांगली वाइन ओतावी लागते आणि पृष्ठभागावर कणांचे जे थर जमतात ते दूर करण्यासाठी मधून मधून द्राव नवीन कास्कमध्ये ओतावा लागतो. शेवटच्या वेळी वाइन नवीन कास्कमध्ये ओतताना ती पूर्णपणे स्वच्छ असावी लागते. हे काम स्वच्छ सूर्यप्रकाश असलेल्या दिवशी करतात. मग कास्कला सील बसवण्यात येते आणि वाइन बाटल्यात भरण्यासारखी होईपर्यंत कास्क तसाच ठेवण्यात येतो. हा काळ वेगवेगळचा वाइन्सच्या बाबतीत वेगवेगळा असतो पण सामान्यपणे असे म्हणता येईल, की वाइन जितकी अधिक चांगली तितका हा काळ अधिक दीर्घ असतो.

ह्यानंतरचा काळ मद्य परिपक्व बनण्याचा (मॅच्युअर) काळ असतो. ही प्रक्रिया दोन टप्प्यांनी होते; लाकडी कास्कमध्ये आणि नंतर बाटलीमध्ये. लाकडी कास्क ह्या प्रक्रियेला अनुकूल असतात ह्याचे कारण असे, की लाकडात सूक्ष्म छिद्रे असतात आणि त्यांच्यामधून अतिशय सूक्ष्म प्रमाणात हवा आत येऊन तिचा वाइनशी संसर्ग होतो. ह्यामुळे ऑक्सिडेशनची प्रक्रिया चालू राहते. ह्यामुळे टॅनिन आणि टार्टारिक अम्ल ह्यांसारखे अधिक उग्र घटक वेगळे पडतात आणि शिवाय वाइनला पक्वता, मुलायमपणा आणि तिचा विशिष्ट स्वाद देणारी सुगंधी द्रव्ये तिच्यात निर्माण होतात.

वाइन कास्कमध्ये पाच वर्षांपर्यंतसुद्धा ठेवण्यात येते आणि नंतर ती बाटल्यांत भरण्यात येते. हे कामसुद्धा स्वच्छ सूर्यप्रकाशाच्या दिवशी करावे लागते. बाटलीत भरण्यापूर्वी करण्याची शेवटची प्रक्रिया म्हणजे 'फायनिंग.' ह्या प्रक्रियेत वाइनमध्ये अंड्याचा पांढरा बलक सोडून त्याच्या साहाय्याने तिच्यातील सर्व कण एकत्रित करून ते तिच्यातून काढून टाकण्यात येतात आणि उरलेली वाइन स्वच्छ आणि चमकदार बनते. मग वाइन बाटलीत भरण्यात येते, आत हवेसाठी शक्य तितकी कमी जागा ठेवून तिच्यावर बूच बसविण्यात येते. बूच सच्छिद्र असते व म्हणून बाटलीतही वाइन परिपक्व बनण्याची प्रक्रिया चालू राहते. वाइन्सच्या बाटल्यांना बुचे – सच्छिद्र बुचे – बसविण्याची प्रथा अठराव्या शतकापासून सुरू झाली. बाटलीतही मद्याला परिपक्व बनू देण्याची जी प्रक्रिया अलीकडे निर्वेधपणे चालू ठेवता येते ती अठराव्या शतकापूर्वी घडू शकत नसे. उदा १९५३ सालच्या हंगामातील द्राक्षांपासून त्यावेळी बनविण्याला सुरवात झालेली क्लॅरेट १९५७ साली बाटलीत भरण्यात आली असेल आणि त्यानंतर दहा किंवा पंधरा वर्षांनी ती चांगल्या रीतीने परिपक्व होऊन पिण्यासाठी तयार होईल. अशा बाटल्यांत परिपक्व झालेल्या वाइन्स अठराव्या शतकापूर्वी उपलब्ध नव्हत्या. कित्येक प्रकारची मद्ये बाटलीत चाळीस वर्षेपर्यंत परिपक्व होत राहतात.

ह्या परिपक्व होण्याच्या प्रक्रियेचे नेमके स्वरूप काय असते? हे समजून घेण्यासाठी ह्या सूक्ष्म आणि स्वतःच्या संथ गतीने चालणाऱ्या प्रक्रियेत निर्माण होणाऱ्या द्रावाचे घटक समजून घेतले पाहिजेत. त्याचा एक घटक अर्थात् आल्कोहोल असतो. हा प्रामुख्याने इथिल आल्कोहोल असतो; पण इतर 'उच्चतर' आल्कोहोल– उदा. अॅमिल, ब्युटिल, प्रॉपिल, इ. – अल्प प्रमाणात उपस्थित असतो. ह्या द्रव्यांचे गंधित एस्टर्स– अॅरोमॅटिक एस्टर्स– ह्यांसारख्या द्रव्यांत सहजी परिवर्तन होते. ही गंधित द्रव्ये सूक्ष्म प्रमाणात जरी मद्यामध्ये अस्ति-

अनुक्रमणिका

त्वात असली, तरी त्यांचा मद्याच्या स्वादावर आणि गंधावर अतिशय परिणाम होतो. आल्कोहोल-शिवाय इतर सेंद्रिय संयुगे (ऑर्‌गॅनिक कॉम्पाउंड्स) वाइनमध्ये असतात. काही आल्कोहोलचे ऑक्सि-डेशन होऊन निर्माण झालेल्या द्रव्यांचाही वाइनच्या गंधावर परिणाम होतो. वाइनमधला तिसरा घटक म्हणजे अम्ले. ह्यांत टार्टारिक अम्ल हे प्रमुख असते आणि जुन्या वाइनच्या बाटलीमध्ये बुचाभोवती स्फटिकांच्या स्वरूपात ते जमलेले आढळते. ह्यांशिवाय वेगवेगळ्या प्रकारांच्या आणि वयांच्या वाइन्समध्ये लॅक्टिक, सायट्रिक इ. अम्ले सूक्ष्म प्रमाणात आढळ-तात. साखर हा अर्थात् वाइनमध्ये कमी अधिक प्रमाणात आढळणारा घटक आहे. वाइनमधील घट-कांचा शेवटचा प्रकार म्हणजे ज्यांना शुष्क वा अमधुर अवलेह ( ड्राय एक्स्ट्रॅक्ट्स ) म्हणतात ते. ह्याच्यात टॅनिन, काही क्षार आणि मद्याला रंग देणाऱ्या कित्येक अतिशय गुंतागुंतीच्या घडणीच्या द्रव्यांचा समावेश होतो. टॅनिन हे द्राक्षांच्या साली, बिया आणि सुरवातीच्या किण्वनासाठी वापरण्यात आलेल्या ओकच्या कास्क्सपासून निष्पन्न होते. टॅनिनमुळे मद्याला किंचित् तुरट, कडवट अशी चव लाभते; नव्या, अपक्क वाइन्समध्ये ही चव काहीशी उग्र असते. वाइनला परिपक्व करण्याच्या प्रक्रियेत टॅनिन महत्त्वाचा भाग घेते आणि अखेरीस ते वाइनमधून बाहेर पडून किट्ट ( डिपॉसिट ) म्हणून बुचाभोवती जमते. वाइनच्या जुन्या बाटल्यांच्या बुचाखाली असे जे किट्ट जमलेले असते, ते ती वाइन परिपक्क होत चालली आहे याची खूण असते. अशा बाटल्या काळजीपूर्वक हाताळाव्या लागतात आणि त्यांतील मद्याचे स्रावण (डिकॅन्टेशन) करावे लागते.

मद्य परिपक्क बनण्याच्या प्रक्रियेत ऑक्सिडेशन ही प्रमुख प्रक्रिया असते आणि ह्यातून निर्माण होणारी संयुगे एकमेकांवर क्रिया-प्रतिक्रिया करीत असतात. ही सर्व प्रक्रिया अतिशय गुंतागुंतीची असते आणि वर म्हटल्याप्रमाणे ती आपल्या संथ गतीने चाललेली असते. कुणी घाईगर्दीने तिच्यात हस्तक्षेप केला, तर तिचा नाजुक समतोल बिघड-ण्याचा संभव असतो. बाटलीतही ही प्रक्रिया चालूच असल्यामुळे उत्कृष्ट मद्याच्या बाटल्यांची निर्यात करता येत नाही. प्रवासात ती बिघडण्याचा संभव असतो. कास्कमध्ये वाइन जितकी पक्व होऊ शकते तितकी ती पक्व झाल्यानंतर कास्कमध्येच तिची निर्यात करण्यात येते आणि त्या त्या ठिकाणी ती बाटल्यात भरण्यात येते.

बाटलीतील मद्य पुरेपूर परिपक्व कधी होईल, आपली सर्वोत्कृष्ट अवस्था ते कधी गाठील, हे सांगणे अतिशय कठीण असते. एखादा अनुभवी तज्ञच यासंबंधीचा कयास बांधू शकतो आणि तोही फसणे शक्य असते. चांगल्या प्रकारे परिपक्व होऊ शकणारी वाइन जर तिच्या 'तरुण'पणी प्यायली गेली, तर ती वाया जाते. तज्ञतेचा आव न आणणाऱ्या एका चोखंदळ माणसाने एके ठिकाणी असे लिहून ठेवले आहे की, 'हे मी ऑक्टोबर १९५७ मध्ये लिहीत आहे. १९२४ आणि १९२७ चे पोर्ट (वाइन) मी आज पितो आणि ही दोन्ही मद्ये उत्कृष्ट अवस्थेत आहेत. ह्यांपैकी एक मद्य मी १९३८ मध्ये प्यालो तेव्हा ते मला काहीसे कच्चे आढळले होते... ४५ सालच्या पोर्ट मद्याच्या काही बाटल्या मी सेंट्सबरी क्लबला भेट म्हणून दिल्या आहेत. त्या कधी उघडाव्यात असे तज्ञ मंडळी ठरवितात ते पाहूया.' तेव्हा वाइन ही एक सजीव वस्तू असते असे म्हणता येईल. द्राक्षरस आणि यीस्ट यांच्या संयोगाने तिची गर्भधारणा होते आणि लाकडी कास्कमध्ये ह्या गर्भाचा विकास होतो. बाटलीत तिचा जन्म होतो आणि वय वाढते तशी पौगंडावस्था ओलांडून ती आपले ऐन उमेदीचे वय गाठते. ह्यावेळी तिचा आस्वाद घेतला पाहिजे; पण ही संधी आपण हुकविली, वाइन बाटलीत तशीच राहू दिली तर ती वृद्ध, जीर्ण होऊ लागते, ती निष्प्रभ बनते, तिच्या अनेक घटकांत रासायनिक परिवर्तन होऊन त्यांची अम्ले बनतात आणि वाइनचे व्हिनिगरमध्ये-शिरक्यामध्ये-रूपांतर होते.

ह्याबाबतीत रेव्ह. आर्. एच्. बार्‌हॅम ह्यांचे म्हणणे ध्यानात घेण्याजोगे आहे.

Though Port should have age,
Yet I don't think it sage
To entomb it, as some
of your connoisseurs do,

अनुक्रमणिका







Till it's losing its flavour,
and body, and hue;
I question if keeping it
does much good
After ten years in bottle
and three in wood.

पण कवीने ज्या कालावधीचा, योग्य लांबीचा कालावधी म्हणून निर्देश केला आहे त्याच्यावरून त्याची उतावळी वृत्ती प्रकट होते, असेच जाणकार म्हणतील.

आता विशिष्ट वाइन्सकडे वळू या. क्लॅरेट आणि लाल बर्गंडी ह्या दोन वाइन्समधला मुख्य भेद असा आहे, की लाल बर्गंडी ही बर्गंडीतील कित्येक विशिष्ट लहान द्राक्षमळ्यांतील द्राक्षांपासून बनविण्यात येते. ह्यामुळे आणि अनेक द्राक्षमळ्यांची मालकी अनेकाकडे संयुक्तपणे असल्यामुळे बरीचशी 'बर्गंडी' ह्या नावाने ओळखण्यात येणारी वाइन अनेक वाइन्सचे मिश्रण असते. अर्थात एका विशिष्ट द्राक्षमळ्याच्या, चांगल्या हंगामातील द्राक्षांपासून बनविण्यात आलेली 'शुद्ध' बर्गंडी महाग असते. तिची किंमत रु. ५०० किंवा अधिक असेल.

'क्लॅरेट' हा इंग्लिश शब्द Clairet ह्या फ्रेंच शब्दापासून आला आहे; Vin clairet म्हणजे नितळ, फिक्या रंगाचे मद्य. क्लॅरेट ही सर्व उत्कृष्ट वाइन्समधील सर्वांत शुद्ध आणि नैसर्गिक अशी वाइन आहे. द्राक्षांचा रस काढण्यापासून तो वाइन बाटलीत भरेपर्यंत कोणताही बाह्य पदार्थ तिच्यावर लादला जात नाही, दुसऱ्या कशाचेही तिच्याशी मिश्रण करण्यात येत नाही. जे गुण तिच्यात विकसित होतात ते तिच्या अंगभूत गुणांपासून उत्क्रांत झालेले असतात. जर क्लॅरेट म्हणून बनविण्यात येणारी वाइन गुणवत्तेचा योग्य तो मानदंड गाठू शकली नाही, तर 'क्लॅरेट' हे नाव तिला देण्यात येत नाही. मग सामान्य वाइन म्हणून ती विकण्यात येते.

बहुतेक सर्वोत्कृष्ट क्लॅरेट्स् बॉर्दोच्या मेडॉक परगण्यातून येतात; हा जिरोंदे नदीच्या डाव्या तीरावरील प्रदेश. अठराव्या शतकापासून ह्या प्रदेशात निर्माण होणाऱ्या क्लॅरेट्सची प्रतवारी लावण्याचे प्रयत्न करण्यात आले आहेत. १८५५ पासून जिरोंदे 'जिल्ह्या'च्या क्लॅरेट्सची प्रतवारी करण्याचा अधिकार बॉर्दोच्या चेंबर ऑफ कॉमर्सला देण्यात आला आहे. ह्या चेंबरने मेडॉकमधील ६१ प्रमुख द्राक्षमळ्यांतून निर्माण होणाऱ्या क्लॅरेट्सचे पाच प्रतींत वर्गीकरण केले आहे. सर्वश्रेष्ठ वर्गात मोडणाऱ्या क्लॅरेट्स म्हणजे शाटो लाफित-रोथशिल्ड, शाटो लातूर आणि शाटो मार्गॉ. अर्थात् ही एक गोष्ट ध्यानात ठेवली पाहिजे, की एखाद्या वर्षी पाचव्या प्रतीच्या एखाद्या द्राक्षमळ्यातून बनविण्यात आलेली वाइन दुसऱ्या प्रतीच्या एखाद्या वाइनशी स्पर्धा करू शकेल आणि ह्याच्या उलटही होईल.

ही जी प्रतवारी लावण्यात आली आहे ती मेडॉक विभागातील द्राक्षमळ्यांची; बॉर्दोमधील इतर विभागांत, विशेषतः ग्रेव्हज, सांत एमीलिऑं आणि पोमेरोल ह्या विभागांत उत्कृष्ट क्लॅरेट्स निर्माण होतात. उदा. शाटो हो–ब्रिऑं हे ग्रेव्हजचे मद्य मेडॉकमधील पहिल्या प्रतीच्या क्लॅरेट्सच्या दर्जाचे असते.

क्लॅरेट ही बर्गंडीपेक्षा ड्राय (अमधुर) असते. मासे किंवा कोंबडीबरोबर क्लॅरेटचे घुटके घेणे हा तिचा सर्वांत योग्य उपयोग. गोड पदार्थ किंवा कालवे–तिसऱ्या ह्यांच्यासोबत क्लॅरेट घेणे गांवढळपणाचे ठरेल. क्लॅरेटच्या गेल्या तीस वर्षांतील सर्वोत्कृष्ट हंगामांची (व्हिंटाज) वर्षे म्हणून १९४७, १९४९, १९५३ आणि १९५९ यांचा निर्देश करता येईल. १९४५, १९४८, १९५०, १९५२, १९५३, १९६१, १९६२ आणि १९६४ ही सुद्धा चांगली वर्षे होती. क्लॅरेट चांगली असेल तर व्हिंटाजनंतर निदान बारा वर्षे तिला पक्व व्हायला अवसर देऊन ती प्यावी लागते. उत्कृष्ट क्लॅरेट वीस ते तीस वर्षांत आपली परिणतावस्था गाठते. सर्वसाधारण क्लॅरेट व्हिंटाज-नंतर सहासात वर्षांनी पितात.

बॉर्दोमध्ये केवळ लाल वाइन्स होतात असे नाही. बॉर्दोमधील ग्रेव्हज् ह्या विभागात उत्कृष्ट पांढरी, अमधुर वाइन बनविण्यात येते. ही हलकी असते व म्हणून विशेषतः दुपारच्या जेवणाच्या वेळी मासे किंवा कोंबडीसोवत ती घेणे पसंत करतात. बॉर्दोच्या ईशान्येला असलेल्या प्रदेशाला सॉटर्न्स

म्हणतात आणि हा मधुर पांढऱ्या मद्यांसाठी प्रसिद्ध आहे. ह्यांतील chateau d ' yquem ही वाइन सर्वश्रेष्ठ आहे. सॉटर्न्सची मधुर मद्ये गोडपदार्थां-बरोबर घेतात किंवा जेवणानंतर घेतात.

क्लॅरेटला मद्यांची राणी म्हणतात तर बर्गंडीला मद्यांचा राजा म्हणतात. क्लॅरेटपेक्षा बर्गंडीची रुची अधिक समृद्ध असते. कोकणातील मंडळींना ह्या फरकाची कल्पना देण्यासाठी सौंदाळे आणि मुडदशा ह्यांच्या रुचीमधील फरकासारखा तो असतो, असे सांगता येईल. अधिक काव्यमय पण इतक्याच बिन-चूक रीतीने हा फरक असा स्पष्ट करण्यात आला आहे. ' क्लॅरेट ही वीस वर्षांच्या निष्पाप, गोड मुलीसारखी असते; बर्गंडी तीस वर्षांच्या सुंदर पुरंध्रीसारखी असते.' ही उपमा स्त्रीशिक्षणाला सुरवात होण्यापूर्वीच्या काळची आहे. तुम्हाला खरोखरच पहिल्या प्रतीच्या असलेल्या बर्गंडीच्या चार किंवा पाच बाटल्या सबंध आयुष्यात पिता आल्या, तर तुमच्या जीवनाचे सार्थक झाले असे म्हणण्यात येते. उलट उत्कृष्ट क्लॅरेट तुम्हाला वर्षा-तून अनेकदा प्यायला मिळू शकते.

सर्वश्रेष्ठ लाल बर्गंडी Côte d'or ह्या विभा-गात निपजते. हा ३६ मैलांचा एक उतार आहे आणि त्याचे Côte de Nuits आणि Côte de Beaune असे दोन भाग पाडण्यात आले आहेत Côte de Nuits मध्ये बनणाऱ्या शांबर्टीन, म्युझिनी, Vougeot, Romanee, Richebourg आणि Nuits ह्या बर्गंडी आणि Corton, Pommard, Beaune आणि Voluay ह्या बर्गंडी अतुलनीय मानल्या जातात; भक्तिभावाने आणि आदरातिशयाने त्यांचे सेवन करून त्यात तल्लिन होणे हे मद्यपूजकांचे इहलोकीचे सर्वोच्च श्रेय असते. Côte d'or चे सर्व द्राक्षमळे मिळून १०,००० एकरांहूनही कमी क्षेत्रविस्तार आहे. Côte d'or च्या दक्षिणेला Côtes du Rhone आहे आणि येथील भरघोस रुचीची मद्ये– ह्र्मिटेज, Tavel आणि पोपच्या सन्मानार्थ ' Chateunenf–du–papo ' हे नाव देण्यात आलेले मद्य इ. – प्रसिद्ध आहेत. शिकारीत मार-लेल्या रानपक्ष्यांबरोबर ही मद्ये प्राशन केल्याने दोहोंचीही चव खुलते.

बर्गंडीची चव घेऊन तिची प्रत ठरविणारे व्याव-सायिक एका विशिष्ट आकाराच्या चांदीच्या पेल्या-तून तिची चव घेतात. ह्या पेल्याच्या पृष्ठभागाला आतून कोचे पाडलेले असतात आणि त्यामुळे तुम्हाला वेगवेगळ्या खोलीवर मद्याचा रंग कसा दिसतो ते पाहता येते. कित्येक पेल्यांना आतून एका बाजूला काठ पाडलेले असतात ह्यामुळे प्रकाशाची चमक मद्यातून परावर्तित होताना दिसते. बर्गंडीची उत्कृष्ट हंगामांची अलिकडली वर्षे म्हणजे १९४५, १९४७ आणि १९५२. त्याचप्रमाणे १९४९, १९५३, १९५५, १९५९, १९६१ आणि १९६४ ही वर्षेही ठीक होती.

लाल बर्गंडी असते त्याप्रमाणे पांढरी बर्गंडीही असते आणि फ्रान्समधील सर्वोत्कृष्ट अमधुर मद्यामध्ये ती मोडते. लाल बर्गंडीपेक्षाही ही मद्ये कमी प्रमाणात बनविण्यात येतात. Meursalt, Moutrachets आणि Macounais ह्या भागात बनविण्यात येणारे Pouilly–Fuisse ही ह्या जातीतील सर्वोत्कृष्ट मद्ये ! Pouilly–Fuisse चा रंग हिरवट–सोनेरी असतो आणि त्याची चव विलक्षण ' ड्राय ' असते. बर्गंडीच्या दक्षिणेला शॅब्ली (Chablis) हा प्रदेश आहे. ह्या प्रदेशातील सुमारे हजार एकराच्या द्राक्षमळ्यांतून प्रसिद्ध शॅब्ली हे पांढरे, अमधुर मद्य तयार होते. वाळवंटातील निसर्गदृश्यांचे रुक्ष, करडे सौंदर्य ज्यांना प्रतीत होऊ शकते त्यांना शॅब्लीच्या मुलायम पण अतिशय कोरड्या रुचीतील रस आस्वाद्य वाटेल. रंग, सुगंध आणि रुची ह्यांचा एक विलक्षण मिलाफ पांढऱ्या बर्गंडी मद्यांच्या ठिकाणी झालेला असतो. ही मद्ये सर्वसाधारणपणे ' तरुण ' असताना, तीन ते सहा वर्षांनंतर, प्यायची असतात. मासे, विशेषत: कालवे खाताना ह्या मद्यांची साथ घ्यायची असते किंवा ही मद्ये पिताना त्यांना कालवांची साथ द्यायची असते. पांढरी बर्गंडी आणि शॅब्ली यांच्या उत्कृष्ट हंगामाची अलीकडील वर्षे १९४७, १९५३ आणि १९५९ ही होत.

मद्यांमध्ये जी जातिव्यवस्था सर्वसाधारणपणे मानण्यात येते तिच्यात ह्या फ्रेंच मद्यांचे स्थान सर्वश्रेष्ठ थरातले आहे; ही मद्यांची ' ॲरिस्टॉक्रसी ' होय. पण ह्यांच्याच तोडीची मातबर जर्मन मद्येही

अनुक्रमणिका

आहेत. अठराव्या शतकाच्या अखेरीस ऱ्हाइन नदीच्या वरच्या खोऱ्यात बनविण्यात येणाऱ्या सर्व वाइन्सना 'हॉक' म्हणण्यात येऊ लागले. मेन नदीवरील 'हॉखहाइम' ह्या गावावरून हे नांव पडले. आज ऱ्हाइनगाड, ऱ्हाइनहेस आणि ऱ्हाइनपाल्ट्स ह्या प्रदेशांतील द्राक्षमळचांपासून बनविण्यात येणाऱ्या वाइन्सना हॉक म्हणतात. हॉक्स ह्या पांढऱ्या वाइन्स आहेत. ऱ्हाइनगाडमधील हॉक्स अमधुर आणि दाट असतात; ऱ्हाइनहेसमधील हॉक्स अधिक हलक्या, मऊ आणि किंचित मधुर असतात. ऱ्हाइनफाल्टस (पॅलॅटिनेट) मधील हॉक्स जड आणि मधुर असतात. नाह नदीच्या खोऱ्यातील द्राक्षांपासून बनविण्यात आलेल्या वाइन्सनाही हॉक म्हणतात.

जर्मन मद्यांच्या नावांत प्रदेश आणि द्राक्षमळा ह्या दोहोंचा निर्देश असतो. उदा. 'हॉखहाइमर नॉइबर्ग' म्हणजे हॉखहाइमर ह्या प्रदेशातील नॉइबर्ग ह्या द्राक्षमळचातील द्राक्षांपासून बनविण्यात आलेले मद्य. 'वर्म्स' हाही जर्मनीतील एक प्रदेश आहे; पण तेथे बनविण्यात येणाऱ्या मद्याला 'लीबफ्राउमिल्ख' म्हणतात. ह्या मद्याचा प्रदेशाच्या नावावरून निर्देश न करता त्याला वेगळे, रोमँटिक नाव देण्याचे कारण उघड आहे. जर्मन मद्याच्या बाटलीवर जे लेबल असते त्याच्यावर ते मद्य कोणत्या प्रकारच्या द्राक्षापासून बनविण्यात आले आहे त्याचे तपशीलवार वर्णन असते. उदा. 'आउस्लेझ'– द्राक्षांच्या निवडक घोसांपासून बनविण्यात आले आहे. 'स्पेटलेझ'– द्राक्षे उशिरा गोळा करण्यात आली आहेत. म्हणजे द्राक्षे वेलीवर उशीरापर्यंत राहू देण्यात आली आहेत व म्हणून ती अधिक गोड आहेत, त्यांच्यात साखर भरायला वाव देण्यात आला आहे. 'बीरेनआउझलेझ' – म्हणजे प्रत्येक द्राक्ष निवडण्यात आले आहे. असे करताना द्राक्षांचे सर्व घोस टेबलावर ठेवण्यात येतात आणि जर्मन मुलींचे घोळके टेबलाभोवती जमून एक एक द्राक्ष निवडून बाजूला काढतात. हे काम करीत असताना मुलींना गायला उत्तेजन देण्यात येते. कारण एकाच वेळेला गाणे म्हणणे आणि द्राक्षे खाणे ही दोन्ही कामे करणे कठीण असते. 'ट्रोकेनबीरेन-आउझलेझ–' निवडक वाळलेल्या द्राक्षांपासून हे मद्य बनविण्यात आले आहे. ह्या प्रकारचे मद्य अपवादात्मक वर्षी कधीमधी करण्यात येते. द्राक्षांचा हंगाम जेव्हा अत्युत्कृष्ट असेल तेव्हाच हे करणे शक्य असते. अशावेळी द्राक्षे वेलीवर वाळू देण्यात येतात. अशा वाळलेल्या द्राक्षांमध्ये मुळातील रसाच्या एक चतुर्थांश रस असेल नसेल. ह्या पद्धतीने फारतर पन्नास डझन बाटल्या मद्य बनविता येते. अर्थात ते अतिशय महाग असते. अलीकडच्या काळात १९४९, १९५३ आणि १९५९ ह्या वर्षी असे मद्य बनविण्यात आले आहे. ह्याच्या वरची कडी म्हणजे 'फाइन्स्ट ट्रोकेनबीरनाउझलेझ'– अत्युत्कृष्ट निवडक वाळलेल्या द्राक्षांपासून बनविलेले मद्य.

हॉक्स ही उंच, काळसर तपकिरी बाटल्यांत भरण्यात येतात, तर मोझेले मद्ये गडद हिरव्या बाटल्यांत भरण्यात येतात. हॉक्स दमदार मद्ये आहेत. ती कोणत्याही खाद्य पदार्थांबरोबर, गोड पदार्थांबरोबरसुद्धा, पिता येतात. पण मासे किंवा कोंबडी यांच्याशी त्यांचे खरे जुळते. बीरन आउझलेझ आणि ट्रोकेन बीरन आउझलेझ ह्या 'डेसर्ट वाइन्स' आहेत; त्या जेवणानंतर फळांबरोबर घ्यायच्या असतात.

दुसऱ्या प्रकारची जर्मन वाइन म्हणजे मोझेल. मोझेल, रुव्हर आणि सार ह्या नद्यांच्या खोऱ्यांतील द्राक्षमळचांपासून बनविण्यात येणाऱ्या साऱ्या वाइन्सना मोझेल म्हणतात. ह्या वाइन्स 'ड्राय' असतात आणि त्यांना एक फुलासारखा सुगंध असतो. त्यांच्यात ९% पेक्षा अधिक अल्कोहोल नसतो. ह्यामुळे उन्हाळचात पिण्यासाठी त्या आदर्श असतात. हिरवट पिवळसर वर्णाच्या ह्या हलक्या वाईन्स हंगामानंतर दुसऱ्या किंवा तिसऱ्या वर्षी पिणे योग्य असते. हॉक साधारण दहा वर्षांनंतर पितात. मोझेलच्या पुष्पगंधित रुचीमुळे आणि हलकेपणामुळे वृद्ध माणसांच्या दृष्टीने त्या अतिशय योग्य ठरतात. त्या पिताना उद्या सकाळी आपली काय अवस्था असेल ह्याची चिंता करायचे कारण नसते.

सर्व मोझेल रीझ्लिंग ह्या जातीच्या द्राक्षांपासून बनविण्यात येते. ह्यामुळे कोणत्याही मोझेलच्या बाबतीत ही गोष्ट गृहीत धरण्यात आलेली असते. ह्याव्यतिरिक्त विशिष्ट मोझेलविषयीची माहिती हॉकप्रमाणेच बाटलीवरील लेबलावर देण्यात आलेली असते. उदा. '१९५९ ची व्हेल्नेर झॉनेनुर बीरन

आउझलेझ '– म्हणजे 'व्हेलेनेर प्रदेशातील झॅनिनुर द्राक्षमळ्यांच्या (रीझ्लिंग) जातीच्या निवडक द्राक्षांपासून १९५९ साली बनविण्यात आलेले मद्य.' मोझेलचे द्राक्षमळे लहान असल्यामुळे, द्राक्षमळ्यांची मशागत फार काळजीपूर्वक करावी लागत असल्यामुळे आणि मद्यनिर्मिती व विक्री यांवर कायद्याची कडक बंधने असल्यामुळे मोझेल वाइन कधी स्वस्त नसते. उदा. १९२१ ची बेर्नकास्टलर डोक्टोर फाइन्स्टे ट्रोकेनबीरनआउझलेझ (ह्याचा अर्थ वाचकांना आता लावता आला पाहिजे) ह्या वाइनच्या एका बाटलीची किंमत रु. ५०० अशी एका वाइनलिस्ट-मध्ये नमूद करण्यात आली होती. ही मद्ये काल्पनिक असतील अशी दाट शंका अनेकांना येईल.

मोझेलच्याच वळणाची आणखी एक जर्मन वाइन म्हणजे बव्हेरियातील व्हुर्त्सबुर्ग परगण्यात बनणारी स्टाइनवाइन. ही निकोप, हुकमीपणे काम भागवू शकणारी वाइन सर्व जर्मन वाइन्समध्ये अधिक टिकाऊ असते.

आतापर्यंत ज्यांचा निर्देश, वर्णन आणि काहीशी स्तुती आपण केली त्या सर्वात प्रतिष्ठित अशा वाइन्स आहेत. ही प्रतिष्ठा साधार आहे. पण इतक्या प्रतिष्ठित न मानल्या गेलेल्या तथापि आपल्या गुणांनी ह्या प्रतिष्ठित मद्यांच्या जवळपास येणाऱ्या इतर अनेक वाइन्स युरोपमध्ये बनविण्यात येतात. अल्सासे, Loire, Jura ह्या फ्रान्समधील किंवा फ्रान्सच्या आसपासच्या प्रदेशात अनेक नामवंत वाइन्स बनविण्यात येतात. तसेच पोर्तुगाल-मधील कोलारीस आणि दाओ, मातिअस रोझे आणि कासाल गार्शिया ह्या वाइन्स चोखंदळ रसिकांच्या पसंतीस उतरणाऱ्या आहेत. दाओ ही एक मुलायम, भरघोस आणि ड्राय अशी वाइन आहे. पोर्तुगाल-मधलीच ग्रांजो ही वाइन सातव्या एडवर्ड राजाची आवडती होती.

स्पेनमध्ये पेट्रोलपेक्षा मद्य स्वस्त आहे (किंवा ज. फ्रांको हुकूमशहा असेपर्यंत तरी होते) असे म्हणतात. ह्याचे एक कारण असे, की स्पेनच्या सामाजिक जीवनावर रोमन कॅथलिक चर्चचा काबू होता आणि लोकांनी रविवारी मोटारगाड्यांतून दूर सहलीला जाऊ नये, चर्चमध्ये उपासनेला यावे म्हणून चर्चने पेट्रोल महाग करून ठेवले. परिणामी, चर्चला जाऊन आल्यावर लोक रिकामा वेळ मद्य-प्राशनात घालवितात. स्पेनचे वाइन्ससाठी प्रसिद्ध प्रदेश म्हणजे एब्रो नदीच्या वरच्या बाजूला असलेला रियोजा प्रदेश आणि डॉन क्विक्झोटच्या पराक्रमांनी गाजलेला ला मांचा हा प्रदेश. रियोजा प्रदेशातील सर्वोत्कृष्ट वाइन्स ड्राय आणि काहीशा जड असतात. त्यांच्या बाटल्यांभोवती तारांच्या जाळ्याचे वेष्टन असते आणि बाटलीला शिशाचे सील बसविलेले असते. ह्या खबरदारीचा उद्देश रिकामी बाटली कनिष्ठ मद्य भरण्यासाठी परत वापरली जाण्याला प्रतिबंध करावा हा असतो.

फ्रान्सखालोखाल वाइन्सचे जास्तीत जास्त उत्पादन करणारा देश म्हणजे इटली. सरासरीने पाहता फ्रान्स दरवर्षी १३० कोटी गॅलन्स एवढ्या वाइनचे उत्पादन करतो; इटली १२० कोटी गॅलनचे उत्पादन करते. ह्यापुढचा देश म्हणजे स्पेन. स्पेनमध्ये ३५ कोटी गॅलन्स एवढे वाइनचे उत्पादन होते. इटलीतील सर्वोत्कृष्ट वाइन्स टस्कनीमध्ये बनविण्यात येतात. शियांटी ही प्रसिद्ध वाइन टस्कनीतील. ही लाल आणि पांढरी अशा दोन्ही स्वरूपात असते. उम्ब्रिया ह्या शेजारच्या प्रदेशातील ऑर्व्हितो ही पांढरी वाइनही रसिकमान्य आहे. उम्ब्रियातील मद्यांना कर्णमधुर नावे देण्यात आली आहेत. उदा. उव्हा रोमाना, बियांकोने, स्पोलेतिनो, फामोसो, लाक्रिमा इत्यादी.

शियांटी आणि ऑर्व्हितो ही मद्ये वाळून गवती कोशात गुंडाळलेल्या ग्लास फ्लास्क्समधून ठेवण्यात आलेली असतात. ड्राय ऑर्व्हितो हे मद्य स्पागेती-सारख्या खास इटालियन पक्वान्नाबरोबर सेवन केले, तर त्याची चव विशेष खुलते. इटलीच्या उत्तरविभागातही सुरेख पांढऱ्या आणि लाल वाइन्स निर्माण होतात. लोंबार्डीमधील सासेला ही वाइन सर्वोत्कृष्ट इटालियन मद्यांमध्ये गणली जाते.

ह्यांशिवाय स्वित्झर्लंड, हंगेरी, युगोस्लाव्हिया, ऑस्ट्रिया, रशिया हे युरोपियन देश आणि अल्जीरिया, दक्षिण आफ्रिका, कॅनडा, युनायटेड स्टेट्स हे युरोपियन संस्कृतीच्या विस्तारक्षेत्रातील देश जा




मद्ये निर्माण करतात त्यांची अवहेलना करणे मूर्खपणाचे आणि कृतघ्नपणाचे ठरेल.

आपण आतापर्यंत ज्या वाइन्सचा परिचय करून घेतला त्या 'स्वाभाविक' वाइन्स होत्या. म्हणजे त्यांत बाहेरून आल्कोहोल घालून त्या अधिक 'कडक' करण्यात येत नाहीत. त्यांच्यात असलेला सर्व आल्कोहोल द्राक्षरसातील साखरेचे किंवा भरीला घातलेल्या साखरेचे किण्वन झाल्याने निर्माण झालेला असतो. आता आपल्याला दृढीकृत (फॉर्टिफाइड) वाइन्सकडे वळले पाहिजे. ह्या वर्गातील प्रमुख वाइन्स म्हणजे शेरी, पोर्ट आणि मडिरा ह्या होत.

शांपेन ही वाइन म्हणजे शांपेन ह्या फ्रान्सच्या जुन्या परगण्यात (मॉर्नच्या खोऱ्यात) बनविण्यात येणारी वाइन. दोन विशिष्ट जातींच्या द्राक्षांपासून शांपेन बनविली जाते– काळी पिनो आणि पांढरी शार्डोने. शांपेन बनविण्यासाठी आवश्यक असलेली द्राक्षे इतरत्र कुठेही होऊ शकत नाहीत असे निदान फ्रेंच लोकांचे म्हणणे आहे.

द्राक्षे पिकल्याबरोबर गोळा करतात आणि फक्त उत्कृष्ट द्राक्षे निवडून घेतात. निवडलेल्या द्राक्षांचा प्रचंड लाकडी चरकातून रस काढतात– एका चरकात चार टन द्राक्षे मावू शकतात– आणि रस खालच्या कास्क्समध्ये गोळा होतो. हे सर्व अतिशय जलद गतीने करावे लागते. कारण काळ्या द्राक्षांच्या सालींचा रंग रसाला लागणार नाही अशी खबरदारी घेणे आवश्यक असते. (पिंगट शांपेन ही स्वाभाविकपणे रंगीत नसते; तिच्यात नंतर लाल वाइन मिसळण्यात येते.)

कास्क्समध्ये किण्वन सुरू होते आणि हिवाळाभर थंड, खोल तळघरात ते चालू राहते. जवळजवळ सर्व साखरेचे आल्कोहोल आणि कार्बन डाय-ऑक्साइडमध्ये परिवर्तन होईपर्यंत किण्वन होत राहते; ह्याचा परिणाम म्हणून एक फिकट पांढरी वाइन तयार झालेली असते. पण ही शांपेनची सुरवात आहे.

ह्यानंतर वेगवेगळ्या द्राक्षमळ्यांत बनलेल्या अशा वाइन्सचा योग्य प्रमाणात मिलाफ करून इष्ट ते पोत, स्वाद, गंध आणि चव असलेली वाइन सिद्ध करावी लागते. ह्यामुळे शांपेनला 'व्हिंटाज' वर्ष नसते. सामान्यपणे वेगवेगळ्या वर्षांतील वाइन्सचा मिलाफ करून शांपेन बनविण्यात आलेली असते. कधीकधी एकाच वर्षीची वाइन इष्ट स्वरूपाची निघते. मग ही व्हिंटाज वर्षे म्हणून मानता येतील. उदा. १९२८ व १९२९.

वसंत ऋतू आला की शांपेन बाटल्यांत भरण्यात येते. ही प्रक्रिया गुंतागुंतीची असते. प्रथम शांपेनची परीक्षा करून जुन्या मद्यात विरघळलेली शुद्ध उसाची साखर तिच्यात योग्य प्रमाणात घालतात. ह्यामुळे किण्वनाची प्रक्रिया परत सुरू होते. मग वाइन मजबूत बाटल्यांत ओतून त्यांच्यावर धातूच्या पट्टयांनी घट्ट धरून ठेविलेली बुचे बसवितात. अशा हजारो बाटल्या थंड तळघरांमध्ये रचून ठेवलेल्या असतात. आता बाटलीत किण्वन सुरू झालेले असते व वाइनही परिपक्व होत असते. किण्वनामुळे जो कार्बन डाय– ऑक्साइड वायू निघतो तो बाटलीतून निसटू शकत नाही. मोठ्या दाबाखाली तो वाइनमध्ये मिसळतो. ह्यामुळे बाटल्या अधूनमधून फुटतात.

बाटल्या अशा अवस्थेत निदान एक वर्षभर, पण कधीकधी सहा वर्षेपर्यंत ठेवल्या जातात. बाटलीमध्ये परिपक्व वाइन तयार झालेली असते. अतिवायू तिच्यात विरघळलेला असतो. पण ह्याशिवाय तिच्यात बरेच कीटही गोळा झालेले असते. हे सबंध बाटलीत विखुरलेले आणि बाटलीच्या आतील बाजूलाही लागलेले असते. हे काढून टाकण्यासाठी एक विशिष्ट पद्धतीचा अवलंब करतात. प्रत्येक बाटली हालवितात आणि हळूहळू अधिकाधिक तिरपी करून ती पूर्णपणे उलटी करतात ह्यामुळे कीट बुचाशी येऊन जमा होते. मग बाटलीचे तोंड अतिशय थंड पाण्यात बुडवून धरतात. ह्यामुळे बुचाजवळचे मद्य गोठते. आता बाटली जवळजवळ आडवी धरता येणे शक्य होते. मग बुचाला बसविलेल्या धातूच्या पट्टया सोडतात. त्याबरोबर बूच आणि त्याच्याशी जमून राहिलेले कीट जोराने बाहेर फेकले जाते आणि थोडा फेसही बाहेर येतो. जवळ दुसरा एक माणूस उभा असतो, तो वाईन चाखून तिच्यात योग्य प्रमाणात साखर घालतो आणि बाटलीला नवीन बूच दाबून बसवितो. तार लावून ते घट्ट बसविण्यात येते. बाटली सहा महिने तशीच ठेवण्यात येते व मग लेबल लावून, गवताच्या केसमध्ये घालून ती विकण्यात येते.

शांपेन चार प्रकारची असते. पूर्णपणे अमधुर, काहीशी अमधुर, काहीशी मधुर आणि मधुर.

साधारणपणे वर्षाला पाच कोटी शांपेनच्या बाटल्यांची निर्मिती होते. विशेष आनंदाचा प्रसंग साजरा करण्यासाठी शांपेन पिण्याची प्रथा आहे. पण शांपेनचे वैशिष्टच असे की ती कधीही पिता येते. विशेषतः मध्यवयीन माणसांच्या दृष्टीने ती पथ्यकर वाइन आहे.

वाइनचे दृढीकरण करणे म्हणजे तिच्यात स्पिरिट्स– विशेषतः ब्रँडी– घालून तिच्यातील आल्कोहोलचे प्रमाण वाढविणे ही रीत अगदी ओबड-धोबड स्वरूपात वापरून अनेक निकृष्ट मद्ये बनविण्यात येतात. हलक्या प्रतीच्या द्राक्षांचा लगदा करून त्याचे काही काळ किण्वन होऊ देण्यात येते आणि लगेच त्याच्यात आवश्यक तेवढे स्पिरिट घालून त्यातील आल्कोहोलचे प्रमाण ८ % एवढे करण्यात येते. हे स्पिरिट घातल्याबरोबर द्राक्षरसाचे पुढील किण्वन थांबते. म्हणजे द्राक्षरसात असलेली साखर तशीच राहते व गोड मद्य तयार होते.

पण जेव्हा ऊर्ध्वपातनाचा ( डिस्टिलेशन) शोध लागला तेव्हा वाइनमध्ये स्वाभाविकपणे निर्माण होणाऱ्या आल्कोहोलची जी १५ % ही मर्यादा होतो ती वाइनचे स्वरूप बिघडू न देता कशी उल्लंघिता येईल, आणि वाइन अधिक शक्तिमान कशी करता येईल हे शोधून काढण्याची खटपट सुरू झाली. अखेरीस वाइन आणि ब्रँडी ह्यांचा योग्य प्रकारे संयोग करून वैशिष्टयपूर्ण अशा दृढीकृत वाइन्स बनविण्याच्या पद्धती रूढ झाल्या. शेरी, पोर्ट, मडिरा, इ. ह्या प्रकारच्या वाइन्स होत. त्यांच्यात आल्कोहोलचे प्रमाण १८ % ते २० % असते.

आपण शेरीपासून सुरवात करू. खरी शेरी ही स्पेनमधल्या Jerez de la Frontera ह्या गावात आणि आजूबाजूच्या प्रदेशात बनविण्यात येते. ( इतर ठिकाणी शेरीच्या पद्धतीने बनविण्यात येणाऱ्या वाइनलाही ' शेरी ' म्हणतात पण ही तोतया शेरी असते. ) आपण केवळ खऱ्या शेरी-विषयी बोलणार आहोत. शेरी स्थानिक पांढऱ्या द्राक्षांपासून बनविण्यात येते. ह्या द्राक्षांतील सर्वात प्रसिद्ध द्राक्षे म्हणजे Albariza द्राक्षमळ्यातील पालोमिनो द्राक्षे.

द्राक्षे सप्टेंबरच्या सुरवातीला गोळा करतात आणि ती शक्य तितकी पिकलेली असावी लागतात, नंतर ती चोवीस तास उन्हात वाळविण्यात येतात. चांगली सुरकुतल्यावर ती मोठ्या द्रोणीत ओततात आणि मजूर विशिष्ट आकाराच्या बुटाच्या साहाय्याने त्यांना चिरडतात. येणारा रस कास्क्समध्ये साठवून ठेवण्यात येतो. कास्कमध्ये किण्वन सुरू होते; सुरवातीला जोमदारपणे खळबळ माजून आणि नंतर संथपणे. हे सुमारे चार महिने चालते. ह्या अवधीत मद्यातील जवळजवळ सर्व साखर फस्त करण्यात आलेली असते आणि तयार झालेली वाइन स्वच्छ आणि ड्राय असते. ती गाळून दुसऱ्या कास्कमध्ये ओतून कित्येक वर्षे तशीच ठेवून देण्यात येते. ह्या अवधीत कधीकधी एक विलक्षण प्रक्रिया घडून येते. एका विशिष्ट यीस्टमुळे ज्याला द्वितीय किण्वन म्हणतात ते घडून येते. जिज्ञासूंसाठी ह्या यीस्टचे नाव ' सॅकॅरोमायसिस एलिप्सॉयडस ' असे आहे हे नमूद केले पाहिजे. हे यीस्ट द्रवाच्या पृष्ठभागावर तरंगत असते आणि ज्या कास्कमध्ये ते असते आणि द्वितीय किण्वन सुरू करते. त्याच्यात एक नाजूक, पेलव मद्य तयार होते, त्याला फिनो म्हणतात. ज्या कास्कमध्ये हे यीस्ट नसते त्यात तयार होणाऱ्या मद्याला रयस म्हणतात.

हे जे मद्य असते त्याच्यात साखर अजिबात नसते. त्याच्यात ब्रँडी घालून तिचे दृढीकरण करण्यात येते. ही ब्रँडी अधिक भरड स्वरूपाच्या रयसपासून ऊर्ध्व-पातनाने बनविण्यात आलेली असते. ही मात्र वाइन काही काळ तशीच साठवून ' नर्सरी 'त ठेवण्यात येते. मग ह्या जतन करून ठेवलेल्या कास्कसमधून काही निवडक कास्क्स ' सोलेरा व्यवस्थे 'त समाविष्ट करण्यात येतात. शेरीच्या उत्पादनात ही सोलेरा व्यवस्था अत्यंत महत्त्वाची आहे.

ही जी दृढीकृत किंवा मिश्र वाइन असते ती कास्कमध्ये संथपणे सुधारत जाते. ह्या प्रक्रियेला जवळजवळ अंत नसतो. पण त्याबरोबरच अमुक वयाच्या वाइनचे स्वरूप, तिची गुणवत्ता नेमकी कशी असेल ह्याचे अगोदर निश्चित निदान करणे






कठीण असते. तेव्हा एकाच वयाची आणि गुणवत्तेची वाइन असलेले मोठाले कास्क्स निवडून त्यांचा एक सोलेरा बनवितात. काही वर्षांनंतर ह्या सोलेरावर असाच दुसरा सोलेरा चढवितात. आणखी काही वर्षानंतर दुसऱ्या सोलेरावर तिसरा सोलेरा चढवितात ह्या तीन ( कधी चार ) थरांची मिळून सोलेरा व्यवस्था बनते. ही व्यवस्था पुरी झाल्यावरच कास्क्समध्ये किंवा बाटल्यांत भरण्यासाठी तिच्यातून मद्य बाहेर काढण्यात येते.

मद्य सर्वात खालच्या थरातून काढण्यात येते आणि कधीही खालच्या थरातील कास्क्समध्ये असलेल्या एकंदर मद्याच्या एक दशांशापेक्षा अधिक मद्य काढण्यात येत नाही. मग त्यांच्या लगतच्या वरच्या कास्क्समधील मद्य त्यांच्यांत ओतून ते भरण्यात येतात आणि अगदी वरच्या थरातील कास्क्समधील मद्याने दुसऱ्या थरातील कास्क्स भरण्यात येतात. हळूहळू वरच्या थरातील कास्क्स रिकामे होतात. मग त्यांच्याजागी 'नर्सरी'तील निवडक कास्क्स ठेवण्यात येतात.

ह्यावरून असे दिसून येईल, की शेरीच्या बाटलीमध्ये सोलेरा व्यवस्थेतील जुन्यात जुनी वाइन समाविष्ट असते आणि ती कधीकधी १०० वर्षांइतकी जुनी असते. त्याचप्रमाणे अलिकडच्या काळातील, वरच्या कास्क्समधून आलेली वाइनही तिच्यात घटक म्हणून असते पण ही सुद्धा सहा–सात वर्षांपेक्षा अलिकडची नसते. क्लॅरेट ही जशी विशिष्ट वर्षाच्या हंगामातील वाइन असते तशी शेरी नसते, ती वेगवेगळ्या वाइन्सचा मिलाफ करून बनविलेली असते हे ह्यावरून उघड होईल. शिवाय प्रत्येक शेरीची जी विशिष्ट चव, स्वाद, रंग असतो, 'कडकपणा' असतो तो साधण्यासाठी वेगवेगळ्या सोलेरांमधून वाइन्स निवडून त्यांचे योग्य प्रमाणात मिश्रण करण्यात येते.

उदा. सर्व स्पॅनिश शेरी 'ड्राय' असतात पण निर्यातीसाठी काही मधुर शेरी बनवितात. ह्यासाठी विशिष्ट रीतीने पक्व करण्यात आलेले, एक मधुर मद्य– 'डुल्से'– शेरीमध्ये मिसळण्यात येते. शेरीला इष्ट तो रंग देण्यासाठी कॅरामेलचे एक द्रावण वापरण्यात येते. अतिशय फिकट शेरी 'ड्राय' असतात व काळसर शेरी मधुर असतात अशी एक समजूत आहे. ती काही प्रमाणात सत्य असली, तरी सर्वथैव सत्य नाही. उत्कृष्ट फिनो शेरी फिकट आणि ड्राय असतात. त्यांना कृत्रिमपणे रंग किंवा गोडी देण्यात येत नाही.

पण इतर शेरीमध्ये वेगवेगळ्या घटकांचा मिलाफ योग्य प्रकारे व्हावा म्हणून उत्कृष्ट हंगामातील परिपक्व मद्य वापरतात, तसेच १८% ते २०% हे आल्कोहोलचे प्रमाण साधण्यासाठी तिचे आवश्यक तर परत 'दृढीकरण'ही करतात. अखेरीस अंड्याचा पांढरा बलक वापरून तिच्यातील कीट काढून टाकतात आणि स्वच्छ तरतरीत स्वरूपात ती बाटलीत भरण्यात येते. 'फिनो' – फिकट, 'ड्राय,' डौलदार– 'मांझनिला'– अतिशय 'ड्राय,' फिकट, समुद्रकिनाऱ्याजवळ पक्व झाल्यामुळे एक विशिष्ट 'टँग' असलेली– 'अमाँतिलादो' – किंचित् 'आमोरोसा' – अधिक मधुर– 'ओलोरोसो' – खूपच मधुर आणि काळसर– आणि शेवटी 'ब्राउन शेरी' – कृष्णवर्णी व असहचपणे मधुर असलेली शेरी ह्या परिचित शेरी आहेत.

आपण वर म्हटल्याप्रमाणे तोतया शेरी खूपच बोकाळलेल्या आहेत; पण दक्षिण आफ्रिकेतील कित्येक शेरी खऱ्या शेरीच्या तोडीच्या असतात.

'मुलांना जसे दूध तशी म्हाताऱ्यांना शेरी' अशी स्पॅनिश म्हण आहे. शेरी कधीही, कोणत्याही प्रसंगी पिता येते हे तिचे वैशिष्टच आहे. कधीही अचानकपणे पाहुणा आला तर आपण जसा चहाचा पेला त्याच्या पुढे धरू शकतो तसा शेरीचा ग्लास धरू शकतो. पहिल्या एलिझबेथ राणीच्या वेळेपासून 'सॅक' ह्या नावाखाली इंग्लंडमध्ये शेरी लोकप्रिय होती. फॉल्स्टाफने तिचे गोडवे गायिले आहेत. त्याचे म्हणणे असे आहे की एखादा माणूस विद्वान असतो पण त्याचे सर्व ज्ञानधन एखाद्या कृपणाच्या सुवर्णधनासारखे कडीकुलुपात असते; पण 'सॅक'ने त्याजी जीभ सुटते, ते बाहेर येते, त्याचा उपयोग होतो. पण १८ व्या शतकापासून शेरी इंग्लंडमध्ये खऱ्या अर्थाने लोकप्रिय होऊ लागली. त्यावेळच्या प्रिन्स रीजंटने– आपल्याला मदिरा पिऊन कंटाळा आला आणि यापुढे शेरीशिवाय दुसरे काही पिणार

नाही असे जेव्हा उद्‌गार काढले, तेव्हा शेरी फॅशनेबल बनली; ती अजून तशी आहे.

क्षुधाचेतक ( ॲपिटायझर ) म्हणून जेवणापूर्वी कॉक्टेल्स घ्यायची प्रथा पडली आहे, पण कॉक्टेल्स-पेक्षा शेरी ही क्षुधाचेतक म्हणून अधिक चांगली आहे. कॉक्टेल्समुळे जीभ आणि टाळू– चव घेण्याची इंद्रिये– काहीशी बधिर होतात. शेरीमुळे ती स्वच्छ आणि तरतरीत होतात. ज्यांना जेवणानंतर पोर्ट जड पडते त्यांच्यासाठी शेरी हे उत्तम भोजनोत्तर पेय आहे. दुसऱ्या दिवशी सकाळी पश्चात्ताप कर-ण्याची पाळी येत नाही. इंग्लंडमधील हिवाळ्यातील विशेष थंडगार दिवशी अंगात ऊब आणायला शेरी-सारखे पेय नाही. एकोणिसाव्या शतकातील स्टेज–कोचमधून प्रवास करणाऱ्या उतारूंना रात्री अपरात्री जेव्हा इन्समध्ये घोडे बदलीपर्यंत मुक्काम करावा लागे, तेव्हा शेरी आणि सीड-केक हा त्यांचा आवडता फराळ असे. जॉन ॲबर्नेथी हा एकोणिसाव्या शत-काच्या काळात इंग्लंडमधला सर्वांत प्रसिद्ध सर्जन होता. त्याला जेव्हा एका स्त्रीने ' शेरीचा एखादा ग्लास प्यायची सर्वांत चांगली वेळ कोणती ? ' असा प्रश्न केला तेव्हा, ' बाई, जेव्हा कधीही शेरी मिळेल ती वेळ ' असे त्याने उत्तर दिले.

पण स्वतः स्पॅनिश लोकांच्या म्हणण्याप्रमाणे दोन प्रकारच्या प्रसंगी शेरी पिणे उचित असते. ' एक, जेव्हा तुम्ही बाकालाव् ( वाळलेला कॉड मासा ) खात असता तेव्हा; दोन, जेव्हा तुम्ही बाकालाव् खात नसता तेव्हा. '

दुसरी महत्त्वाची दृढीकृत वाइन म्हणजे पोर्ट. ' पोर्ट ' ह्या वाइनची इंग्लंडमध्ये कायद्याने व्याख्या करण्यात आली आहे. इंग्लंड आणि पोर्तुगाल ह्या दोन राष्ट्रांत झालेल्या करारावर ही व्याख्या आधा-रण्यात आली आहे. ह्या व्याख्येप्रमाणे पोर्ट ही ' दुओरो प्रदेशात बनविण्यात आलेली आणि पोर्तु-गालमधील ओपोर्तो बंदराहून जहाजातून पाठवि-ण्यात आलेली दृढीकृत वाइन ' होय.

पोर्ट बनविण्याची पद्धत म्हणजे वाइन ' तरुण ' असताना, तिचे किण्वन पूर्ण व्हायच्या कितीतरी पूर्वी तिच्यात ब्रँडी घालणे. जेव्हा ही ब्रँडी घाल-ण्यात येते तेव्हा द्राक्षरसातील फारच थोड्या साख-रेचे आल्कोहोलमध्ये रूपांतर झालेले असते. ब्रँडी-मुळे वाइनमधील आल्कोहोलचे प्रमाण इतके वाढते की एन्झाइम्सचे कार्य पुढे चालू राहणे अशक्य होते. ह्यामुळे द्राक्षरसातील साखरेमुळे येणारी माधुरी कायम राहते.

दुओरो खोऱ्यातील द्राक्षापासून पोर्ट बनविण्यात येते. ज्या जमिनीत ह्या द्राक्षवेली लावलेल्या असतात ती जवळ जवळ खडकाळ आहे असे म्हणता येईल; पण निसर्गाच्या किमयेने जी थोडीशी द्राक्षे ह्या वेलींना लागतात ती अप्रतिम असतात. एका जातीची द्राक्षे तर आरपार रंगीत असतात; साल, गर, आणि बिया, सर्व रंगीत असतात.

पिकलेली द्राक्षे गोळा केल्यानंतर पारंपरिक पद्धतीप्रमाणे शेतकरी ती अनवाणी पायांनी तुडवून त्यांचा रस काढतात, बिया आणि देठ यांचा चुराडा होऊन रसात कडवटपणाचा अंश रिघू नये ह्या उद्देशाने ह्या पद्धतीचा अवलंब करतात. शिवाय असे केल्याने साली रसात पूर्णपणे मिसळून वाइनचा रंग दाट होतो.

अनेकांना ह्या पद्धतीचा वीट येतो. त्यांनी ही गोष्ट ध्यानात घ्यावी की द्राक्षे पायांनी तुडविल्यामुळे जी घाण, जंतू, इत्यादी रसात शिरत असतील त्यांचे रसातून पूर्णपणे उच्चाटन होईल अशी प्रक्रिया रसावर नंतर करण्यात येते. हातांनी बनविलेले जे पदार्थ आपण खातो त्यांच्यापेक्षा पोर्ट कितीतरी अधिक शुद्ध असते.

रसाचे किण्वन दोन तीन दिवस चालल्यानंतर रसात ब्रँडी घालून ते रुद्ध करण्यात येते. ही ब्रँडी स्थानिक द्राक्षांपासून बनविलेली असते आणि ' तरुण ' आणि कडक असते. ब्रँडी आणि नवीन, गोड वाइन यांचे हे मिश्रण हिवाळाभर तसेच ठेवण्यात येते आणि मग दुओरो नदीतून ओपोर्तोला पाठविण्यात येते. तिथे परिपक्व होण्यासाठी तिला शीतगृहात साठवून ठेवण्यात येते. ह्यानंतर अधून-मधून तिची चव घ्यावी लागते आणि योग्य ती चव येण्यासाठी वेगवेगळ्या कास्क्समधल्या वेगवेगळ्या वर्षांच्या पोर्ट्सचे मिश्रण करावे लागते.

पण एखाद्या वर्षी सर्व गोष्टी यथासांग जुळून आलेल्या असतात आणि असाधारण गुणवत्तेची

वाइन निर्माण झाल्याचे आढळून येते. मग तिच्यात दुसरी पोर्ट न मिसळता तिला पक्व होऊ देऊन बाटल्यांत भरण्यात येते. ही 'व्हिंटाज पोर्ट.' हिला अतिशय आदराने वागविण्यात येते आणि हे सर्वथैव उचित आहे. व्हिंटाज पोर्ट साधारण दोन किंवा तीन वर्षांनी बाटल्यांत भरण्यात येते आणि ती बाटलीत स्थिरपणे निदान पाच वर्षे ठेवण्यात येते. ह्या अवधीत तिच्यात बरेच कीट गोळा होऊन ते खाली बसते. जुन्या पोर्टच्या बाटलीत अशा किटाचा एक थर जमलेला असतो. त्याला क्रस्ट म्हणतात. म्हणून पोर्टचे बाटलीतून काळजीपूर्वक 'स्रावण' (डिकँटेशन) करावे लागते. मेरेडिथचे ह्याविषयीचे वाक्य प्रसिद्ध आहे. 'जुनी पोर्ट आपल्याला सबंध बाटली लाभू देत नाही.' जिला 'उशिरा बाटल्यांत भरलेली व्हिंटाज पोर्ट' म्हणतात ती कास्कमध्ये जवळजवळ पंधरा वर्षे परिपक्व व्हायला देऊन मग बाटलीत भरण्यात आलेली असते.

नवीन पोर्टचा रंग दाट जांभळा असतो. लाल वाइनचा रंग काळाप्रमाणे फिकट होत जातो. पोर्टमध्येही हा बदल घडतो पण तो अधिक जलद घडतो. जांभळचाची ती माणकासारखी लाल बनते आणि मग 'टॉनी' रंगाची बनते. सर्व 'जीर्ण' पोर्ट टॉनी रंगाची असते; पण सर्व टॉनी रंगाची पोर्ट जीर्ण नसते. पांढऱ्या द्राक्षांपासून बनविण्यात आलेली पांढरी पोर्ट असते आणि लाल रंगाच्या पोर्टमध्ये ती मिसळून तिला टॉनी रंग देण्यात येतो. व्हिंटाज पोर्ट नसलेली पोर्ट कास्कमध्येच परिपक्व करतात आणि मग बाटल्यांत भरतात. ह्यामुळे त्यांच्या बाटल्यांत फारसे कीट जमत नाही.

पोर्टच्या स्वादात द्राक्षाचा स्वाद स्पष्टपणे जाणवतो. 'एकच प्याला' हे नाटक पाहून किंवा वाचून ज्याने मद्याची कल्पना बनविली असेल त्याच्या कल्पनेशी सर्वात जुळणारे मद्य म्हणजे पोर्ट. ती रंगीत असते, गोड असते (त्याशिवाय कुणी ती का पिईल ?) आणि तिला द्राक्षाचा गंध येत असतो.

इंग्लिश उच्च वर्गाच्या संस्कृतीचा आणि पोर्टचा घनिष्ट संबंध आहे. दुसऱ्या महायुद्धापूर्वी कोणताही औपचारिक भोजनसमारंभ हा भोजनानंतर पोर्ट दोनदा फिरविण्यात येईपर्यंत संपत नसे.

पोर्ट फिरविण्याची विशिष्ट पद्धत आहे. टेबलाभोवती मंडळी बसलेली असतात आणि पोर्ट डावीकडून उजवीकडे अशी– घड्याळाच्या काट्यासारखी फिरविली जाते. देवाला प्रदक्षिणा घालण्याची आपली पद्धत अशीच असते. हा बहुधा अतिप्राचीन काळापासून चालत आलेल्या आर्यांच्या प्रथेचा अवशेष असावा. पण ह्यावरून पोर्टचा समारंभाशी, सामाजिक विधींशी संबंध आहे हे स्पष्ट होते. उदा. जेव्हा औपचारिक भोजनसमारंभात राजाच्या (किंवा राणीच्या) स्वास्थ्याप्रीत्यर्थ 'टोस्ट' प्राशन करण्यात येतो तेव्हा तो 'पोर्टमध्ये' पिण्यात येतो; म्हणजे पोर्ट पिण्यात येते. त्यानंतर ज्याला धूम्रपान करायचे असेल त्याला तसे करण्याची मुभा देण्यात येते. एक गोष्ट ध्यानात ठेवली पाहिजे. गुणी वाइनचा आस्वाद घेताना तिची चव, पोत, गंध ह्या साऱ्यांचा आस्वाद घ्यायचा असतो. ह्यासाठी संबंधित इंद्रिये, जीभ आणि टाळू, तल्लख असावी लागतात. धूम्रपानाने ही इंद्रिये काही काळ बधिर होतात. ह्यामुळे नाजुक वाइन पिताना धूम्रपान करणे म्हणजे तिचा अपमान करणे, तिच्याविषयी अनास्था दाखविणे, थोडक्यात गांवढळपणे वागणे होय असे मानण्यात येते.

अठराव्या शतकात पोर्ट बनविण्याला सुरवात झाली आणि तेव्हापासून पोर्ट हे सुस्थितीतील इंग्लिश माणसाचे आवडते मद्य ठरले आहे. जमीनदार, 'स्क्वायर' मंडळी पोर्टचे सेलर (cellar) बाळगून असे आणि योग्य रीतिभाती पाळणारा, चांगले वळण लावण्यात आलेला सद्‌गृहस्थ पोर्टचा यथायोग्य आदर करील, ते चवीने प्राशन करील, ते कोणत्या व्हिंटाजचे आहे हे ओळखून कौतुकाने त्याची संभावना करील अशी अपेक्षा असे. सद्‌गृहस्थ असण्याची ही एक कसोटी होती.

डेव्हनशायरमधील एका स्क्वायरचे पोर्टचे वडिलार्जित समृद्ध सेलर होते. ज्याला पोर्टची पुरती जाणकारी नसेल तो माणसातही जमा नाही, मग सद्‌गृहस्थ असण्याचे दूरच राहिले अशी त्याची भावना होती. १९०८ आणि १९१२ ह्या वर्षांतील पोर्टमधील फरक ज्याला ओळखता येत नाही तो मूर्ख आणि नादान असला पाहिजे, असे त्याचे ठाम मत होते. त्याच्या देखण्या, गोड मुलीचे एका नाविक अधिकाऱ्यावर प्रेम बसले. आपल्या



अनुक्रमणिका

संभाव्य जावयाची पारख करण्यासाठी ह्या स्क्वायरने त्याला आपल्या घरी दोन दिवस रहायला बोलाविले. पोर्टमध्ये त्याची परीक्षा घेतली जाणार आणि आपले भाग्य सर्वस्वी ह्या परीक्षेतील यशावर अवलंबून आहे हे मुलीला माहीत होते. तिने आपल्या नेमस्त वराला पाठविले. 'बाबा तुम्हाला पोर्ट प्यायला देतील आणि तुम्ही ते ओळखले पाहिजे. तुम्ही ते ओळखण्याला अतिशय महत्त्व आहे. माझी कल्पना अशी आहे की ते तुम्हाला १८७० चे पोर्ट देतील. हे वर्ष तुम्ही लक्षात ठेवा. १८७० अगदी लक्षात ठेवा'. अपेक्षेप्रमाणे १८७० चे पोर्ट बैठकीत आणण्यात आले आणि यजमानाने पाहुण्याला म्हटले, 'हे काय आहे, ओळखा पाहू'. ही सर्वांत कठीण परीक्षा होती. एव्हाना पाहुणा पूर्णपणे भेदरून गेला होता. तो चाचरत म्हणाला, 'हे काय असेल ? हे काय असेल ? हे बहुतेक पोर्ट असणार ! ' पण त्याला क्षमा करण्यात आली आणि जावई म्हणून त्याला पतकरण्यात आले.

हे १८७० चे पोर्ट असाधारण मद्य म्हणून मान्यता पावले होते. त्याच्याविषयी एक दंतकथा आहे. त्यावर्षी ब्रँडी मिळण्यात काही घोटाळा झाला होता आणि आयत्यावेळी दक्षिण अमेरिकेला व्हिस्की घेऊन जाणारी जहाजे ओपोर्तो बंदराला आली आणि पोर्टचे दृढीकरण करण्यासाठी ती व्हिस्की वापरण्यात आली. हे खरे असो, नसो १८७० चे पोर्ट अप्रतिम आणि चिरस्मरणीय निघाले.

आणखी एक दृढीकृत वाइन म्हणजे मडीरा. १७०० पर्यंत मडीरा ही स्वाभाविक वाइन होती; पण त्यानंतर १० टक्के ब्रँडी घालून तिचे दृढीकरण करण्यात आले. ही टप्याटप्याने घालण्यात येते. काही ब्रँडी द्राक्षे पिळून रस काढताना घालण्यात येते आणि काही किण्वन संपल्यावर घालण्यात येते.

वाइन हे सौम्य, नाजुक, बायकी पेय आहे असे ज्यांना वाटते त्यांनी मडीरा बनविण्याची रीत लक्षात घेण्यासारखी आहे. हा सर्वच धसमुसळा प्रकार असतो. द्राक्षे पायांनी तुडविण्यात येतात. शेळीच्या कातडीच्या पखालीतून रस वाहून कास्क्समध्ये ओतण्यात येतो. हे कास्क्स कडक उन्हात – पाय पोळतील अशा उन्हात – ठेवण्यात येतात आणि मधूनमधून त्यांना डचमळविण्यात येते. संथपणे किण्वन होऊ देत नाहीत; अधूनमधून द्रवात खळबळ माजविणे आवश्यक असते.

पूर्वीच्या काळी मडीराला तिचे योग्य स्वरूप देण्यासाठी ती जहाजात भरून जहाजाला उष्ण कटिबंधातून लांबच्या सफरीवर पाठवीत. हल्ली हे अर्थात अव्यवहार्य झाले आहे. अशी ही अतिशय कणखर अशी वाइन आहे. किण्वन संपल्यानंतर तिच्यात ब्रँडी घातली की ती कास्कमध्ये सुधारत जाते आणि ह्या सुधारण्याच्या प्रक्रियेला काही कालमर्यादा नसते. इतर वाइन्सना काही काळानंतर वृद्धापकाल प्राप्त होतो, म्हातारचळ लागल्यासारखी त्यांची अवस्था होते. मडीरा अजरामर असल्यासारखी दिसते. विसाव्या शतकात १७७९ ची मडीरा पिण्यात आल्याची उदाहरणे आहेत. १७९२ सालची मडीरा १८१५ मध्ये सेंट हेलेनाला नेपोलिअन बादशहाकडे कास्कमधून पाठविण्यात आली. पण नेपोलिअनला डॉक्टरांनी मद्यपानाची बंदी केलेली असल्यामुळे तो कास्क उघडण्यात आला नाही. १८४० मध्ये त्यातील मडीरा बाटल्यात भरण्यात आली. अजून ह्यांपैकी काही बाटल्या अवशिष्ट आहेत आणि त्यांतील वाइन उत्कृष्ट आहे.

मडीरा ड्राय किंवा मधुर अशा दोन्ही प्रकारची असते. मडीराचे प्रमुख प्रकार म्हणजे सेर्सिअल, व्हेर्देलो, बुअल आणि माम्से हे होत. ड्राय मडीरा जेवणापूर्वी घेतात. जेवणानंतरही पोर्टऐवजी मडीरा घेण्यात येते.

मार्सालाही आणखी एक दृढीकृत वाइन. ही सिसिलीत बनणारी वाइन आहे. शेरीच्या सोलेरास पद्धतीने वेगवेगळ्या काळच्या वाइन्सचे मिश्रण करून ती बनविण्यात येते. ह्यामुळे बाटलीवर '१८६० मार्साला' असे लेबल असले तरी त्या वर्षीची फारच थोडी वाइन तिच्यात असणे शक्य असते. मार्सालाचा शोध १७७३ मध्ये लागला. नाविक दलातील सैनिकांना व खलाशांना होणाऱ्या 'स्कर्व्ही' रोगावरील इलाज म्हणून नेल्सनला मार्सालाचे ५०० कास्क्स पुरविण्यात आल्याचे नमूद आहे. १९ व्या शतकात इंग्लंडमध्ये स्त्रियांत मार्साला हे लोकप्रिय पेय होते. मार्साला पोर्ट, शेरी किंवा मडीरा यांहून

अनुक्रमणिका

हलकी असलेली वाइन आहे. सकाळी अकरा वाजण्याच्या सुमारास गोड बिस्किटांबरोबर घ्यायला ती उत्तम असते.

मालागा ही दक्षिण स्पेनमधील दृढीकृत वाइन. ही जेवणानंतर फळांबरोबर घ्यायची गोड, काळसर नारिंगी वर्णाची वाइन आहे. निदान १६९२ पासून मालागा बनविण्याची रीत माहीत आहे. शेरी आणि साखरेचा अर्क यांच्यापासून ती बनविण्यात येते. ही साधारण मार्सालासारखीच वाइन आहे. हिवाळ्यात सकाळच्या प्रहरी बाहेरून फेरफटका मारून परतल्यावर घ्यायला उत्तम.

ह्याशिवाय, कोन्याक प्रदेशातील शारेन्तेसची पिनो, डेव्हनशायरमधील बेनेडिक्टाइन, ख्रिस्ती भिक्षूंनी शोधून काढलेली बकफास्ट अॅबी, प्रॉव्हन्समधील मुस्कात, पोर्तुगालची बुसेलस, ग्रीक माव्ह्रोडाफ्नी (मधुर, भरदार, जड आणि अतिशय कडक) ह्या दृढीकृत वाइन्सचा उल्लेख केला पाहिजे.

पण सर्वांत मजेदार दृढीकृत वाइनचे नाव 'एस्ट! एस्ट!! एस्ट!!!' असे आहे. ह्याची कथा अशी आहे, की योहान फुगर हा १२ व्या शतकातील जर्मन बिशप त्यावेळच्या अनेक बिशपमंडळीप्रमाणे धर्मशास्त्रापेक्षा मद्याचा अधिक भोक्ता होता. त्याला एके दिवशी रोमला जाण्याचा आदेश मिळाला. आपले सेलर सोडून रोमला जाणे त्याच्या जिवावर आले. पण जाणे भाग होते. तेव्हा त्याने आपल्या नोकराला पुढे पाठविले आणि ज्या पथिकाश्रमांत– इन्समध्ये– चांगले मद्य असेल त्यांच्यावर 'आहे' – Est– अशी खूण लिहून ठेवायला त्याला त्याने सांगितले. 'Est' म्हणजे 'Vinum est bonum'– व्हिनम एस्ट बोनम, 'मद्य चांगले आहे.' हा नोकर माँतेफियास्कोन ह्या गावी आला तेव्हा तेथील पथिकाश्रमातील मद्य त्याच्या इतक्या पसंतीस उतरले की त्याच्यावर त्याने 'एस्ट! एस्ट!! एस्ट!!!' अशी खूण केली. बिशपलाही त्याचा हा निर्णय पटला असे मानायला आधार आहे. मॉंतेफियास्कोनला पोचल्यानंतर पुढचा प्रवास त्याने केलाच नाही. त्याचे थडगे त्या गावी अजून सुस्थितीत आहे.

(२) बिअर : चांगली वाइन बनविणे ही कला आहे; चांगली बिअर बनविण्यात लुइ पाश्चरनंतर योग्य ते तंत्र वापरून हुकमी यश मिळविणे शक्य झाले आहे. बिअर बनविण्याच्या तंत्रामागे हजारो वर्षांचा अनुभव आणि गेल्या शंभर वर्षांचे शास्त्रीय संशोधन आहे.

बिअर आणि एल (Ale) यांच्यात आज निश्चित फरक करता येण्याजोगा नाही. १५ व्या शतकात इंग्लंडमध्ये कायद्याप्रमाणे बिअरमध्ये हॉप्स (hops) असत आणि एलमध्ये नसत. ('हॉप्स'-विषयी अधिक माहिती पुढे येईल.). एल ही बिअरपेक्षा फिकट असते, बिअर अधिक गडद असते, असा कित्येकांचा समज आहे पण तोही गैर आहे. कारण कित्येक 'कडक' (स्ट्रॉंग) एल्स वर्णाने काळसर असतात.

आज उपलब्ध असलेले बिअर्सचे प्रकार असे :

लाइट बिअर्स –

पेल अेल, लाइट एल, बिटर बिअर.

डार्क बिअर्स –

माइल्ड एल, ब्राउन एल, स्कॉच एल, बर्टन, स्टाउट.

स्ट्रॉंग एल्स –

बार्ली वाइन, एक्स्ट्रॉ-स्ट्रॉंग स्टाउट, रशियन स्टाउट.

लागर्स –

खास पद्धतीने बनविलेल्या लाइट किंवा डार्क बिअर्स.

सर्वांत सौम्य बिअर म्हणजे माइल्ड एल. ह्याच्यात ३% आल्कोहोल असतो. सरासरीने बिअरमध्ये ४% आल्कोहोल असतो पण कित्येक 'स्ट्रॉंग एल्स' मध्ये १० % आल्कोहोल असू शकतो. ज्याला बिअर म्हणता येईल असे सर्वांत कडक मद्य म्हणजे जपानी साके. हिच्यात १८% पर्यंत आल्कोहोल असू शकतो सामान्यपणे हे प्रमाण १४% असते. साके हे एक स्तब्ध, रंगहीन व मधुर मद्य आहे आणि समारंभपूर्वक घुटके घेत ते प्यायचे असते.

अनुक्रमणिका

सर्वसाधारण बिअर घेतली तर तिच्यातील घटकांचे प्रमाण असे असते :

| | |
|---|---|
| पाणी | ९०.० % |
| आल्कोहोल | ४.५ % |
| कार्बोहायड्रेट्स | ४.३ % |
| प्रोटीन | ०.४ % |
| कार्बन डाय-ऑक्साइड | ०.४ % |
| क्षार ( फॉस्फेट्स आणि सोडियम, पोटॅशियम, कॅल्शियम आणि लोह यांचे क्लोराइड्स. ) | ०.३ % |
| जीवनसत्त्वे, स्वाद, रंग देणारी द्रव्ये. | ०.१ % |
| | १००.० % |

लक्षात घेण्याजोगी गोष्ट अशी, की बिअरमधील जीवनसत्त्वे इतर प्रकारच्या अन्नाच्या तुलनेने घनदाट ( कॉन्सन्ट्रेड ) स्वरूपात असतात आणि म्हणून पोषणाच्या दृष्टीने बिअरचे ते अतिशय महत्त्वाचे घटक आहेत. सामान्यपणे आपल्याला जी जीवन-सत्त्वे आवश्यक असतात ती आपण जे अन्न खातो त्यापासून आपल्याला लाभतात; पण योग्य त्या अन्न प्रकाराचा तुटवडा असल्यास बिअर त्याची भरपाई करू शकते. दोन महायुद्धांच्या काळात इंग्लंडमध्ये अन्नाचा तुटवडा असतानाही जीवन-सत्त्वाच्या न्यूनतेमुळे निर्माण होणाऱ्या व्याधी फारशा आढळल्या नाहीत ह्याचे बिअर हे कारण होते. अर्थात् कुणीही जीवनसत्त्वासाठी म्हणून बिअर पीत नाही. बिअर ज्याला आवडते त्याच्या दृष्टीने ते जगातील सर्वात रुचकर आणि तरतरी आणणारे पेय असते.

बिअरचा जो स्वाद असतो तो मुख्यतः हॉप्स-पासून तिला लाभलेला असतो; पण कित्येक बिअर्समध्ये असलेली किंचित्शी साखर, कॅरामेल आणि अत्यल्प प्रमाणातील टॅनिन ही द्रव्येही त्यांना विशिष्ट स्वाद द्यायला साहाय्य करतात. टॅनिन हे बिअर ज्या लाकडी कास्कमध्ये ठेवण्यात येते त्याच्यापासून मिळते. ह्याशिवाय काही गंधित द्रव्ये बिअरमध्ये असतात. स्वादासाठी हॉप्स वापरण्याची पद्धत जुनी आहे. कित्येक तज्ज्ञांच्या मते ईजिप्तमध्ये ३००० वर्षांपूर्वी हॉप्सचा उपयोग करण्यात येत असे, असा पुरावा आहे. आठव्या शतकातील एका हॉपच्या बागेचा उल्लेख एका ख्रिस्ती मठाच्या– मोनॅस्टरीच्या – कागदपत्रांत आढळतो. मध्ययुगात बिअरला स्वाद देण्यासाठी हरतऱ्हेच्या गंधित वनस्पतींचा उपयोग करीत. ही प्रथा आता मागे पडली आहे. पण बिअरला कडवटपणा देणारे एखादे द्रव्य नेहमीच वापरण्यात आले आहे.

बिअरचा रंग नेहमी सारखाच रहावा ह्याविषयी अतिशय दक्षता घेण्यात येते. आपली लाडकी बिअर वेगळ्या वर्णात आपल्या सामोरी आली, तर लोक ते खपवून घेणार नाहीत. कित्येक लागर्सच्या फिकट सोनेरी वर्णापासून कित्येक स्टाउट्सच्या गडद सावळ्या वर्णापर्यंत वेगवेगळ्या बिअर्सच्या अनेक भिन्न छटा असतात. धान्य भाजल्याने निर्माण होणाऱ्या कॅरामेल्समुळे बिअरचा रंग काळसर बनतो. बिअरच्या काळसर रंगावरून ती ' कडक ' असली पाहिजे असे अनुमान बांधण्यात अर्थ नसतो. रशियन स्टाउट ही ' कडक ' एल आहे आणि तिचा वर्ण काळसर असतो; पण माइल्ड एल काळसर असू शकते.

लुइ पाश्चरने १८६६ मध्ये आपले वाइन्सवरील संशोधन आणि १८७६ मध्ये बिअर्सवरील संशोधन प्रसिद्ध केले. बिअर्सवरील संशोधन करताना विश्वस-नीय माहिती गोळा करण्यासाठी त्याने व्हाइटहेड्स ब्र्युअरीला भेट दिली होती. ह्या वेळेपासून बिअरचा वैज्ञानिक संशोधनाशी संबंध जोडला गेला. ह्या संबंधाचा एक उत्कृष्ट नमुना म्हणून कोपेनहागन-मधील कार्ल्सबर्ग ब्र्युअरीचा निर्देश करता येईल. ही ब्र्युअरी डॅनिश ॲकेडमी ऑफ् सायन्सिसमार्फत चालविण्यात येते आणि प्राध्यापकांचे एक नियामक मंडळ तिचा कारभार चालविते. वार्षिक नफा पाच लक्ष पौंडापेक्षा अधिक असतो आणि हा सर्व विज्ञान आणि कला ह्यांना साहाय्य करण्यासाठी खर्च करण्यात येतो. ही ब्र्युअरी कोपेनहागेनमध्ये एक ' सन्मान-गृह ' ( हाउस ऑफ ऑनर ) चालविते. हाराल्ड हॉफ्डिंग हा प्रसिद्ध तत्त्ववेत्ता आणि नील्स बोर हा अणुवैज्ञानिक ह्यांचा ह्या सन्मानगृहात निवास होता.

बिअर बनविताना ज्या गुंतागुंतीच्या सेन्द्रिय रासायनिक प्रक्रिया होतात त्यांची जाण आता

वाढल्यामुळे बिअर उत्पादन करण्याच्या पद्धतीत बऱ्याच सुधारणा झाल्या आहेत. एखाद्या आधुनिक ब्रचुअरीमध्ये आपण गेलो तर आपल्याभोवती सर्वत्र असलेले बिअरचे प्रचंड साठे पाहून आपल्याला जेवढे नवल वाटेल त्याहीपेक्षा तेथील स्वच्छता, कार्यक्षमता आणि प्रयोगशाळेत आढळते त्या प्रकारचे वैज्ञानिक वातावरण ह्यांची आपल्यावर छाप पडेल. जगातील सर्वात मोठी ब्रचुअरी अर्थात् अमेरिकेत आहे. तिच्यात दर दिवशी ९० लाख हाफ्-पाइंट बाटल्या इतकी बिअर बनविण्यात येते.

बिअरचे प्रमुख घटक म्हणजे पाणी, धान्य, यीस्ट आणि हॉप्स. पाणी हा उदासीन घटक असणार अशी अनेकांची कल्पना होईल. पण तसे नसते. पाणी जर क्षारयुक्त-हार्ड-असेल, तर चांगली स्टाउट बनविता येत नाही; अशा पाण्यापासून पेल एल किंवा लागर बनवितात. उदा. कोपेनहागेनचे पाणी असे 'हार्ड' आहे. डब्लिनचे पाणी अर्थात् अतिशय 'मृदू' आहे आणि गिनेस स्टाउट सर्वत्र प्रसिद्ध आहे. पाणी मृदू असेल आणि पेल एल किंवा लागर बनवायची असेल, तर पाण्यात कॅल्शियम सल्फेट मिसळतात. ज्या धान्यांपासून बिअर बनवितात त्यांतील प्रमुख धान्ये म्हणजे बार्ली, मका, राय, गहू आणि ओट्स. बार्ली अर्थात् सर्वांत महत्त्वाचे. बार्ली हे अत्यंत कणखर धान्य आहे. आर्क्टिक प्रदेशापासून तो विषुववृत्तापर्यंत ते कुठेही पिकते; पण त्याची गुणवत्ता अर्थात् हवामान आणि जमिनीचा कस ह्यांवर अवलंबून असते. बार्लीमध्ये नायट्रोजनचे प्रमाण तुलनेने अधिक असल्यामुळे केवळ बार्लीपासून बनविलेल्या बिअरमध्ये गढूळपणा असतो. ह्यावर उतारा म्हणून, तसेच बिअरला विशिष्ट चव आणि पोत देण्यासाठी म्हणून इतर धान्यांचाही वापर बिअर बनविताना करतात.

बिअर अर्थात् यीस्टच्या साहाय्याने बनविण्यात येते आणि बिअरच्या संदर्भात. यीस्ट हाच संशोधनाचा प्रमुख विषय झाला आहे यीस्टचे अनेक प्रकार आहेत आणि आधुनिक ब्रचुअरीमध्ये जेव्हा बिअरचे उत्पादन होते तेव्हा खास पैदास केलेल्या यीस्ट पेशींचा वापर करण्यात येतो; पण पारंपरिक पद्धतीवर भरवसा राखणारी मंडळी हवेतून व अन्य-प्रकारे येणाऱ्या यीस्ट पेशीपासून किण्वनाची प्रक्रिया स्वाभाविकपणे सुरू होऊ देतात. यीस्ट काय करते ? एकतर ते निदान ती एन्झाइम्स निर्माण करून साखरेचे आल्कोहोल आणि कार्बन डाय-ऑक्साइडमध्ये रूपांतर करते आणि ह्या प्रक्रियेद्वारे स्वतः वाढत जाते; पण ह्याशिवाय यीस्टच्या वेगवेगळ्या प्रकारच्या पेशी वेगवेगळ्या प्रक्रिया सुरू करतात आणि त्यांचा निर्माण होणाऱ्या बिअरच्या स्वरूपावर परिणाम होतो. तेव्हा नेमकी कोणत्या प्रकारची बिअर बनवायची आहे हे ठरविले, की कोणत्या विशिष्ट प्रकारचे यीस्ट त्यासाठी वापरले पाहिजे हे ठरविता येते. वैज्ञानिक संशोधन ह्यासाठी आवश्यक असते. आज बिअर बनविण्यासाठी वापरण्यात येणारे यीस्ट एकाच शुद्ध जातीचे (किंवा वंशाचे) असेल, त्याच्यात यीस्टच्या दुसऱ्या कोणत्याही वंशाचा संकर झालेला असणार नाही अशी पूर्ण खबरदारी घेता येते. हे सोपे काम नाही. कारण यीस्टच्या एका औंसात १५०,०००,०००,००० (एक निखर्व, पन्नास खर्व) एवढ्या पेशी असतात. ह्या बाबतीत स्कँडिनेव्हिअन उत्पादक अतिशय चोखंदळ असतात ब्रिटिश उत्पादक काहीसा वर्णसंकर होऊ देतात कारण त्यामुळे बिअरची चव, कशी कोण जाणे, पण सूक्ष्मपणे सुधारते असे त्यांचे म्हणणे आहे.

बिअरमधला चवथा प्रमुख घटक म्हणजे हॉप्स. हा केवळ बिअरला स्वाद देणारा घटक आहे, आल्कोहोलच्या निर्मितीत तो भाग घेत नाही. पूर्वी हॉप्सऐवजी (किंवा शिवाय) इतर द्रव्यांचाही ह्या कामासाठी वापर करण्यात येत असे हे आपण पाहिलेच आहे; पण सध्या बहुतेक सर्व बिअरमध्ये कमीअधिक प्रमाणात हॉप्स वापरण्यात येतात. बिअरमध्ये दुसरा कोणताही स्वाद लोक खपवून घेणार नाहीत.

हॉप् ही एक 'मलबेरी कुटुंबातील' वनस्पती आहे. तिला लागणारी शंकूच्या आकारांची फळे (स्त्री-पुष्पे) सप्टेंबरमध्ये तोडून जमविण्यात येतात आणि मैदानात आग पेटवून तिच्यावर किंवा भट्टयांमध्ये भाजण्यात येतात. ही हॉप्च्या मादी वनस्पतीला लागलेली फळे असावी लागतात. नर हॉप् वनस्पतीचे आणि बिअरचे वाकडे असते. सुटीत हॉप्ची फळे









तोडून गोळा करणे हा लंडनवासियांचा आवडता छंद आहे. इंग्लंडमध्ये विशेषत: केंट परगण्यात तसेच ससेक्स, हॅम्पशायर इ. इतर परगण्यांतही हॉप् वाढते. जर्मनी, चेकोस्लोव्हाकिया, पोलंड आणि अमेरिका ह्या देशांतही ही वनस्पती आढळते.

हॉप्समधून जी सुगंधी तेले आणि कडवट डिंक बाहेर पडतात त्यांच्यामुळे बिअरला तिचा सूक्ष्म गंध आणि स्वाद तर लाभतोच; पण शिवाय बिअरला अपायकारक असलेल्या सूक्ष्म जंतूंच्या वाढीला ही द्रव्ये प्रतिबंध करतात व तिचे रक्षण करतात. ह्यांशिवाय ह्या द्रव्यांमुळे बिअरच्या पृष्ठभागावरील ताण हलका होतो आणि बिअरला तिचा फेसाळ मुकुट लाभतो.

बिअर बनविण्याच्या प्रक्रियेतील टप्पे म्हणजे 'माल्टिंग,' नंतर 'मॅशिंग,' नंतर 'वॉर्ट' बनविणे आणि अखेरीस किण्वन. सुरवातीला बार्लीचे दाणे निवडून वाळवितात. नंतर ही वाळलेली बार्ली भिजवून जमिनीवर पसरून दहा दिवस ठेवतात. मधून मधून त्यांना उलटेपालटे करावे लागते. ह्या अवधीत त्यांना कोंब फुटतात आणि छोटी पाने येतात. दाण्यांत सुरवातीला जी न विरघळणारी स्टार्च होती त्यांचे आता विरघळणाऱ्या स्टार्चमध्ये आणि ह्यातील कित्येक स्टार्चचे माल्टोज ह्या साखरेमध्ये रूपांतर झालेले असते. ही सर्व छोटी झाडे मग भट्टीमध्ये वाळवितात. असे केले नाही तर दाण्यांत जे माल्ट तयार झालेले असते, तेही छोटी 'झाडे' स्वत: फस्त करतील आणि आपण स्वत: वाढतील. भट्टीमध्ये उष्णतामान हळूहळू वाढवून प्रथम ह्या दाण्यांतील–'छोट्या झाडांतील'–पाणी शोषून घेतात आणि नंतर ते जलद वाढवून दाणे भाजून काढतात. दाणे जितके जास्त भाजले जातात तितकी बिअर अधिक काळसर बनते; पण बहुतेक गडद सावळ्या रंगाच्या बिअरमध्ये ४००° फॅ. इतक्या उष्णतामानाइतके भाजलेले दाणे नंतर खास घालण्यात येतात.

आता प्रत्येक दाणा म्हणजे माल्टचा एक छोटा, कोरडा, ठिसूळ गोळा बनलेला असतो. त्याचा रंग तो किती प्रमाणात भाजला गेला आहे, यावर अवलंबून असतो. हे माल्ट कित्येक आठवडे साठवून ठेवण्यात येते. माल्टिंगची ही प्रक्रिया गुंतागुंतीची व अवघड असते. तिच्यावर देखरेख करणारे जे कुशल कारागीर असतात त्यांना 'माल्टस्टर्स' म्हणतात.



पुढची पायरी म्हणजे मॅशिंग. दाण्यांवर अजून करल (हस्क) असते तेव्हा ते 'रोलर्स'च्या साहाय्याने फोडून माल्ट बाहेर काढतात. मग ह्या माल्ट आणि तूस ह्यांच्या मिश्रणात पाणी ओतून ते १५०° फॅ. पर्यंत तापवितात. तापविताना हे मिश्रण (मॅश) यंत्रांनी सतत ढवळले जाते. मग हे मॅश एका विशिष्ट आकाराच्या भांड्यात–'मॅशटुन्स'मध्ये–सोडतात. येथे मॅशमधील तूस आणि इतर न विरघळणारी द्रव्ये एका बाजूला होतात व उरलेला द्राव गाळीव स्वरूपात वेगळा होतो. तुसाच्या लगद्यात परत गरम पाणी मिसळून त्याच्यात असलेला उरलासुरला द्राव गाळून घेतात. ह्या द्रावाला 'वॉर्ट' म्हणतात. जो लगदा उरतो त्याचा गुरांसाठी अन्न म्हणून उपयोग करतात. विशिष्ट प्रकारची बिअर काढण्यासाठी सामग्रीत जे फेरबदल करावे लागतात ते मॅशटुनमध्ये करण्यात येतात. उदा. काही माल्ट–एस्ट्रॅक्ट्स, मका, किंवा तांदूळ किंवा साखर ह्यांची ह्या टप्प्यावर भर घालण्यात येईल. मॅशटुनमध्ये पाणी वापरले जाते ते उकळलेले असते आणि त्याच्यात योग्य ते घटक आहेत अशी खबरदारी घेण्यात आलेली असते.

तेव्हा वॉर्ट म्हणजे माल्टोज, काही इतर प्रकारची साखर, काही एन्झाइम्स (ह्यांनी न विरघळणाऱ्या स्टार्चचे विरघळणाऱ्या स्टार्चमध्ये रूपांतर केलेले असते), थोडे टॅनिन, प्रोटीन्स, खनिज क्षार आणि जीवनसत्त्वे यांचा द्राव असतो. हा अर्थात् अतिशय पौष्टिक असतो आणि काही वॉर्ट बाजूला काढून, त्यातील पाणी काढून घेऊन माल्ट–एक्स्ट्रॅक्ट म्हणून तो केमिस्टच्या दुकानांतून विकण्यात येतो. एवढा पौष्टिक आणि उपयुक्त पदार्थ बिअर तयार करण्याच्या प्रक्रियेची एक उपनिर्मिती असते ह्याचे अनेकांना वैषम्य वाटते.

'लागर' ह्याचा अर्थ 'सेलर'– तळघर– असा आहे. लागर बनविण्यासाठी किण्वित 'वॉर्ट' बराच काळ हवाबंद टाक्यांत ठेवण्यात येतो. ह्यामुळे, उत्पन्न झालेला वायू परत मूळ द्रवात मिसळतो

अनुक्रमणिका

आणि बिअर अनेक महिने हळूहळू परिपक्व होत जाते. बाटल्यांत भरण्यापूर्वी लागर दाबाखाली गाळण्यात येते. लागर ही फिकट बिअर असते अशी अनेकांची समजूत आहे, पण ती खरी नाही. काळसर बिअरसुद्धा ह्या पद्धतीने बनविता येते. उदा. म्युनिख लागर किंवा कार्ल्सबर्ग लागर अतिशय काळसर असतात.

अमेरिकन बिअरविषयी अनेकांचे पूर्वग्रह असतात; पण अनेक अमेरिकन गोष्टींविषयी असलेल्या पूर्वग्रहांसारखेच ते निराधार असतात. अमेरिकन बिअर आणि युरोपियन बिअर ह्यांमधील भेद असे मांडता येतील : बरीच अमेरिकन बिअर कॅनमधून पुरविण्यात येते; पण ह्यामुळे स्वादावर किंवा कशावरही काही परिणाम घडून येत नाही. तेव्हा ह्या सोयिस्कर पद्धतीचा हळूहळू सर्वत्र अवलंब होत आहे. अमेरिकेत बिअरचे उत्पादन प्रचंड प्रमाणावर होत असल्यामुळे (ग्रेट ब्रिटन आणि जर्मनी ह्या दोहोंच्या मिळून होणाऱ्या उत्पादनाच्या दुप्पट) त्यांची उत्पादनाची पद्धत अतिशय कार्यक्षम आहे आणि झटपट उत्पादन करण्याच्या पद्धती ते वापरतात. उदा. तपमान वाढवून किण्वनाची प्रक्रिया ते अधिक झपाट्याने घडवून आणतात. ह्यामुळे आणि मक्याचा वापर ते मोठ्या प्रमाणावर करीत असल्यामुळे त्यांची बिअर व युरोपिअन बिअर ह्यांच्यात भेद आढळून येतात. आणखी एका गोष्टीचा निर्देश केला पाहिजे. अमेरिकन लोक बिअर फार थंड करून पितात आणि त्यामुळे बिअरची चव गारद होते. ४८–५०° फॅ. हे बिअरला अनुकूल असे तपमान आहे. अमेरिकन्स ४०° फॅ. पेक्षाही अधिक थंड बिअर पितात.

(अपूर्ण.)








'आर्'

# अमेरिकेतील दारूबंदीचा प्रयोग :

[ आधुनिक काळात कायद्याने दारूबंदी घडवून आणण्याचा प्रयोग करणारे अमेरिका हे सर्वात प्रमुख राष्ट्र आहे. त्याचा अनुभव आपल्याला मार्गदर्शक ठरणे शक्य आहे. ]

अमेरिकन संविधानाला करण्यात आलेल्या १८ व्या घटनादुरुस्तीनुसार देशात दारूबंदी अंमलात आणण्याचे बंधन सरकारवर घालण्यात आले. १९१७ मध्ये जेव्हा ही घटनादुरुस्ती सीनेटपुढे विचारार्थ आली, तेव्हा केवळ तेरा तासांचा वादविवाद आणि चर्चा झाल्यावर सीनेटची तिला अनुमती मिळाली. काही महिन्यानंतर हाउस ऑफ् रेप्रेझेन्टेटिव्हज्ने तिला एका दिवसात संमती दिली. संविधानाप्रमाणे घटनादुरुस्तीला कायदेशीर मान्यता मिळण्यासाठी तीन चतुर्थांश राज्यांच्या कायदेमंडळांची अनुमती आवश्यक असते. जानेवारी १९१९ पर्यंत तीही ह्या घटनादुरुस्तीला लाभली आणि थोडयाच अवधीत कॉनेक्टिकट आणि ऱ्होड आयलंड ही दोन राज्ये सोडली, तर इतर सर्व राज्यांच्या कायदेमंडळांनी तिला मान्यता दिली. ही घटनादुरुस्ती अंमलात आणण्यासाठी करण्यात आलेला व्होल्स्टेड ॲक्ट हा कायदा अधिकच सुरळितपणे आणि झपाटयाने पसार करण्यात आला. प्रे. विल्सन ह्यांनी अध्यक्षीय अधिकाराचा वापर करून तो 'व्हीटो' केला पण कॉंग्रेसने तो ताबडतोब परत पास केला.

घटनादुरुस्तीविरुद्ध निषेध झाला नाही असे नाही. न्यूयॉर्कमध्ये एक निषेधसभा भरविण्यात आली, बाल्टिमोरमध्ये एक विरोधी मोर्चा काढण्यात आला, अमेरिकन फेडरेशन ऑफ् लेबरने कामगारांना त्यांच्या आवडत्या आणि आवश्यक बिअरपासून वंचित व्हावे लागू नये म्हणून घटनादुरुस्तीत काही बदल करावा अशा आशयाचा ठराव केला आणि वॉशिंग्टनमध्ये कॅपिटॉलसमोर काही निदर्शने झाली. पण एवढेच. हा विरोध इतका तुरळक आणि क्षीण होता, की कुणालाही त्याची दखल घेण्याचे कारण पडले नाही. दारूबंदी होणे अटळ आहे असे सर्वचजण धरून चालले होते. प्रत्यक्षात ह्या कायद्याची अंमलबजावणी करणे शक्य आहे की नाही ह्याचा फारसा विचार कुणी केला नाही.

लोकांच्या रूढ राहणीत एवढा मोठा बदल घडवून आणू पाहणारा हा कायदा इतक्या झपाटयाने, निकराचे वादविवाद न घडता संमत झाला, लोकांनी त्याच्याकडे फारसे लक्षही दिले नाही ह्याची काही कारणे होती. एक तर मद्यनिषेधाचा पुरस्कार करणारी चळवळ संघटित होती, तिचे नेतृत्व जागरूक होते आणि आलेल्या संधीचा व अनुकूल वातावरणाचा लाभ घेऊन आपले दारूबंदीचे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी ते कटिबद्ध होते. उलट मद्यप्राशनाचे स्वातंत्र्य असावे, अशी चळवळ उभारण्याचे काही कारण नव्हते. सक्रियपणे असा मतप्रचार करणारी जी मंडळी होती तिचे हेतू संशयास्पद होते. दारूच्या उत्पादकांकडून हे काम करण्यासाठी त्यांना पैसे मिळत होते. शिवाय देश एका मोठ्या दिव्यातून—महायुद्धातून—यशस्वीपणे बाहेर पडला होता. युद्धकाळात सरकार युद्धप्रयत्नाला नेट देण्यासाठी नागरिकांना हरतऱ्हेचे आदेश देत असे, त्यांच्या स्वातंत्र्यावर बंधने घालीत असे आणि ह्याला जनतेचा पूर्ण पाठिंबा होता. युद्धात जय मिळविण्यासाठी लोकांनी आपण होऊन कठोर शिस्त स्वीकारली होती. मद्याचे सेवन

कमी केल्याने मद्याचे उत्पादन करण्यासाठी जे धान्य खर्ची पडत असे त्याच्यात बचत होत होती आणि त्यामुळे सैन्याला व मित्रराष्ट्रांना धान्याचा पुरवठा करणे अधिक सोपे जात होते. दारू न पिणारा सैनिक दारू पिणाऱ्या सैनिकापेक्षा अधिक कार्यक्षम असे. शिवाय युद्धकालात अमेरिकेमध्ये एक ध्येयवादी वातावरण पसरले होते. मानवी इतिहासातून युद्धाचा समूळ अंत करण्यासाठी म्हणून अंगीकारलेले ते युद्ध होते. युद्धानंतर एक न्याय्य, उज्ज्वल, आदर्श जीवनपद्धती घडविण्यात येणार होती व तिच्यासाठी मद्यपानासारख्या क्षुद्र सुखांचा त्याग करायला सर्वजण तयार होते. तावडतोबीने करण्यात येणारी दारूबंदी ही अशी व्यवस्था मूर्त करण्यातील पहिली पायरी होती.

पण दारूबंदीचा कायदा केला तरी तो प्रत्यक्षात अंमलात आणणे किती कठीण किंवा सोपे जाईल, त्यासाठी काय काय करावे लागेल ह्याचा व्यावहारिक विचार फारसा कुणी केलाच नव्हता असे म्हटले पाहिजे. पहिले दारूबंदी कमिशनर जॉन एफ्. क्रामेर ह्याची हयाबाबतची भूमिका काहीशी प्रेषितासारखी होती. "ह्या कायद्याचे शहरांत पालन होईल, लहान आणि मोठ्या शहरांत पालन होईल आणि त्याचे खेड्यांत पालन होईल. आणि जेथे तो पाळला जाणार नाही तेथे त्याची सक्ती करण्यात येईल ...... मद्याचे पेय म्हणून उत्पादन होता कामा नये असे कायदा म्हणतो. ते होणार नाही असे आम्ही पाहू. आणि मद्याची विक्री होणार नाही, ते कुणी कुणाला भेट देणार नाही, भूतलावरून किंवा भूतलाखालून किंवा हवेतून ते कुठे आणण्यात येणार नाही हे आम्ही पाहू." बस्स !

१६ जानेवारी १९२० उजाडली. दारूबंदीचा कायदा सुरू झाला; आणि दारूबंदी अंमलात आणण्यातील अडचणी हळूहळू सर्वांच्या, तिच्या पुरस्कर्त्यांच्या, काँग्रेसच्या आणि सरकारच्या ध्यानी येऊ लागल्या.

अडचणी प्रचंड होत्या. अमेरिकेत बाहेरून मद्याचा प्रवेश होणार नाही अशी खबरदारी घ्यायची, तर १८७०० मैल लांब किनारा आणि जमिनीवरील सरहद्द यांच्यावर पहारा ठेवणे आवश्यक होते. डॉक्टरांच्या प्रिस्क्रिप्शनवर अल्कोहोल मिळण्याची सवलत देण्यात आली होती व तिचा गैरवापर होत नाही हे पाहण्यासाठी सर्व डॉक्टर्सवर सतत देखरेख करणे आवश्यक होते. बिअरहून सौम्य पेये बनवायला व विकायला परवानगी होती आणि अशी पेये बनवायची तर प्रथम बिअर बनवून तिच्यातून अल्कोहोल काढून घ्यावा लागत असे. आणि सर्वच बिअरमधून अल्कोहोल काढून घेतला जाईल ह्याची शाश्वती नव्हती. औद्योगिक उत्पादनासाठी अल्कोहोल बनवायला परवानगी होती आणि ह्या अल्कोहोलचा अन्य, अननुज्ञात उपयोग होणार नाही अशी काळजी घेणे आवश्यक होते. कुणालाही हातभट्टी चालविता येणे शक्य होते; संसारी गृहस्थ फावल्या वेळात आपल्या घराच्या तळघरात हातभट्टी चालवू शकत होता. आणि धंदाच करायचा झाला तर केवळ ५०० डॉलर्सना मिळणाऱ्या हातभट्टीवर दिवसाला पन्नास ते शंभर गॅलन्स दारू बनविता येत असे. रोज एक गॅलन दारू पाडणारी लहानशी, कुठेही सोबत नेता येईल अशी हातभट्टी सहा किंवा सात डॉलर्सना मिळत असे.

आता ह्या अडचणींवर मात करण्यासाठी जे 'प्रोहिबिशन एजन्ट्स' – दारूबंदी कामदार नेमण्यात आले होते त्यांची संख्या १९२० मध्ये १५२० होती आणि १९३० पर्यंत ती २८३६ एवढी वाढविण्यात आली. सरहद्दीबाहेरून मद्य आत आणण्यात येणार नाही आणि देशात मद्याचे बेकायदेशीर उत्पादन वा विक्री होणार नाही अशी दुहेरी खबरदारी ह्या मूठभर लोकांनी घ्यायची होती. उलट हिशोब असा होता की देशातल्या देशात मद्याचे बेकायदेशीर रीतीने होणारे उत्पादन पूर्णपणे सोडून दिले असते आणि केवळ बाहेरून मद्याची आयात होणार नाही एवढेच साधण्याचे ठरविले असते आणि त्यासाठी सर्व दारूबंदी कामदार किनाऱ्यावर आणि सरहद्दीवर उभे केले असते तर प्रत्येक कामदाराला समुद्रकाठावर, बंदरातून, रानांतून आणि खाड्यातून बारा मैल लांबीच्या प्रदेशात गस्त घालावी लागली असती.

शिवाय १९२० नंतर देशाची मनःस्थिती झपाट्याने बदलत होती. युद्धकाळातील आदर्शवाद आणि कठोर सामाजिक शिस्त हळूहळू ओसरू लागली होती. आघाडीवर लढणारे अमेरिकन शूर वीर








जेव्हा परततील तेव्हा त्यांना साजेसा देश येथे उभारून दाखवू अशी ईर्ष्या युद्धकालात निर्माण झाली होती, तीही मावळू लागली होती. लोकांना आता नेहमीचे साधे जीवन, मौजमजा पाहिजे होती. ध्येयवादाचा ताण त्यांना हळूहळू असह्य वाटू लागला होता.

पुढच्या काही वर्षांतील अमेरिकेचे चित्र बरेचसे विचित्र होते. कायद्यानुसार सर्वच दारूबंदी होती पण प्रत्यक्षात कित्येक ठिकाणी दारू बंद झाली नव्हती हे उघड होते. तेव्हा एक तर कायदा बदलला तरी पाहिजे होता किंवा त्याची अधिक कार्यक्षमतेने अंमलबजावणी करण्यासाठी कामदार तिपटी-चौपटीने वाढविले पाहिजे होते. दारूबंदीचे जे पुरस्कर्ते होते त्यांना दारूबंदी खरोखर अमलात आणायची तर केवढा खर्च करणे आवश्यक ठरते हे लोकांच्या स्पष्टपणे ध्यानात आणून देणे गैरसोयीचे होते. त्यामुळे आवश्यक तेवढे अधिक कामदार नेमले जावे ह्यासाठी चळवळ न करता, कायदा मोडणारे लोक अमेरिकेचे आणि मानवी संस्कृतीचे वैरी आहेत, त्यांचा निषेध केला पाहिजे ह्या थाटाची भाषणे करण्यावर त्यांनी समाधान मानले. लोकमत ह्या मंडळीविरुद्ध खवळून उठेल व त्यांचा आपोआप बंदोबस्त होईल अशी त्यांची आशा होती. काँग्रेसमध्ये दारूबंदीच्या बाजूने पुरेसे बहुमत होते पण कायदा सक्त रीतीने अंमलात आणण्यासाठी जादा खर्चाची मंजुरी मागायला कुणी राजकारणी तयार नव्हता. सरकारही कायद्याच्या अंमलबजावणी-वर अधिक खर्च करायला तयार नव्हते. राज्यसरकारांनाही ह्या बाबतीत फारसा उत्साह नव्हता. मासेमारीविषयीच्या किंवा वन्य पशुपक्षांच्या शिकारीविषयीच्या कायद्यांची अंमलबजावणी करण्यासाठी जेवढा खर्च करायला ती तयार होती त्याच्या एक अष्टमांश खर्च दारूबंदी परिणामकारक व्हावी यासाठी करायला तयार नव्हती. हळूहळू दारूबंदीच्या अंमलबजावणीसाठी म्हणून खर्चाचा जो वाटा द्यायचे त्यांनी कबूल केले होते तो त्यांनी कमी करीत आणला आणि खर्चाचा सारा भार केंद्रसरकार-वर पडला. उलटपक्षी दारूबंदीला विरोध करणारे जे लोक होते त्यांनाही दारूबंदी उठवावी अशी सरळ मागणी करण्याचे नैतिक धैर्य नव्हते.

परिणाम व्हायचा तो झाला. रमने भरलेल्या मालबोटी बंदरापासून १२ मैल दूर उभ्या रहात आणि अतिशय जलद मोटरबोटीतून रम किनाऱ्या-वरील सुरक्षित ठिकाणी आणण्यात येई. सुरेख कॅनेडियन व्हिस्की भरून लाँचीस डेट्रॉयटजवळ नदीकिनारी येऊन ठेपत. १९२५ मध्ये लिंकन सी. अँड्र्युज ह्या ट्रेझरीच्या असिस्टंट सेक्रेटरीने असा अंदाज व्यक्त केला, की असे स्मगल करून आणण्यात येणाऱ्या मद्यातील पाच टक्के मद्य फार तर दारूबंदी कामदारांकडून अडविले जात असेल. १९२४ ह्या एका वर्षी स्मगल करून आणलेल्या मद्याची किंमत चार कोटी डॉलर्स इतकी होती. शिवाय जवळजवळ दीड कोटी गॅलन एवढा औद्योगिक अल्कोहोल बेकायदेशीर मद्य बनविण्यासाठी उपयोगात आणला जात असे. अशा एका गॅलनपासून तीन गॅलन्स मद्य बनविता येत असे. अर्थात् बाटलीवर 'स्कॉटलंडहून नुकतेच आयात केलेले' असा शिक्का असे. पण हे काहीच नव्हे. ह्या रीतीने जेवढ्या मद्याचे उत्पादन होत असे त्याच्या जवळजवळ आठपट मद्य हातभट्टयांतून तयार होत असे. उदा. १९१९ ते १९२९ ह्या दहा वर्षांत मक्यापासून बनविण्यात येणाऱ्या साखरेचे उत्पादन सहापटीने वाढले. ह्या 'साखरे' चा प्रमुख उपयोग कॉर्न व्हिस्की बनविण्यासाठी होतो. 'तिचे इतर काही उपयोग असलेच तर ते कुणाला फारसे माहीत असलेले दिसत नाहीत' असे एका केमिस्टने म्हटले आहे.

ह्या काळातील अमेरिकन जीवनात अनेक विचित्र दृश्ये दिसू लागली. फुटबॉलचे सामने पहायला जमलेल्या गर्दीत चेहऱ्यांच्या रांगावर मधूनमधून खिशात ठेवायच्या चपट बाटल्या चमकू लागल्या. दारूची बेकायदेशीर दुकाने भरमसाठ वाढली. येथे जिनची कॉक्टेल्स गुंडांकडून पुरविली जात. फक्त ओळखीच्या गिऱ्हाइकांना आणि पोलिसांना प्रवेश असे. गिऱ्हाइकाला ७५ सेंट्स पडत, पोलिसांना मोफत. आत येण्याचे धैर्य नसलेल्या चांगल्या घराण्यांतील मुली बाहेर उभ्या राहून एखादी मार्टिनी घशाखाली घालीत आणि पळ काढीत. कॉन्फरन्सला निघालेल्या बिझिनेस एक्झिक्युटिव्हच्या बॅगेत बहुधा जिनच्या दोन बाटल्या महत्त्वाच्या

कागदपत्रात दडविलेल्या असत. नवदांपत्याच्या शय्येखाली द्राक्षरसाचा आंबणारा बुधला खदखदत असे. पहिल्या दर्जाच्या हॉटेलातील विशिष्ट खोलीत जिंजर बिअर आणि फोडलेले बर्फ पुरविण्यात येत असे आणि जिंजर बिअर पिताना ती मद्यात मिसळता कामा नये अशी औपचारिक विनंती गिऱ्हाईकांना करण्यात येत असे. एके ठिकाणी कायदेशीर कारवाई करून बंद करण्यात आलेले चोरटे गुत्ते तात्काळ दुसऱ्या ठिकाणी, दुसऱ्या नावाखाली उदयाला येत. जनरल स्मीड्ली बटलर ह्या अधिकाऱ्याने तर चोरट्या दारूविरुद्ध फिलाडेल्फियात लष्करी थाटाची मोहीमच संघटित केली. काही महिन्यांनंतर तो अपयश स्वीकारून परतला. 'ह्या शहरात दारूबंदी यशस्वी करण्याआड राजकारण येते' असे खिन्न उद्गार त्याने काढले. औद्योगिक अल्कोहोलचा दुरूपयोग होऊ नये म्हणून सरकारने त्याच्यात वुड अल्कोहोल आणि इतर विषारी द्रव्ये मिसळण्याची सक्ती केली तेव्हा विरोधकांनी सरकार नागरिकांचे खून पाडू पहात आहे असा आरोप केला. ज्ञात गुन्हेगारांचा बंदोबस्त करण्यात स्वतःला सतत येणाऱ्या अपयशामुळे चवताळून गेलेल्या कामदारांनी अखेरीस संशयित गुन्हेगारांवर गोळ्या झाडायला सुरवात केली आणि कधीकधी निरपराध बघेही गोळीबाराला बळी पडले. 'आय् अॅम् अलोन' ह्या कॅनेडियन बोटीचा एका अमेरिकन सरकारी बोटीने अडीच दिवस पाठलाग करून अमेरिकन किनाऱ्यापासून २१५ मैल दूर अंतरावर तिला बुडविले. वातावरण तापू लागले होते. दारू स्मगल करणाऱ्या, बेकायदा दारू बनविणाऱ्या आणि विकणाऱ्या 'बुटलेगर्सना' ज्युरी निरपराधी म्हणून सोडून देऊ लागली. भ्रष्टाचाराचा बुजबुजाट झाला आणि सर्व तऱ्हेचे अधिकारी भ्रष्टाचाराच्या जाळ्यात अडकले.

१९२८ च्या राष्ट्राध्यक्षांच्या निवडणुकीत दारूबंदी हा महत्त्वाचा प्रश्न होता. डेमॉक्रॅटिक पक्षाचा गव्हर्नर स्मिथ हा उमेदवार दारूबंदी शिथिल करावी ह्या भूमिकेचा होता. 'झिंग आणणारे पेय' म्हणजे काय ह्याची वैज्ञानिक व्याख्या करून तेवढ्याच केवळ पेयांना बंदी करावी असे त्याचे मत होते. (अशी व्याख्या करणे अर्थात् विज्ञानाच्या शक्तीबाहेरचे काम होते.) शिवाय प्रत्येक राज्यात जनतेचा कौल घेऊन तिला पसंत असेल तर मद्याची आयात, उत्पादन आणि विक्री करण्याचा त्या राज्याला अधिकार द्यावा, मात्र ही विक्री राज्यसरकारनेच केली पाहिजे आणि सार्वजनिक ठिकाणी मद्यप्राशन करता कामा नये अशी मुरड १८ व्या घटनादुरुस्तीला करावी अशीही त्याने शिफारस केली. उलट रिपब्लिकन उमेदवार हर्बर्ट हूवर हा दारूबंदीच्या बाजूचा होता. मद्यबंदी 'हा थोर सामाजिक आणि आर्थिक प्रयोग आहे, त्याचा हेतू आणि त्याची दूरगामी उद्दिष्टे उदात्त आहेत' असे उद्गार आपल्या जाहीरनाम्यात त्याने काढले होते. अर्थात् मद्यबंदीमुळे प्रत्यक्षात घडून आलेले परिणाम कितपत उदात्त होते ह्याविषयी त्याने काही म्हटले नाही. हूवर प्रचंड बहुमताने निवडून आला आणि मद्यबंदीच्या पुरस्कर्त्यांच्या अंगी नवीन बळ संचारले.

पण मद्यबंदीमागे असलेल्या उदात्त हेतूंची केवळ भलावण करून हूवर थांबला नाही. तिचे प्रत्यक्ष परिणाम काय झाले आहेत ह्याचा अभ्यास करण्यासाठी त्याने एक आयोग नेमला.

न्यूयॉर्कच्या जॉर्ज डब्ल्यू. विकरशॅम ह्याच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या ह्या आयोगाने प्रचंड पुरावा, युक्तिवाद, शिफारशी यांच्या अरण्यातून वाट काढीत एकोणीस महिन्यांनी आपले निष्कर्ष राष्ट्राध्यक्षांना सादर केले.

मद्यबंदीची अंमलबजावणी करण्यात अपयश आले आहे, हा कायदा जारी करण्याची जबाबदारी ज्या सरकारी यंत्रणेवर होती तिची ह्या बाबतीतील असमर्थता केविलवाणी आहे ह्याविषयी आयोगाचे एकमत होते. ते नमूद केल्यानंतर आयोगाच्या सर्व अकरा सभासदांनी आपापली वैयक्तिक मते मांडली. पांचजणांनी मद्यबंदीच्या प्रयोगात विशेष फेरबदल न करता तो काही काळ तसाच चालू ठेवून काय घडते ते पहावे ह्या मताला पाठिंबा दिला. हा अर्थात् अल्पसंख्य गट होता. चारजणांनी १८ व्या घटनादुरुस्तीत महत्त्वाचे फेरबदल करणे योग्य ठरेल असे मत मांडले. दोघांनी मद्यबंदी पूर्णपणे रद्द करावी अशी भूमिका घेतली. पण आयोगाने, आयोग

म्हणून जी शिफारस केली ती अशी होती, की काही काळ तरी मद्यबंदी प्रयोग म्हणून तशीच चालू ठेवावी. शिवाय जर हा प्रयोग फसला असे कालांतराने आढळून आले, तर त्याच्यात कोणते बदल करावेत त्यासंबंधीच्या सूचनाही आयोगाने करून ठेवल्या. म्हणजे गोंधळात भर पडली. त्यावेळी 'न्यू यॉर्क वर्ल्ड' मध्ये प्रसिद्ध झालेली एक कविता अशी होती.

Prohibition is an awful flop
We like it
It can't stop what it's meant to stop.
We like it,
It's left a trail of graft and slime,
It's filled our land with vice and crime,
It don't prohibit worth a dime,
Nevertheless we're for it.

आयोगाचा एकंदर रिपोर्ट गोंधळलेला होताच; पण परिस्थिती अधिकच गोंधळाची होती. बहुतेक निःपक्षपाती अमेरिकन नागरिकांना, १९१७-२० दरम्यान राष्ट्राने फारसा विचार न करता एक चूक मार्ग स्वीकारला होता हे स्पष्ट झाले होते. मद्यबंदी स्वीकारताना प्राथमिक रसायनशास्त्र लक्षात घेतले नव्हते. अल्कोहोलची निर्मिती किती सोपी आहे हे ध्यानात घेतले नव्हते. आणि प्राथमिक मानसशास्त्रही ध्यानात घेतले नव्हते. मूलभूत मानवी प्रेरणा आणि वासना केवळ कायद्याने दडपून टाकता येत नाहीत हे ध्यानात घेतले नव्हते. आता प्रश्न होता तो एवढाच, की ह्या मार्गाने परत कसे जायचे? सौम्य मद्ये आणि बिअर यांचा परत मुबलक पुरवठा सुरू करावा असे कित्येकांचे म्हणणे होते. पण जिनची चटक लागलेले लोक ती सोडून सौम्य मद्यांकडे वळतील ह्याची हमी काय? शिवाय सरकारचे नियंत्रण असलेला किंवा स्वतः सरकारने चालविलेला मद्यव्यापार परत सुरू केला तरी त्यामुळे एवढ्या अवधीत फोफावलेला बेकायदेशीर व्यापार आपोआप संपुष्टात येईल, असे मानणेही कठीण होते. ह्या बेकायदेशीर व्यापारावर माजलेली 'बुटलेगर्स'ची एक सबंध जमात निर्माण झाली होती. तिने प्रचंड पैसा कमावला होता. आपला अतिशय फायदेशीर ठरलेला व्यवसाय ती सहजासहजी सोडून द्यायला तयार होईल अशी फारशी शक्यता नव्हती. परतीचा मार्ग स्वीकारण्यात आणखी एक अडचण होती. १८ वी घटनादुरुस्ती रद्द करायची तर त्याला तीनचतुर्थांश राज्यांचा पाठिंबा मिळणे आवश्यक होते. आणि तेरा राज्ये ठामपणे मद्यबंदीच्या बाजूने असल्यामुळे घटनादुरुस्ती रद्द करणे अशक्य होते.

ह्या 'बूटलेगर्स' विषयी काही माहिती करून घेणे इष्ट ठरेल. शिकागो शहर ह्या बाबतीत विशेष प्रसिद्ध आहे (किंवा होते) हे सर्वांना माहीत आहेच. १९२० साली जेव्हा मद्यबंदी सुरू होऊन फार काल लोटला नव्हता तेव्हा शिकागोच्या जॉनी टोरियोला एक भव्य कल्पना सुचली. बेकायदा दारूच्या व्यापारात आता प्रचंड पैसा मिळण्यासारखा होता. फक्त ह्या धंद्यात स्पर्धा फार होती. सर्व स्पर्धकांचा जर काटा काढता आला आणि सर्व बेकायदा दुकानांनी टोरियोने पुरविलेली दारूच घ्यायचे ठरविले तर अमाप फायदा होणार होता. तेव्हा सर्व प्रतिस्पर्ध्यांचा बिमोड करील असा कुणीतरी साहाय्यक मिळविणे आवश्यक होते.

टोरियो हा न्यूयॉर्कच्या प्रसिद्ध 'फाइव्ह पॉइंटस गँग'चा पूर्वीचा सभासद होता. तेव्हा एखादा कर्तबगार मदतनीस निवडावा म्हणून तो स्वाभाविकपणे न्यूयॉर्कला आपल्या मूळ पीठाकडे गेला. एका तेवीस वर्षाच्या तरण्याबांड गुंडाला त्याने पसंत केले आणि त्याला सढळ पगार आणि बेकायदा दारूच्या व्यापारातील फायद्याचा अर्धा हिस्सा कबूल करून शिकागोला आणले. ह्या गुंडाचे नाव अल् कापोन. हा मूळचा नेपल्सचा होता. त्याने शिकागोला आपले ऑफिस थाटले आणि बिझिनेस कार्ड छापून घेतले. त्याच्यावर छापले होते: अल्फॉन्से कापोन, सेकंडहँड फर्निचर डीलर.

अल् कापोन अपेक्षेपेक्षा यशस्वी ठरला. एखाद्या बेकायदा दारूच्या दुकानात प्रतिस्पर्ध्यांकडून दारू विकत घेतली जात आहे असे आढळून आले तर

दुसऱ्या दिवशी दुकानाची मोडतोड होऊन वाताहत झाल्याचे आढळून येत असे. तीन वर्षांत सातशे गुंडांचा तो अधिनायक बनला. ह्यांतील अनेकजण शॉटगन आणि स्टेनगन वापरण्यात पटाइत होते. बिअर आणि हातभट्टीची दारू ह्यांच्या व्यापारातील फायदा जसजसा वाढू लागला तसतसे अल् कापोनने राजकारणी मंडळीशी संधान जुळविण्याकडे अधिक लक्ष द्यायला सुरवात केली. ह्याच्यात त्याने विलक्षण कौशल्य दाखविले, पाच वर्षांत शिकागोच्या उपनगरांवर त्याने आपला पूर्ण ताबा बसविला. स्वतः निवडलेल्या उमेदवाराला नगराध्यक्षाच्या पदावर बसविले, सर्व मद्यविक्रीच्या दुकानांत आणि जुगारांच्या अड्ड्यांवर आपले हस्तक नेमले आणि प्रतिष्ठित हॉथॉर्न हॉटेलात आपले हेडक्वॉर्टर्स ठेवले. त्याची प्राप्ती आता कोटीत मोजावी लागत होती.

रक्तपाताशिवाय हे यश मिळविणे शक्य नव्हते. बेसावध माणसांना ठार मारण्याच्या कलेत अल् कापोनने नवीन तंत्रांची भर घातली. एक तंत्र असे, की वैऱ्याच्या मोटरचा पाठलाग करायचा, आपली गाडी तिच्या अंगावर घालून तिला रस्त्याच्या बाजूला थांबायला लावायचे, नंतर गाडीत बसलेल्या मंडळींनी शॉट गन्स आणि स्टेनगन्समधून त्याच्यावर गोळ्यांचा भडिमार करायचा आणि गाडी भरधाव सोडून, वाहतुकीत सामील होऊन, दूर कुठेतरी गाडी सोडून द्यायची. गाडी अर्थात् चोरलेली असे. दुसरे तंत्र म्हणजे एखाद्याला गाडीतून मजेत सहल करायला बोलवायचे, त्याच्यावर गोळी झाडायची आणि दूर कुठेतरी प्रेत फेकून देऊन पसार व्हायचे. किंवा शत्रूच्या समोरचे घर भाड्याने घेऊन तो घराबाहेर पडताक्षणी मशिनगनमधून त्याच्यावर गोळ्यांची वृष्टी करायची.

अल् कापोनचा प्रमुख प्रतिस्पर्धी डॉन ओबॅनियन हा होता. त्याचा खून अल् कापोनच्या हस्तकांनी केल्यावर त्याच्या अनुयायांनी आठ मोटरगाड्यांतून हॉथॉर्न हॉटेलवर मशिनगन्सचा हल्ला केला. पण अल् कापोन त्याच्यातून वाचला. ह्यानंतर अर्थात् हल्लेप्रतिहल्ले सुरूच राहिले. ह्या गनिमी युद्धांचा कळस १४ फेब्रुवारी १९२९ मध्ये झाला. ओबॅनियनच्या टोळीतील सात गुंड एके ठिकाणी बेकायदा दारूच्या एका ट्रकची वाट पहात उभे होते. एक मोटरगाडी आली आणि तिच्यातून पोलिसी वेषातील तीन व्यक्ती आणि साध्या वेषातील दोन व्यक्ती बाहेर पडल्या. पोलिसांनी गुंडांना गराजमध्ये जाऊन भिंतीशी तोंड करून आणि हात वर करून उभे राहायला सांगितले. गुंडांना पोलिसांच्या छाप्यांची मधूनमधून होणारी नाटके परिचित होती. ते निर्धास्तपणे हुकुमाप्रमाणे उभे राहिले. साध्या वेषातील ती दोन माणसे मशिनगन्स घेऊन पुढे आली आणि त्यांनी सातही जणाना ठार केले. पोलीसांनी त्या दोघांना 'अटक' केली आणि कारमध्ये त्यांना घालून ते निघून गेले. ते सर्वच अल् कापोनच्या टोळीतील होते.

टोळ्यांमधील ह्या युद्धात जवळजवळ पाचशे माणसांचे खून पडले, फारच थोड्या गुन्हेगारांना पकडण्यात आले. काळजीपूर्वक केलेले नियोजन, पैसा वशिला, संभाव्य साक्षिदाराना दिलेल्या धमक्या ह्यांच्यामुळे कितीही निर्घृणपणे करण्यात आलेला खून असो तो पचविता येत असे. हे अमानुष प्रकार केवळ मद्यबंदीमुळे सुरू झाले असे म्हणणे गैर ठरेल. त्यांच्यामागे अनेक कारणे होती. एक तर मोटारीमुळे गुन्हा केल्यावर निसटून जाणे सोपे झाले होते. युद्धकाळात परिचित झालेल्या स्टेनगनसारख्या हलक्या पण मारक शस्त्रांचा वापर गुन्ह्यासाठी करता येत होता, ज्यांना बेकायदेशीर मद्याची आवश्यकता होती ते ह्या व्यापारातून उद्भवणाऱ्या गुन्ह्यांकडे काणाडोळा करीत. शहरे इतकी वाढली होती की माणसांना आपल्या परोक्ष घडणाऱ्या घटनांविषयी, त्या कितीही भयानक असल्या तरी, सोयरसुतक वाटेनासे झाले होते. राजकारणी लोक गुंडांचे मिंधे बनले होते. हे सारे खरे असले तरी मद्यबंदीने संघटित गुन्हेगारीला चालना दिली हेही मान्य केले पाहिजे.

फेडरल पोलिसांच्या अंदाजाप्रमाणे १९२७ साली अल् कापोनचे केवळ बेकायदा दारूपासूनचे वार्षिक उत्पन्न ६ कोटी डॉलर्सचे होते. केवळ शिकागोतील सर्व बेकायदा दारूच्या दुकानांवर त्याचे नियंत्रण होते असे नाही, तर कॅनडा ते फ्लोरिडापर्यंत दारूच्या सर्व पुरवठ्यावर त्याचा काबू होता. त्याला केवळ एकदाच, बंदूक जवळ बाळगण्याच्या

गुन्ह्यावरून अटक व शिक्षा झाली. बाकी सर्व गुन्ह्यांतून तो सहीसलामत सुटला. शिकागोच्या रस्त्यातून तो एका आर्मर्ड कारमधून भटकत असे. पुढे एक गाडी रस्ता सुरक्षित आहे ह्याची खातरजमा करण्यासाठी जात असे आणि मागून त्याच्या सशस्त्र हस्तकांनी भरलेली तिसरी गाडी येत असे. त्याच्या बहिणीचे लग्न झाले तेव्हा बाहेर हिमवर्षाव होत असताना चर्चमध्ये हजारो माणसांची गर्दी झाली होती. वधूला त्याने नऊ फूट उंच केक आणि एक खास 'हनिमूनकार' भेट म्हणून दिली. मियामीला त्याने जो भव्य प्रासाद बांधला तेव्हा एका वेळी ७५ पाहुण्यांना तो भोजनासाठी बोलावीत असे, टेलिफोन उचलून अत्युच्च राजकारणी पुढाऱ्यांना आणि न्यायाधिशांनाही तो आदेश देत असे. हे वयाच्या ३२ व्या वर्षी.

पण शिकागोने धडा घालून दिला. टेलेडो, डेट्रॉइट, न्यूयॉर्क आणि इतर अनेक शहरांनी तो गिरविला.

मद्यबंदीने आपल्या मागून आणलेले हे अपरिहार्य परिणाम होते.

१९३३ साली मद्यबंदी उठविण्यात आली.

---










'Democracy
disciplined and enlightened
is the finest thing in the world.
A democracy
prejudiced, ignorant, superstitious,
will land itself in chaos
& may be self-destroyed.'

—MAHATMA GANDHI













## ग्रंथ-परीक्षण

**'संशोधन-मुक्तावलि' (सर आठवा):**

वा. वि. मिराशी; प्रकाशक – डॉ. मु. बा. देवपुजारी, कार्यवाह, विदर्भ संशोधन मंडळ, पश्चिम हायकोर्ट मार्ग, नागपूर; १९७७; पृ. १२ + २४८ + ४ चित्रपत्रपृष्ठे; किंमत १० रु.

भारतविद्येतील व्यासंगी अभ्यासक व संशोधक म. म. डॉ. वा. वि. मिराशी यांच्या अलीकडील संशोधनपर लेखांचा संग्रह 'संशोधन मुक्तावलि : आठवा सर' या शीर्षकाने प्रसिद्ध झाला आहे. यातील काही लेख यापूर्वी प्रसिद्ध झालेले आहेत. प्रस्तुत संग्रहात एकूण अठरा लेख असून ते तीन खंडांमध्ये विभागले आहेत : पहिला खंड संस्कृत वाङ्मयावरील संशोधनपर लेखांचा आहे. दुसऱ्या खंडात प्राचीन भारतीय इतिहासासंबंधीचे लेख आहेत तर तिसरा खंड संकीर्ण विषयांवरील लेखांचा आहे. शेवटी चर्चित विषय व उल्लेखित व्यक्ती यांची समग्र सूची आणि त्यानंतर लेखांशी संबद्ध अशी सात अभ्यसनीय छायाचित्रे दिली आहेत. पुस्तकाला विदर्भ संशोधन मंडळाचे अध्यक्ष श्री. गो. मा. कुलकर्णी यांचा पुरस्कार लाभला आहे. ग्रंथकर्त्याने लिहिलेल्या हृद्‌गतात वरील तिन्ही खंडांतील लेखांची संक्षिप्त माहिती दिली आहे. तिजवरून देखील वरील लेख लिहिण्याचा मनोदय व उद्देश आणि ग्रंथकर्त्याची सत्यान्वेषणाची तळमळ वाचकास स्पष्ट दिसून येईल.

पहिल्या खंडातील 'भारतीय युद्धाचा काल' हा प्रारंभीचा लेख महाभारत युद्धाचा काळ ठरविणारा आहे. या विषयावर अनेक मान्यवर विद्वानांनी यापूर्वी विपुल चर्चा केली आहे आणि भिन्न कालनिर्देश नोंदविले आहेत : (१) इ. स. पू. ३१०२, (२) इ. स. पू. २५००, (३) इ. स. पू. १४००, (४) इ. स. पू. ९५० व (५) इ. स. पू. ६००. या विविध काळांचा विचार लेखकाने सुरवातीस करून इ. स. पू. १४०० ह्या काळास आपली संमती दर्शविली आहे. यासाठी त्यांनी प्राचीन भारतीय इतिहासातील तपशिलांचा परामर्ष घेऊन तत्संबंधीचे पुरावे सादर केले आहेत. हे मत मांडताना त्यांनी मुख्यत्वे पुराणांतील कथांचा आधार घेतला आहे. बहुतेक विद्वानांनी व अभ्यासकांनी हा काळ आता ग्राह्य मानला आहे. याच लेखात त्यांनी महाभारत कथा पूर्ण काल्पनिक आहे या काही जणांच्या मताचेही विस्ताराने खंडण केले असून त्या अनुषंगाने पुरातत्त्वज्ञ ज्या रेडिओ कार्बन-चौदा पद्धतीवर विशेष भर देतात, तिच्या निरपवाद अचूकतेवरही योग्य तो आक्षेप घेतला आहे. या संदर्भात पुरातत्त्वज्ञांनी रेडिओ कार्बन चौदा या कालमापनपद्धतीचा पुन्हा एकदा फेरविचार करावा, अशा प्रकारचे काही विचार अलीकडे प्रसृत झाले आहेत (नॅशनल जिऑग्राफिक : खंड १५२ नं. ५।१९७७), याची कदाचित् मिराशींनाही कल्पना असावी, असे वाटते. तथापि एक गोष्ट अखेर मान्य करावी लागेल की, हे डॉ. मिराशींचे मत पौराणिक कथांवर आधारित आहे. ते अनुमान आहे. पुराणांचा पुरावा किती विश्वासार्ह मानावा, याला काही मर्यादा खचित आहेत. कदाचित पुढेमागे पुरातत्त्वीय संशोधनातून जर काही विश्वासार्ह पुरावा उपलब्ध झाला, तर या मतात बदल होऊ शकेल, हे नाकारता येणार नाही.

या संग्रहातील दुसरा लेख महाभारतातील दुष्यन्त व अभिज्ञान शाकुंतलातील दुष्यन्त यां संबंधी आहे. 'दुष्यन्त : शाकुंतलात आणि महाभारतात' या प्रा. ग. वा. कवीश्वरांच्या लेखात त्यांनी दोघेही दुष्यन्त आपापल्या परीने श्रेष्ठ आहेत, असे मत प्रतिपादन केले आहे. त्याच्या उत्तरादाखल डॉ. मिराशींनी महाभारतातील दुष्यन्तासंबंधीचे सर्व उल्लेख विचारात घेऊन असे सिद्ध केले आहे की, महाभारतातील दुष्यन्त विषयोपभोगा-

सक्त, स्त्रीलंपट, स्वार्थी व भ्याड होता. शकुंतलेचा दुष्यन्ताशी झालेला विवाह वस्तुतः गांधर्व नसून आसुर होता. त्यात प्रेमाचा संबंध येत नव्हता; पण अशा आसुर विवाहाचे गांधर्व विवाहात परिवर्तन करून दुष्यन्ताप्रमाणे शकुंतलेच्याही स्वभावाचे उदात्तीकरण केले आहे. कालिदासाने या उदात्ती-करणासाठी कवी कल्पनेने त्यात काही नवीन प्रसंग घातले आहेत. त्यांपैकीच कवीने योजलेल्या किमयेचे दुर्वासाचा शाप हे प्रमुख साधन आहे.

'कालिदासविषयक नवीन संशोधनाचे परीक्षण' या शीर्षकाच्या दोन लेखांत लेखकाने डॉ. वि. श्री. वाकणकर (उज्जैन) व डॉ. एस्. व्ही. सोहोनी यांच्या मतांचा परामर्ष घेतला आहे. डॉ. वाकणकर ज्या दोन पुराव्यांच्या आधारे, उदा. भाजक्या मातीच्या मुद्रेवरील लेख (कृत हा शब्द) आणि पदकावरील चित्र, कालिदासाचा काळ ठरवितात, ते आधार-पुरावे अविश्वसनीय आहेत, हे त्यांनी सिद्ध केले आहे. वाकणकरांनी पदकावर 'शाकुंतल' नाटका-तील वर्णन केल्याप्रमाणे सिंहाचे दात मोजत अस-लेला सर्वदमन भरत दाखविला आहे, असे म्हटले आहे; पण डॉ. मिराशींच्या मते त्या पदकावरील प्राणी सिंह नसून मकर आहे आणि त्याचा जबडा उघडू पाहणारा बालक सर्वदमन नसून मध्यम वयाचा 'अजकालक' नामक यक्ष असावा. या दोन्हींची छायाचित्रे चित्रपत्र (प्लेट) एकमध्ये पुस्तकाच्या शेवटी दिली आहेत. त्यांवरून वाचकांना कल्पना येईलच. कालिदास कालनिर्णयाच्या दृष्टीने हे विवेचन मौलिक व महत्त्वपूर्ण आहे.

डॉ. सोहोनी यांनी श्रीलंकेतील डॉ. प्राणवितान यांनी प्रकाशात आणलेल्या इसवी सन पंधराव्या शतकातील रचित 'कालिदास वृत्तांता'चा आधार घेऊन 'रघुवंशा'चे एकूण पंचवीस सर्ग होते, हल्ली जे उपलब्ध एकोणवीस आहेत, तेवढे नव्हते, असे मत प्रतिपादन केले आहे. यावर डॉ. मिराशींनी तपशीलवार चर्चा केली असून या सर्व विवेचनाच्या अखेरीस असा अभिप्राय दिला आहे की, हा तथाकथित 'कालिदासवृत्तांत' स्वतः प्राणवितानांनीच रचला असावा आणि तो बनावट आहे. या लेखाच्या शेवटी तळटीपेत त्यांनी श्रीलंकेच्या पुरातत्त्वखात्याकडून आलेल्या उत्तरातील मथितार्थ स्पष्ट केला आहे : "प्राण-वितानांनी कल्पलेल्या काही कोरीव लेखांच्या ओळीं-मधील वृत्तांताचे अस्तित्व सिद्ध करण्यास आवश्यक तो शास्त्रीय दृष्टीचा पुरावा नसल्यामुळे या खात्याला प्राणवितानांचे मत स्वीकारणे कठीण जात आहे" (पृ. ७९). या लेखांच्या संदर्भात डॉ. मिराशींनी जे परिश्रम घेतले आणि विविध व्यक्तींशी पत्रव्यवहार केला, त्यांवरून या वयातही त्यांनीं केलेल्या अविश्रान्त प्रयत्नांची प्रचिती येते.

'मृच्छकटिक नाटकाचा काळ' व 'हर्षाच्या चरित्रातील आरंभीच्या काही घटनांवर नवीन प्रकाश' या दोन लेखांत या दोन्ही संस्कृत ग्रंथांतील विविध घटनांची चर्चा, संभाषणे इत्यादी असून 'मृच्छकटिक' या नाटकाविषयी अनेक समस्या अद्यापि अनिर्णित आहेत. 'चारुदत्त' ही 'मृच्छकटिका'ची संक्षिप्त आवृत्ती की, 'मृच्छकटिक' हे चारुदत्ताचे अनेक प्रसंग व पात्रे घालून वाढविलेले रूपांतर यांविषयी विद्वानांमध्ये दीर्घकाल वाद माजून राहिला आहे. तथापि या दोन्ही ग्रंथांचे लक्षपूर्वक वाचन केल्यानंतर कोणाच्याही मनात संदेह राहणार नाही. या संबंधीची चर्चा त्यांच्या संशोधन मुक्तावली, सर दोनमध्ये सविस्तर आली आहे. त्या चर्चेचाच हा लेख एक पुरवणी असून त्यात आणखी काही उदाहरणे दिली आहेत. 'हर्षचरित्रातील आरंभीच्या काही घटना त्यांनी विस्ताराने चर्चिल्या आहेत व त्यासाठी अफसड शिलालेखाचा आधार दिला आहे.

दुसऱ्या खंडातील 'नाणेघाट लेण्यातील नागनिकेचा लेख' आणि 'नाणेघाट लेण्यातील मूर्तिलेख' हे दोन्ही लेख सातवाहन घराण्याच्या इतिहासावर प्रकाश टाकणारे अत्यंत महत्त्वाचे कोरीव लेख आहेत. नागनिका हिच्याविषयी अत्यंत विश्वसनीय माहिती मिळते. तिने सातकर्णी राजाबरोबर केलेल्या अनेक यज्ञांची माहिती या लेखात आहे. या लेखामुळे सातकर्णी व नागनिका यांचे परस्पर संबंधही स्पष्ट होतात. या जीर्णशीर्ण लेखाचे वाचन काही विद्वानांनी या पूर्वी केले होते; पण त्यात अनेक त्रुटी डॉ. मिराशींना आढळल्या. डॉ. मिराशींनी शक्यतितके निर्दोष वाचन या लेखाचे करण्याचा प्रयत्न केला आहे. अलीकडे

उजेडात आलेल्या नागनिका व सातकर्णी यांच्या जोडनाण्याने या लेखाला अधिक पुष्टी मिळते. या नाण्यावर सातकर्णी व नागनिका अश्वमेध यज्ञ करीत असलेले दाखविले आहे. हे नाणे चांदीच्या नाण्यांतील कालक्रमाने पहिले नाणे आहे. जिज्ञासू वाचकांच्या सोयीसाठी लेखाच्या शेवटी नाणेघाटातील व नाण्यावरील मूळ लेख दिले आहेत. नाणेघाटातील मूर्तिलेखातही सातकर्णी राजा व नागनिका राणी यांची जोड मूर्ती कोरली होती. ती मूर्ती आता नष्ट झाली असली, तरी मूर्तिलेखावरून नागनिका–सातकर्णी संबंध स्पष्ट होतात.

इतर लेखांत पूर्वी चर्चिलेले 'खारवेलचा काल' 'रामगुप्तपुनःपरीक्षण' या लेखांत ते विषय अधिक विस्ताराने व विविध संदर्भांचे उदा. नाणी, शिलालेख, पुराणे इत्यादींचे पुरावे देऊन पुन्हा तपशीलवार चर्चिले आहेत. शेषलेखांत (संकीर्ण) 'शिवश्री पुळुमावीचा वनवासी शिलालेख,' अफगाणिस्थानातील स्कंदर येथील उमामहेश्वर मूर्तिलेख', 'मान्यखेट' राष्ट्रकूटांचे मूलस्थान,' 'बेणाकट–विदर्भातील विख्यात बौद्धकेंद्र,' 'नाशिक येथील देवीलेणे' इ. लेख म्हणजे विविध विषयांची समग्रचर्चा. बेणाकटच्या बौद्धकेंद्राची चर्चा मुख्यत्वे पौनी येथे अलीकडे झालेल्या उत्खनित पुराव्यांवर आधारभूत असून देवीलेणे लेखात लेण्यातील शिल्पांची चर्चा आहे. या लेखातील राजाज्ञा गौतमीपुत्र सातकर्णी आणि त्याची भाग्यवान राजमाता महादेवी (गौतमी बलश्री) या दोघांची म्हणून उल्लेखिली आहे. देवीलेण्याच्या दरवाजाचे छायाचित्र दिले आहे (पहा प्लेट ४).

काही लेखांवरील विवेचनात–अथवा त्याच्या ओघात त्यांनी डॉ. जी. सी. झाला, डॉ. दिनेशचंद्र सरकार, श्री. शंकर नारायणन, डॉ. जी. सी. गै, डॉ. शशिकांत, प्रा. नीलकंठ शास्त्री इत्यादी मान्यवर विद्वानांच्या अभ्यास-संशोधनात्मक मतांचा चिकित्सक दृष्टिकोनातून परामर्ष घेतला आहे. अनेक ठिकाणी आपल्याला अग्राह्य असलेली व ऐतिहासिक पुराव्यां अभावी निराधार असलेली अशी मते, त्यांचे त्यांनी खंडण केले आहे.

डॉ. मिराशींचे या पुस्तकातील सर्वच लेख माहितीपूर्ण आहेत. आणि वाचकांस संशोधनाची दिशा दाखविणारे व मौलिक मार्गदर्शन करणारे आहेत. त्यांच्या हातून मानवी ज्ञानाच्या निधीत मोलाची भर घालण्याचे व वाङ्मय तपस्येचे कार्य दीर्घकाळ चालले आहे. त्यांचे संशोधनपर सर हे मराठी वाङ्मयाचे एक भूषण आहे. त्यांच्या काही विधानांविषयी मतभेद असतील अथवा त्यांचे काही निष्कर्ष नवीन पुरातत्त्वीय प्रकाशात कालांतराने परिवर्तनीयही ठरले असतील वा ठरतील; तथापि त्यामुळे त्यांच्या संशोधन तपश्चर्येत किंवा अभ्यास श्रेष्ठत्वात यत्किंचितही गौणत्व येत नाही वा येण्याचे कारणही नाही.

* * *

## 'मराठवाडा संशोधन मंडळ वार्षिक–१९७५':

संपादक– पंडित सु. ग. जोशी; प्रकाशक– सु. ग. जोशी, राधाकृष्ण रामचंद्र प्रकाशन, शिरूर ताजबंद– ४१३५१४, ता. अहमदपूर, जि. उस्मानाबाद; १९७५; पृष्ठे १२ + ४१० + १२ चित्रपत्र-पृष्ठे; किंमत २० रुपये.

मराठवाडा संशोधन मंडळाच्या १९७५ या वर्षाचा श्री. सु. ग. जोशी संपादित खंड काही महिन्यांपूर्वी प्रसिद्ध झाला. यापूर्वीच्या खंडाहून प्रस्तुत खंड हे सर्वार्थाने एक पुढचे पाऊल आहे. या खंडात महाराष्ट्रातील विशेषतः मराठवाड्यासंबंधीचे विविध विषयांवरील संशोधनपर लेख संगृहीत करण्यात आले आहेत. मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृती यांमधून मराठवाड्याचे प्राचीन वैभव दिसते. या खंडात एकूण ३९ प्रकरणे असून त्यांपैकी ३७ संशोधनपर लेख आणि शेवटची दोन प्रकरणे अनुक्रमे ग्रंथ परीक्षण व प्रकरणांची इंग्लिश समरी ही आहेत. अनुक्रमणिकेनंतर सुरवातीस पंधरा सुरेख छायाचित्रे दिलेली आहेत आणि पुस्तकाला डॉ. यू. म. पठाण यांची परिचयात्मक प्रस्तावना आहे.

संशोधनपर लेखांची सुरुवात डॉ. शां. भा. देव यांच्या 'पैठण : एक ऐतिहासिक समालोचन' या माहितीपूर्ण लेखाने झाली आहे. या लेखात डॉ. देवांनी महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासातील पैठणचे अनन्यसाधारण महत्त्व विशद केले आहे व

अनुक्रमणिका

हे महत्त्व सांगताना त्यांनी पैठणच्या विविध ऐतिहासिक स्थित्यंतरांचा गोषवारा देऊन मराठवाड्याच्या प्राचीन इतिहासाची महती सांगितली आहे. सातवाहनकाळी हे राजधानीचे शहर किती भरभराटले होते आणि परदेशाशी त्याचा व्यापारी संबंध कसा होता– वगैरे माहिती दिली आहे. पैठणची विविध ऐतिहासिक स्थित्यंतरे वर्णन करताना लेखकाने अश्मयुग, ताम्रपाषाणयुग, प्राचीन ऐतिहासिक युग आणि मध्ययुग या सर्वांतून पैठणचा परिपट आणि खुद्द पैठणच्या सांस्कृतिक जीवनाचा धागा कसा सापडतो हे दाखविले आहे.

'धर्मापुरी येथील चालुक्य शिल्प-स्थापत्य अवशेष', 'मराठवाड्यातील मंदिरे आणि शिल्पे' व 'अजिंठ्यातील एक अवदान कथा' हे तीन लेख मराठवाड्यातील कला अवशेषांसंबंधी असून पहिल्या दोन लेखांत वास्तुशिल्पशैलीसंबंधी माहिती आहे; तर 'अजिंठ्यातील एक अवदान कथा' या लेखात अजिंठा लेण्यातील भित्तिचित्रांतील कथेसंबंधीचे विवेचन आहे. धर्मापुरीच्या चालुक्य–स्थापत्य-शिल्पाची विविध अंगे व वैशिष्ट्ये डॉ. प्र. र. देव यांनी सांगितली असून चित्रक्रमांक ६ मध्ये तेथील नृसिंह शिल्पाचे छायाचित्र दिले आहे. केदारेश्वराच्या शिल्प–स्थापत्याचा सांगोपांग विचार केल्यानंतर ही देवळे हेमाडपंती नाहीत असे मत प्रतिपादन केले आहे. 'मराठवाड्यातील मंदिरे आणि शिल्पे' या लेखात गो. बं. देगलूरकर यांनी मराठवाड्यातील मंदिरांचे कालानुक्रमाने तीन गट पाडले आहेत– आणि प्रत्येक गटातील मंदिरांची स्थापत्य–शिल्प वैशिष्ट्ये वर्णन केली आहेत. या त्यांच्या संशोधनांत त्यांनी मराठवाड्यात चालुक्य स्थापत्यशैलीची मंदिरे नाहीतच, हे मत आता कसे बदललेले आहे, हे उपलब्ध मंदिरांच्या उदाहरणांनी दाखविले आहे. या लेखात काही निवडक शिल्पांची त्यांनी केलेली वर्णने वाचली, तरी मराठवाड्यातील हे शिल्प-वैभव किती मोठे होते याची कल्पना येते. या दोन्ही लेखांत मराठवाड्यातील शिल्पांची माहिती असली, तरी एक उणीव मात्र या लेखांतून सामान्य वाचकास जाणवते आणि ती म्हणजे–दोन्ही लेखांमध्ये उद्धृत केलेल्या स्थापत्य-शिल्प–शैल्या. डॉ. प्र. र. देव यांनी धर्मपुरीतील केदारेश्वर मंदिर यावर चालुक्य–होयसळ कलापरंपरेचा प्रभाव आहे आणि ही स्थापत्यशैली हेमाडपंती पद्धतीची नाही, असे ठामपणे सांगितले आहे; तर डॉ. देगलूरकर यांनी धर्मपुरीतील केदारेश्वर मंदिर तिसऱ्या गटात घातले असून या गटातील मंदिरांना स्थूलमानाने हेमाडपंती मंदिरे म्हणतात. ही मंदिरे इ. स. अकरा व्या शतकापासून चौदाव्या शतकापर्यंत मोठ्या प्रमाणात उभारली गेली, असे विधान केले आहे. त्यामुळे सामान्य वाचकाच्या मनात संभ्रम निर्माण होतो. या मंदिरांची नेमकी स्थापत्यशैली कोणती ? शिवाय ही मंदिरे नागर अथवा द्राविड शैलींत बांधली आहेत का ? याचाही कुठे उल्लेख नाही. या दोन वास्तुशैलींचेच चालुक्य अथवा होयसळ किंवा माळवा अथवा यादवशैली असे पोटभेद आहेत. पुढील काळातील मंदिरशैलींना प्राप्त झालेल्या या प्रादेशिक संज्ञा आहेत.

'अजिंठ्यातील एक अवदान कथा' हा डॉ. म. के. ढवळीकरांचा लेख सर्वार्थाने अत्यंत चिंतनीय आहे. त्यांनी आतापर्यंतच्या रूढ कल्पनेवर एक नवीन प्रकाश टाकला असून येथील चित्रे बुद्धजीवनाशी कशी निगडित आहेत, हे अवदान कथेद्वारे कथित केले आहे.

'लोहगड येथील लेणी व किल्ल्याचे अवशेष' या हरिहर ठोसरांच्या लेखात लोहगड हा मोगल काळात संरक्षणात्मक दृष्ट्या एक महत्त्वाचा किल्ला होता आणि तेथील लेणी कलात्मक आहेत, याची माहिती मिळते.

'हुमायून बादशाहाचा चोबळी ताम्रपट,' 'वझूरचा प्राचीन मराठी स्तंभलेख,' 'कोल्हापूरचा नवीन यादव शिलालेख,' क्रृष्णदेवरायाचा लातूर ताम्रपट' हे कोरीव लेखांवरील चार लेख संशोधनात्मक असून इतिहासावर नवीन प्रकाश टाकतात. यांतील कोल्हापूरचा यादव शिलालेख विशेष उल्लेखनीय आहे.

'शिवाजी आणि मराठवाडा संबंध,' 'मराठेशाहीतील मल्ल व मल्लविद्या,' 'मराठे आणि हैदर,' 'पेशवाईतील आणखी एक तोतया' ही मराठी इतिहासातील महत्त्वपूर्ण व मनोरंजक प्रकरणे होत. शिवाजी महाराजांचा मराठवाड्याशी किती

संबंध आला, मराठेशाहीत मल्ल व मल्लविद्या यांचे किती महत्त्व होते आणि पेशवाईत तोतयांनी कसा धुमाकूळ घातला, याची या लेखांद्वारे माहिती मिळते, तसेच तत्कालीन परिस्थितीचे आकलनही होते. मराठे व हैदर हा लेख म्हणजे तत्कालीन परिस्थितीचे सम्यक दर्शन. त्यावेळच्या राजकीय परिस्थितीचे श्रीमती मंगला मोघे यांनी फार मार्मिक विवेचन केले आहे. 'मल्ल व मल्लविद्या' या लेखात य. न. केळकर यांनी राजे लोकांनी पदरी बाळगलेल्या मल्लांच्या व त्यांच्या कुस्त्यांच्या अनेक हकिकती नमूद केल्या आहेत आणि ही परंपरा व विद्या मराठेशाहीत कशी जोपासली गेली होती, यासंबंधी कागद--पत्रे–पुरावे उद्धृत केले आहेत. शिवाय त्या काळी आखाडे तयार करण्याकरिता तेल, कापूर, बुक्का यांचा कसा व किती उपयोग करीत, याचे तपशील दिले आहेत. एकूण हा लेख म्हणजे मल्लविद्येचा एक अभ्यासपूर्ण चिकित्सक इतिहासच आहे, असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही.

'अध्यात्म भागवत संप्रदायी पीठ, औसा' या लेखात श्री. गो. वि. कोरंगळेकर यांनी मराठवाड्यातील संतपरंपरेवर प्रकाश टाकला आहे. मराठवाड्यात गेल्या दोन तपांत अनेक महत्त्वपूर्ण साहित्य उपलब्ध झाले. त्या साहित्याचा परिचय श्री. पोहनेरकर व श्री. बाळासाहेब पाटील यांनी मोडी लिपीत लिहिलेल्या 'भागवत प्राकृतार्थ दीपिका 'आणि' चूडामणि सुत कवि विठ्ठल चाकूरकर' या दोन लेखांद्वारे केला आहे.

चूडामणिसुत कवि विठ्ठल चाकूरकर या कवीच्या व त्यांच्या सीतास्वयंवर, सुभद्रास्वयंवर, लवकुश, शकुंतलादि आख्यानात्मक लेखनाचे, मूळ संहितेसह श्री. सु. ग. जोशी यांनी संपादन केले आहे.

'शाहिरी वाङ्मयातील हिरा : तुळजापुरचा कलगीतुरा' या लेखात क. भ. प्रयाग यांनी या शाहिरी लोकसाहित्याच्या परंपरेचे मराठवाड्यातील महत्त्व प्रतिपादन केले आहे. प्राचीन वाङ्मयावरील एक संशोधनपर लेख, या दृष्टीने प्रस्तुत लेख खास वाचनीय व चिंतनीय आहे.

वीरशैव साहित्याची मराठवाड्यातील परंपरा-देखील लक्षणीय आहे. या संदर्भात. 'शिवदासकृत बसवपुराणाचा' श्री शांतितीर्थ स्वामी यांनी करून दिलेला परिचय वैशिष्ट्यपूर्ण आहे.

'पोथ्यांचा नाश' व 'शिवकालीन भागवताची सचित्र पोथी' हे दोन लेख जुन्या हस्तलिखित पोथ्यांच्या संदर्भात आहेत. पहिल्या लेखात डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी म. गोपीरांजबुवांचे टिपण, पोथ्यांचा नाश कसा झाला व किती प्रमाणात झाला, याची कल्पना यावी म्हणून उद्धृत केले आहे. दुसऱ्या लेखात श्री. बा. ल. मंजूळ यांनी भागवताच्या सचित्र दुर्मिळ पोथीविषयी लिहिले आहे. भारतात जुन्या हस्तलिखित पोथ्या हजारोंनी उपलब्ध होतात: परंतु सचित्र अशा फारच थोड्या मिळतात. अलीकडेच वाई येथे अशा दोन : पांडवप्रताप व ज्ञानेश्वरी – सचित्र पोथ्या मिळाल्या आहेत. मात्र त्या सुमारे दोनशे वर्षांपूर्वीच्या आहेत. वरील भागवताची पोथी इ. स. १६४८ ची आहे. या पोथीसंबंधी कार्ले खंडाळवाला यांनी या चित्रांचा परामर्ष पूर्वी 'मार्ग'-मध्ये घेतला होता. मराठी वाचकांसाठी हा लेख निश्चितच उपयुक्त ठरेल. चित्रांची शैली, रंगसंगती, रेखीवपणा, परंपरा इत्यादी दृष्टींनी ही चित्रे उल्लेखनीय आहेत. पोथीत एकूण पूर्णपृष्टाकाराची ८८ चित्रे आहेत. यांतील काही कलाकृतींचे ठसे रसिक वाचकांसाठी मुद्दाम या ग्रंथाच्या सुरुवातीस दिले आहेत. त्यावरून या चित्रशैलीची कल्पना येते ( चित्र क्रमांक ७ व ८ ).

विद्यापीठ स्थरावरील मराठी संशोधन या लेखात संकलक श्री. म. प. पेठे व सौ. शांता येरवडेकर यांनी अत्यंत परिश्रमाने प्रबंधांची एक प्रदीर्घ सूची तयार केली आहे. तीत काही त्रुटी आहेत. पण भारतातील मराठी साहित्याचा अभ्यास करणाऱ्यास – विशेषतः संशोधकास ती फार उपयुक्त आहे. या सूचीत मराठी भाषेतील पहिल्या विद्यावाचस्पती-पासून १९७४ मध्ये विद्यावाचस्पती ही पदवी मिळविलेल्या सर्व अभ्यासकांची विषयवार यादी आढळते.

या वार्षिकासाठी संपादक पंडित सु. ग. जोशी यांनी मराठवाड्यातील अनेक संशोधकांबरोबरच

महाराष्ट्रातीलही इतर मान्यवर संशोधकांचे लेखन-सहाय या खंडास घेतले आहे. याबद्दल संपादकांना धन्यवाद. त्यामुळे मराठवाड्याबाहेरील काही महत्त्वाच्या विषयांवरील लेख यात समाविष्ट झाले आणि या वार्षिकास व्यापकत्व व भारदस्तपणा लाभला. या संदर्भात तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी पॅरिस येथे आंतरराष्ट्रीय प्राच्यविद्या परिषदेत वाचलेला निबंध उल्लेखनीय आहे. याशिवाय सर्वश्री. ग. ह. खरे, शं. गो. तुळपुळे गो. के. भट, य. न. केळकर, मु. श्री. कानडे यांच्या व्यासंगाच्या विषयांची चर्चा येथे आली आहे. ती खचितच अभ्यासकांना उपयुक्त ठरेल.

या ग्रंथात महाराष्ट्रातील संशोधक– अभ्यासकांनी आपल्या लेखणीद्वारे विविध विषयांवर– आणि विशेषतः मराठवाड्याच्या सांस्कृतिक अंगावर विशेष प्रकाश टाकला आहे. या लेखांमुळे नवीन अभ्यासकांना निश्चितच स्फूर्ति मिळेल आणि संशोधनाची नवीन दालने हळूहळू खुली होतील यात संदेह नाही. अशा प्रकारची वार्षिके म्हणजे होतकरू विद्यार्थ्यांना एक पर्वणीच म्हणावी लागेल. यातील सर्व लेखांतून व्यासंगी अभ्यासकांची मौलिक संशोधन सेवा आणि प्राचीन संस्कृती-साहित्याबद्दलची मनोमन तळमळ दिसते. हे सर्व साहित्य संपादन करणारे पंडित सु. ग. जोशी यांचे परिश्रम निश्चितच कौतुकास्पद आहेत. एवढा मोठा ग्रंथ आणि त्यातील चाळीस बेचाळीस लेखक– संशोधक यांचे लेख त्यानी काळजीपूर्वक– संपादित केले– आणि त्याला आकर्षक ग्रंथ-स्वरूप दिले.

या ग्रंथात सुरवातीस दिलेली सुरसुंदरी, वामनावतार, शेषशायी नारायण, पत्रलेखिका इत्यादींची छायाचित्रे–चित्रपत्रे मोहक, सुरेख व निवडक आहेत. या छायाचित्रांमुळे या ग्रंथाची शान वाढली आहे आणि कोरीव लेखांच्या ठशामुळे संशोधक–वाचकांची अधिक सोय झाली आहे. डॉ. गो. बं. देगलूरकर यांनी वर्णन केलेली सुरसुंदरी प्रारंभीच्या पहिल्या छायाचित्रात पाहिल्यावर मराठवाड्यातील शिल्पसौंदर्याची मनोमन कल्पना येते– आणि या शुकधारी सुरसुंदरीसारख्या अनेक मूर्ती मराठवाड्यात असाव्यात याविषयी मनात संदेह रहात नाही. तीच गोष्ट भागवताच्या तीनशे वर्षांपूर्वीच्या सचित्र पोथीविषयी म्हणता येईल. या पोथीतील चित्रे कशी असतील, असा प्रश्न मनात उद्भवतो; पण छायाचित्रांतील चित्र क्रमांक ७ व ८ पाहिले असता त्याची कल्पना येते.

– सु. र. देशपांडे

---

**'दलित साहित्य : सिद्धान्त आणि स्वरूप'** :
**लेखक** : प्रा. यशवंत मनोहर, **प्रकाशक**– श्री. वामन निंबाळकर, ४२६ इकबाल बंगला; छावणी, औरंगाबाद, **पृष्ठे**– १२६; **किंमत**– बारा रुपये.

---

नागपूरच्या प्रा. यशवंत मनोहरांचा '**दलित साहित्यः सिद्धान्त आणि स्वरूप**' हा दलित साहित्यावरील १२६ पृष्ठांचा छोटेखानी प्रबंध नुकताच प्रसिद्ध झाला आहे. वस्तूच्या निर्मितीनंतर वस्तूचे शास्त्र निर्माण होते. या नियमानुसार दलित साहित्याच्या निर्मितीनंतर दलित साहित्याचे शास्त्र निर्माण होणे अपेक्षितच होते. प्रा. यशवंत मनोहरांच्या या ग्रंथाने ही अपेक्षांची पूर्ती बऱ्याचशा प्रमाणात झाली आहे.

"दलित साहित्याची मूलगामी भूमिका आणि सौंदर्यशास्त्र मांडणारा हा मराठीमधला पहिलाच ग्रंथ आहे" असे श्री. वामन निंबाळकर यांनी प्रकाशकीयात म्हटले आहे. त्यांच्या दुसऱ्या विधानाबद्दल फार वाद नाही. परंतु त्यांचे पहिले विधान पटणारे असे नाही. दलित साहित्याची मूलगामी भूमिका मोठ्या रसाळपणे व विस्तृत्वाने मांडणारा डॉ. भालचंद्र फडके यांचा '**दलित साहित्य : वेदना आणि विद्रोह**' हा सुंदर ग्रंथ यापूर्वीच प्रसिद्ध झाला आहे.

प्रा. मनोहर यांच्या सदर ग्रंथात दलित जाणिवेचे सुस्पष्ट चित्रण आढळते. दलित साहित्याची चिकित्सा त्यांनी १० प्रकरणांत केली आहे. १) दलित साहित्य : सिद्धान्त आणि स्वरूप, २) शोषितांच्या उत्थानाचे चरित्र, ३) दलित साहित्याची प्रेरणा, ४) दलित साहित्य : सामाजिक बांधिल-




कोचा प्रश्न, ५) दलित साहित्य आणि पुरोगामित्व, ६) कलावाद आणि कलावादी, ७) दलित साहित्याची पार्श्वभूमी, ८) प्राचीन मराठी संत आणि वर्णव्यवस्था, ९) अण्णा भाऊ साठेंच्या जीवन-जाणिवा आणि १०) दलित साहित्याचे सौंदर्यशास्त्र. या प्रकरणांच्या शीर्षकांवरून स्पर्शित प्रश्नांची चर्चा लक्षात येते. मात्र या चर्चेत दलित साहित्यांतर्गत वैचारिक लेखन सातत्याने करणाऱ्या अस्मितादर्शचे संपादक प्रा. गंगाधर पानतावणे, श्री. राजा ढाले, श्री. ज. वि. पवार यांच्या विचारांचा मागोवा वा नामनिर्देशही नसावा ही खटकणारी गोष्ट आहे. ठराविक निष्ठांचेच प्रदर्शन करणारी ही रचना आहे की काय अशी शंका कोणाच्या मनात डोकावल्यास त्याला दोष देता येणार नाही. कारण दलित साहित्याचा विचार करणाऱ्या दलितेतर विचारवंतांचा उल्लेख येतो पण काही दलित विचारवंतांचा नामोल्लेख येऊ नये याला काय म्हणावे ? मार्क्सला दलितांच्या वैचारिक कुटुंबातील एक महत्त्वाचा घटक समजून मार्क्सवाद व आंबेडकरवाद यांचा मेळ घालण्याचा प्रा. मनोहर यांनी आटोकाट प्रयत्न केला आहे.

दलित साहित्य आणि दलित चळवळ यांचे प्रा. यशवंत मनोहर यांनी केलेले विश्लेषण मात्र मर्मग्राही आहे. दलित साहित्याचा प्रवाह दलित चळवळीला पूरक व प्रेरक होईल अशी त्यांना खात्री वाटते. दलित चळवळ कुंठित का झाली याची लेखकाने केलेली मीमांसा खऱ्या दलित कार्यकर्त्याला अंतर्मुख बनविते. व्यथित अंतःकरणाने मनोहरांची विद्रोही लेखणी म्हणते, " ज्यांच्या स्वार्थाची वर्तुळे वर्गाएवढी मोठी नव्हती तर जातीएवढी म्हणजेही स्वतःएवढीच क्षुद्र होती अशा नेतृत्वांनी बाबासाहेबांचा विचार पारंपरिकतेच्या पायांत घुंगुरांसारखा बांधला ( पृष्ठ ४० )"

परंपरागत मूल्ये मनोहर किंवा एकंदर दलित साहित्यच कसे नाकारते पहा :

" ज्ञानदेवांचे पसायदान वर्णव्यवस्थेचा जाहीरनामा झाले आहे आणि मानवतावादाचा पंचनामा झाले आहे ( १०३ ) आणि म्हणूनच प्रा. वा. ल. कुलकर्णी यांच्या ' दलित साहित्य ही केवळ फॉर्मची पडझड नसून ॲटिट्यूडची पडझड आहे. " या विधानाची सत्यता अधिकच पटते. खरा मार्क्सवाद खऱ्या आंबेडकरवाद्याला शत्रू वाटणारा नसतो. खऱ्या मार्क्सवाद्याचा आणि खऱ्या आंबेडकरवाद्याचा झगडा कधीच नसतो. असे श्री. मनोहर म्हणतात. याचा अर्थ खऱ्या आंबेडकरवाद्याला केवळ खरा आंबेडकरवादच का पुरू नये ? खोटचा अगर खऱ्या मार्क्सवादाची त्याला कुबडी घेण्याची मग गरज काय ?

" दलित साहित्याचे सौंदर्यशास्त्र आशय बदलून औचित्यविचाराला जागा देते." असे लेखकाने म्हटले आहे ( पान १२३ ). पुढे त्याच्या म्हणण्याप्रमाणे जाणिवेच्या मार्गदर्शनानुसार विविध अनुभव हा कलावंत घेतो. अनुभव म्हणजे प्रत्यय प्रत्यय म्हणजेच आशय. त्याचाच आविष्कार म्हणजे कला होय. त्या आशयाचा उत्कट प्रत्यय म्हणजे सौंदर्य-प्रत्यय होय. हेच सौंदर्य दलित कलेचा अंतिम निकष ठरते ( पान १२४ ). आता अनुभव (प्रत्यय) बदलून दलित साहित्याचे सौंदर्यशास्त्र औचित्यविचाराला जागा कशी देणार हे आकळत नाही.

मर्ढेकर, अण्णा भाऊ साठे वगैरेंची मराठी ललित साहित्यातील दलित साहित्याची काही अंशीच परंपरा आहे असे लेखकाने एके ठिकाणी मान्य केले आहे. पण त्याच अण्णा भाऊंवर त्याने शेवटी तब्बल १३ पाने खर्ची घातली आहेत.

स्फुट लेख एकत्र जोडल्याने विचारांचे जसे विकीर्णन ( स्कॅटरिंग ) होते तसे या पुस्तकाचे झाले आहे. त्यामुळे दलित साहित्याचे स्वरूप सलगपणे दिग्दर्शित होऊ शकलेले नाही. तथापि दलित साहित्यविषयक विचाराला एक वेगळी दिशा असू शकते हे या ग्रंथाने दाखवून दिले आहे म्हणून लेखकाचे निश्चितच अभिनंदन करावे लागेल.

— सतीश कुलकर्णी

---

**रंगांद्वारे व्यक्तिपरीक्षा** : डॉ. मॅक्स लूशर; अनुवादक : प्रभाकर गोरे ( चित्रकार ); केशव भिकाजी ढवळे प्रकाशन, मुंबई; पृष्ठे १३४ + ८; मूल्य १५ रुपये.

हा डॉ. मॅक्स लूशर या जर्मन रंगशास्त्रज्ञाच्या ' कलर टेस्ट ' या पुस्तकाचा प्रसिद्ध चित्रकार

प्रभाकर गोरे यांनी केलेला स्वैर अनुवाद आहे. हात पाहून तसेच शरीराची ठेवण वा चेहरा पाहून इत्यादी प्रकाराने मानवी स्वभावाचा व व्यक्तिमत्त्वाचा शोध घेण्याचे प्रयत्न करण्यात येतात. त्याचप्रमाणे माणसाच्या रंगांविषयीच्या आवडनिवडींवरून त्याच्या मानसिक स्थितीविषयी अचूक निदान करता येते, असे डॉ. लूशर यांचे मत आहे व त्यासाठी घ्यावयाच्या परीक्षेची माहिती या पुस्तकात दिलेली आहे. युरोपात ही रंगपरीक्षा प्रत्यक्ष वापरली जात असून तेथे मानवी गुणदोषांचे निदान व चिकित्सा करण्यासाठी डॉक्टर व मानसशास्त्रज्ञ आणि नोकरभरती करताना व्यावसायिक या परीक्षेचा वापर करतात. ही परीक्षा साधी व सोपी असली, तरी अशा प्रकारे हिचा वापर करताना अतिशय काळजी घेतली पाहिजे, असे डॉ. लूशर यांनी आग्रहपूर्वक सांगितले आहे. कारण ही परीक्षा खोल अंतर्मनाची अचूक चाचणी आहे, असे त्यांचे मत आहे.

या रंगपरीक्षेची पार्श्वभूमी देऊन डॉ. लूशर यांनी ही परीक्षा कशी घ्यावी व तिचा कसा वापर करावा, हे सुलभपणे पुस्तकात सांगितले आहे. माणसाची रंगांविषयीची आवडनिवड व तिचा मानसशास्त्राशी असलेला संबंध थोडक्यात समजावून सांगून रंगांची निवड तो कशी करतो, कोणत्या क्रमाने करतो हे पाहून अशा आवडीनिवडीमागे असलेल्या चिंता, संघर्ष इत्यादी मानसिक स्थितींचे विवरण पुस्तकात आले आहे. आपल्या चाचणीसाठी त्यांनी चार प्रमुख ( निळा, हिरवा, तांबडा व पिवळा ) आणि चार गौण ( जांभळा, तपकिरी, काळा व राखी ) रंग काळजीपूर्वक निवडले असल्याचे सांगून त्यांनी या सर्व रंगांचे मानसशास्त्रीय व रचनात्मक अर्थही विस्तृतपणे दिले आहेत. याशिवाय या रंगांच्या विविध प्रकारे होणाऱ्या जोडयांची शरीरशास्त्रीय व मानसशास्त्रीय स्पष्टीकरणेही दिलेली आहेत. माणसाचे इच्छित हेतू, त्याची परिस्थितिजन्य वर्तणूक व विरोधी वर्तन, चिंताजनक लक्षणे आणि वैयक्तिक उपाय या गटांमध्ये वरील स्पष्टीकरणांची विभागणी केली असल्याने पुस्तकाची सुलभता वाढली आहे.

पुस्तकासोबत वरील आठ रंगांचे पत्तेही पुरविण्यात आले असून त्यांच्या साहाय्याने ही परीक्षा कशी घ्यावी हे सांगितले आहे. रंगांची निवड कशी झाली पाहिजे; त्यांची प्रत्यक्ष मांडणी, अनुक्रम व विभागणी कशी करावी; त्यांच्या जोडया कशा लावाव्यात आणि शेवटी स्पष्टीकरणे कशी पहावीत यांविषयी सविस्तर व सोपा खुलासा दिलेला आहे. यामुळे कोणाही सामान्य माणसाला ही परीक्षा घेणे व तीद्वारे निरनिराळया व्यक्तींचे स्वभावविशेष जाणून घेणे शक्य झाले असून त्याकरिता तो एखाद्या विशिष्ट विषयातील तज्ञ असण्याची गरज नाही. अर्थात् विविध व्यावसायिक क्षेत्रांत ही परीक्षा वापरणे तज्ज्ञांनाच शक्य होईल, हे स्पष्ट आहे.

माणसाची रंगांविषयीची आवडनिवड ही काही प्रमाणात उपजत असली, तरी ती निश्चित होताना परिसराचाही परिणाम झालेला असण्याची शक्यता नाकारता येत नाही. डॉ. लूशर यांनी निवडलेले रंग हे विशिष्ट मन:स्थितींचे निदर्शक असल्याचे गृहीत धरले आहे. त्यामुळे या परीक्षेला काही प्रादेशिक मर्यादा पडतात की काय, हे तपासून पाहिले गेले पाहिजे. अर्थात् रंगांची निवड करतानाच हा विचार झाला असण्याची शक्यता आहे. मात्र रंगांची संख्या मर्यादित केल्याने ही परीक्षा सुटसुटीत होऊ शकली, हे उघड आहे.

काही किरकोळ त्रुटी पुस्तकात आहेत. उदाहरणार्थ वर्णनात जांभळा म्हणून सांगितलेला रंग हा प्रत्यक्ष त्या रंगाच्या पत्त्यावर किरमिजी म्हणून दर्शविला आहे; तर रंगीत पत्त्यावरील तांबडा रंग हा तांबडा वाटणे कठीण आहे. परंतु या त्रुटींचा परीक्षेच्या निष्कर्षांवर परिणाम होणार नाही, हे उघड आहे.

अशा प्रकारे या चांगल्या अनुवादामुळे सर्वसामान्य मराठी वाचकाला एका अगदी नव्या व अनोख्या विषयाची थोडक्यात व सहजपणे ओळख करून देण्यात तसेच एका नवीन दृष्टिकोनातून मानवी स्वभावविशेषांची माहिती करून घेण्यात हे पुस्तक यशस्वी ठरेल, यात शंका नाही.

अ. ना. ठाकूर

# सार-संकलन

## देश आणि परदेश :

१४ एप्रिल १९७८ ला भारतातील वर्तमान-पत्रांतून पुढील आशयाची बातमी प्रसिद्ध झाली :

चीनच्या अणुचाचण्यांची माहिती मिळविण्या-साठी अमेरिकन गुप्तचरांनी चीनच्या सरहद्दीलगत हिमालयात दोन अणुशक्तिचलित माहितीग्रहण केंद्रे ठेवली होती या बातमीबाबत चौकशी करावी; अशी मागणी अमेरिकन काँग्रेसमधील डेमॉक्रॅटिक पक्षाच्या दोन सभासदांनी काल (दि. १२-४-७८) अध्यक्ष जिमी कार्टर यांना केली.

ज्या बातमीवर ही मागणी आधारली आहे तिचा आशय असा, की असे माहितीग्रहण केंद्र प्रथम १९६५ साली अध्यक्ष जॉन्सन यांच्या कारकीर्दीत बसविण्यात आले. दुसरे केंद्र १९६८ साली ठेवले गेले. हे करताना अमेरिकन सी. आय्. ए. आणि भारतातील समांतर संघटना सी. बी. आय्. ह्यांचे अनधिकृत संगनमत होते, असा आरोपही करण्यात आला आहे.

जेव्हा प्रथम असे केंद्र बसविण्याची खटपट सुरू झाली तेव्हा मोसमाच्या अखेरीस हिमालयातील हालचाली आवराव्या लागल्या व नंदादेवी शिखरा-जवळ माहितीग्रहण केंद्र बसविण्याचे काम अपुरे सोडावे लागले. पुढील वसंतऋतूत पथक पुन्हा तेथे गेले तेव्हा ते केंद्र एका हिमकडचाखाली चिरडले गेल्याचे त्याला आढळले.

गंगा नदीचा उगम नंदादेवी शिखरापाशी असल्यामुळे, ह्या चिरडल्या गेलेल्या केंद्रामधून गळालेल्या प्लुटोनियमने गंगेचे पाणी प्रदूषित झाले किंवा कसे ह्याची पाहणी करणे आवश्यक आहे, अशी सूचनाही ह्या संदर्भात करण्यात आली आहे.

सी. आय्. ए. आणि अमेरिकन परराष्ट्र खाते ह्या दोघांनी ह्या बातमीवर भाष्य करण्याचे नाकारले.

भारताच्या परराष्ट्र खात्याने अर्थात् ह्या बात-मीची गंभीर दखल घेतली. भारताचे परराष्ट्र-सचिव जगत मेहता यांनी अमेरिकेचे भारतातील वकील गोहिन यांना बोलावून घेतले आणि असे सांगितले, की ह्या हेरगिरी केंद्राबाबतच्या बातम्यां-मुळे भारत सरकार, संसद व जनता यांना चिंता वाटणे स्वाभाविक आहे.

गंगा जरी नंदादेवी शिखरातून उगम पावत नसली तरी गंगेची उपनदी गंडक हिचा उगम नंदादेवीमधून झाला आहे. गेल्या पंधरा वर्षांत ह्या केंद्रातील शक्तिसंचय जर फुटला असेल, तर तो गंगेच्या पाण्यात मिळून गेला असणे अगदी शक्य आहे. म्हणजे गंगेचे पाणी प्रदूषित झाले असणे शक्य आहे.

'अमेरिकेच्या पापाने गंगाजलाला दोष' ह्या प्रकारचे मथळे देऊन ही बातमी भारतीय वृत्तपत्रांत प्रसिद्ध झाली.

दि. १७ एप्रिलला महामंत्री श्री. मोरारजी देसाई ह्यांनी संसदेत असे निवेदन केले, की प्रक्षेपणास्त्रांच्या संदर्भात माहिती मिळविण्यासाठी हे साधन ठेव-ण्याचा निर्णय त्यावेळच्या भारत आणि अमेरिका यांच्या शासनांनी सर्वश्रेष्ठ पातळीवरून घेतला होता. १९६४ ते १९६८ सालच्या दरम्यानचे भार-ताचे तीन महामंत्री ह्या निर्णयाशी संबंधित होते, असेही त्यांनी सांगितले. ज्या आंतरराष्ट्रीय परि-स्थितीत त्या वेळच्या महामंत्र्यांनी हा निर्णय घेतला, तिचा विचार करता आपण त्यांना दोष देणार नाही; तथापि आपण स्वतः तसा निर्णय घेतला नसता असेही विधान त्यांनी केले.

हा एकंदर प्रकार अत्यंत उद्‌बोधक आहे. ह्या गुप्त केंद्राविषयी वर्तमानपत्रातून बातमी प्रसिद्ध झाल्यानंतर ताबडतोब भारतीय परराष्ट्र खात्याने अमेरिकन वकिलापाशी चिंता व्यक्त केली, अशी

अनुक्रमणिका

बातमीही प्रसिद्ध झाली. आता, प्रत्यक्षात चिंता व्यक्त करण्याची घटना घडली नाही; पण चिंता व्यक्त करण्यात आल्याची बातमी देण्यात आली. चिंता व्यक्त करण्याची घटना घडली नाही असे म्हणण्याचे कारण असे, की वस्तुतः (किरणोत्सर्गी केंद्राविषयी) चिंता नव्हती व म्हणून ती व्यक्त करण्याचा प्रश्नच उद्‌भवत नव्हता. चिंता होती ती वेगळीच होती. केंद्राविषयी चिंता नव्हती, तर केंद्राविषयीची बातमी फुटली ह्याविषयी चिंता होती. आणि ह्या बातमीच्या विरोधी बातमी–केंद्राविषयी भारतीय परराष्ट्र खात्याने चिंता व्यक्त केल्याची बातमी–येणे आवश्यक होते आणि त्याप्रमाणे बातमी देण्यात आली. आता क्ष ही घटना घडली अशी बातमी द्यायची, तर क्ष ही घटना घडली असणे आवश्यक असते. म्हणून अमेरिकेच्या वकिलाला बोलावून आणून भारतीय परराष्ट्र सचिवाने चिंता व्यक्त केली. लक्षात घेण्यासारखी गोष्ट अशी, की एक महत्त्वाची बातमी देण्यासाठी ज्या घटनेची ती बातमी आहे ती घटना घडवून आणण्यात आली. एक महत्त्वाची घटना घडली आणि म्हणून तिची बातमी दिली, असे घडले नाही.

ज्या जगात आपण वावरत आहोत त्याच्यात कित्येक अत्यंत महत्त्वाच्या घटना ह्या बातम्या असतात. उदा. एखाद्या राजकीय नेत्याच्या सभेला अभूतपूर्व गर्दी झाली या घटनेचे जेवढे महत्त्व असेल, त्यापेक्षा ही बातमी देशभर पसरणे ह्याला अधिक महत्त्व आहे. पण अशी बातमी सर्वत्र पसरली, तर अशी सभा घडलेली असावी लागते आणि त्यासाठी अनेक भाडोत्री लोकही धरून आणले जातात. एखाद्या शाहण्या संयमी, निःस्वार्थी, जनतेच्या सेवेला वाहून घेतलेल्या नेत्याने एक सभा घेतली, तिला प्रचंड गर्दी झाली, आजच्या राजकीय आणि सामाजिक परिस्थितीचे विश्लेषण वक्त्याने केले, राष्ट्राने कोणते धोरण स्वीकारले पाहिजे ते त्याने विशद केले, त्या बाबतीत प्रत्येक व्यक्तीची जबाबदारी काय असेल हे त्याने स्पष्ट केले व हे सर्व विवेचन लोकांनी लक्षपूर्वक ऐकून घेतले, त्यांच्या विचाराला खाद्य मिळाले, त्यांना चालना मिळाली ह्या स्वरूपाची घटना ही एक प्रकारची महत्त्वाची घटना. एका विशिष्ट राजकीय नेत्याच्या सभेला अभूतपूर्व गर्दी झाली ही बातमी पसरणे, ही दुसऱ्या प्रकारची महत्त्वाची घटना. पहिल्या प्रकारच्या घटनेला महत्त्व असते व म्हणून तिच्या बातमीला महत्त्व असते. दुसऱ्या प्रकारात बातमीला महत्त्व असते व म्हणून घटना घडण्याला महत्त्व असते.

'क्ष ही घटना घडली ही बातमी म्हणजेच क्ष ही घटना' हे विधान तत्त्ववेत्त्यांना तर्कदुष्ट, आत्मव्याघाती इ. वाटेल. पण ती आजच्या जगात वस्तुस्थिती आहे. प्लोटोने एका गुहेची कल्पना केली आहे. काही माणसांना ह्या गुहेत डांबून ठेवलेले असते आणि गुहेबाहेरील वस्तूंच्या त्यांच्या समोरच्या भिंतीवर ज्या सावल्या पडलेल्या असतात त्याच केवळ ती पाहू शकतात आणि त्यांच्यावरूनच केवळ बाहेरच्या वस्तूंचे त्यांना ज्ञान होऊ शकते. आज आपली परिस्थिती ह्या गुहेतील माणसासारखी झाली आहे. आपण आपापल्या ठिकाणी, आपापल्या चाकोरीत बांधलेले असतो, जगाच्या एका कोपऱ्याची आपल्याला प्रत्यक्ष माहिती असते. पण वर्तमानपत्रांतून, रेडियोवरून, दूरदर्शनावरून आपल्यावर बातम्यांचा भडिमार चाललेला असतो आणि ह्या बातम्या हे आपले जग बनते. (ह्याचा एक परिणाम असा होतो, की ज्यांची नावे आपण वर्तमानपत्रांतून वाचतो, रेडियोवर ऐकतो, ज्यांना दूरदर्शनावर पाहतो त्याच खऱ्याखुऱ्या व्यक्ती बनतात, इतर सर्व जिवंत माणसे असून नसल्यासारखी असतात, ती माणसे उरत नाहीत, ती संख्याशास्त्रीय एकक बनतात. असणे म्हणजे वर्तमानपत्रात निर्देश होणे.). विशेषतः फॅसिझम, कम्युनिझम इ. विचारप्रणालींचा जबरदस्त पगडा राजकारणावर आणि समाजकारणावर बसल्यानंतर ही परिस्थिती निर्माण झाली आहे. एकेकाळी 'वस्तुस्थिती पवित्र असते, भाष्य करायला आपण मोकळे आहोत,' असे वर्तमानपत्रांचे ब्रीद होते. वृत्तांतनिरपेक्ष अशी वस्तुस्थिती असते आणि तिचा यथार्थ वृत्तांत देणे, हे वार्ताहराचे कर्तव्य असते असे त्याच्या मागचे गृहीतकृत्य होते. आज वस्तुस्थिती आणि वृत्तांत ह्यांच्यात भेद करणे कठीण झाले आहे. ह्या परिस्थितीत व्यक्तीच्या स्वातंत्र्याची आणि स्वायत्ततेची ज्यांना कदर आहे, त्यांच्या दृष्टीने बातम्या पुरविणाऱ्या









माध्यमांवर कोणाचाही काबू नसणे– सरकारचा, भांडवलदारांचा, प्रागतिक विचारसरणीच्या मंडळींचा इ.– ह्या गोष्टीला अतोनात महत्त्व आहे. पण अशी परिस्थिती निर्माण करणे आणि टिकवून धरणे दुरापास्त झाले आहे.

दुसरी गोष्ट अशी, की सी. आय्. ए. ह्या गुप्त अमेरिकन संघटनेच्या सर्व देशांत चाललेल्या कारवायांविषयी अनेकांच्या मनांत अतिशय रास्त आशंका आहे. ह्या गुप्त संघटनेच्या अमर्याद सामर्थ्याचा, तिच्या सर्वव्यापी हालचालींचा एवढा दरारा कित्येकांना, विशेषतः प्रागतिक मंडळींना वाटतो, की त्यांच्या दृष्टीने अनिष्ट ठरेल अशी कोणतीही घटना घडली, तर तिच्यामागे त्यांना सी. आय्. ए. चा हात दिसतो. पण सर्वच बलिष्ठ राष्ट्रांच्या गुप्त संघटनेच्या कारवाया फार काळ गुप्त रहात नाहीत. व्यक्तिस्वातंत्र्याची, कायद्याच्या राज्याची, राष्ट्राराष्ट्रांतील संबंधांत काही माणुसकी असावी ह्याची कदर असलेल्या निर्भय अमेरिकन व्यक्तीच त्यांच्यावर प्रकाश टाकतात, त्यांचा निषेध करतात. साम्यवादी हुकुमशाहीखाली असलेल्या राष्ट्रांच्या गुप्त संघटना गुप्त राहतात. पण ह्या गुप्त संघटनांच्या कारवायांचे 'डायलेक्टिकली' समर्थन करता येते. कारण 'डायलेक्टिकली' कशाचेही समर्थन करता येते. उदा. न्यायावर आधारलेला समाज निर्माण करण्यासाठी निरपराध माणसांवर निराधार आरोप ठेवून, बनावट पुराव्याच्या आधाराने ते सिद्ध करून त्यांना ठार मारण्याचे समर्थन करता येते आणि पुढे असे समर्थन करणाऱ्यांना ठार मारण्याचे समर्थन करता येते.

पण भारताच्या महामंत्र्यांनी एवढा दुर्लौकिक असलेल्या सी. आय्. ए. शी संगनमत करण्याचा जो निर्णय घेतला, त्याचा उलगडा कसा करता येईल ? हे काही अमेरिकन साम्राज्यशाहीचे छुपे हस्तक नव्हते. त्यांची उज्ज्वल राष्ट्रनिष्ठा संशयातीत आहे. एखाद्या सभ्य माणसाने, ज्याच्या अत्याचारी वर्तनाचा त्याला वीट आला असेल, अशा गल्लीतील एखाद्या गुंडाचे स्वतःचे रक्षण करण्यासाठी साहाय्य घ्यावे तसा हा प्रकार झाला. तो गुंड असे साहाय्य आनंदाने करील आणि जगात असेच चालते, फार सोवळेपणा कामाचा नसतो असा वर साळसूद उपदेशही करील; आणि पुढे कधीतरी, अनपेक्षित रीतीने, दिलेल्या साहाय्याचा फायदा उठवील. गुंडाचे एकदा साहाय्य घेतल्याने त्याने जे जे केले असेल ते समर्थनीय होते अशी कबुलीच आपण देतो. त्याच्यात आणि आपल्यात एवढाच फरक उरतो, की आपल्याला जे करावेसे वाटते, पण जे करायला आपण धजत नाही ते तो करून दाखवितो. आपल्या महामंत्र्यांनी जेव्हा हा निर्णय घेतला तेव्हा त्यांनी तो अतिशय बिकट प्रसंगी, अतिशय अनिच्छेने घेतला असणार यात शंका नाही.

पण राष्ट्राच्या भवितव्याच्या दृष्टीने इतक्या दूरगामी महत्त्वाचा हा निर्णय प्रत्यक्षात कितीजणांनी मिळून घेतला असेल ? ह्या स्वरूपाचा निर्णय अपरिहार्यपणे गुप्त असणार. मग त्याच्यात कितीजण सहभागी असू शकतील ? अमेरिका किंवा भारत यांच्यासारख्या लोकशाही राष्ट्रांत किंवा रशिया-चीन ह्यांसारख्या हुकूमशाही राष्ट्रांत अखेरीस ह्या स्वरूपाचा निर्णय काही मूठभर व्यक्तीच गुप्तपणे घेतील आणि सामान्यपणे पुढील सरकारे त्याच्याशी बद्ध राहतील. ह्या मूठभर व्यक्तींवर सर्वसामान्य जनता कोणता अंकुश ठेवू शकते ? मानवजातीचे सार्वभौम राष्ट्रांत जोपर्यंत विभाजन झाले आहे तोपर्यंत ह्या प्रश्नाला उत्तर नाही.

अनुक्रमणिका

# श्रद्धांजली

प्राज्ञपाठशाळा मंडळाचे माजी आजीव सेवक कै. शंकर रामचंद्र जोशी यांचे दु:खद निधन दिनांक १ मार्च १९७८ ला पुणे येथे दुपारी ११ ते १२ च्या सुमारास झाले. सानेगुरुजी रस्ता व टिळक रस्ता यांच्या कोपऱ्याजवळून टिळक रोड ओलांडीत असताना एका स्कूटरवाल्याचा धक्का लागून श्री. जोशी कोलमडले. डोक्याला मार बसला व बेशुद्ध झाले. त्यांना त्वरित त्याच स्कूटर-वाल्याने ससून रुग्णालयात नेले. परंतु तेथे लगेच श्री. जोशी यांचे प्राणोत्क्रमण झाले.

कै. जोशी यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील दाभोळजवळील पंचनदी या गावी १९०३ साली झाला. श्री. जोशी यांचे माध्यमिक शिक्षण प्राज्ञपाठशाळेच्या राष्ट्रीय शिक्षण शाखेमध्ये झाले. त्यानंतर टिळक विद्यापीठाच्या पुणे येथील महाविद्यालयात शिक्षण घेऊन वाङ्मयविशारद ही पदवी संपादन केली. प्राज्ञपाठशाळेच्या सेवक वर्गात दाखल होऊन गेली ४५ वर्षे प्राज्ञपाठशाळा मंडळाची विविध प्रकारे त्यांनी सेवा केली.

प्राज्ञपाठशाळा मंडळाच्या अनेक शाखांपैकी माध्यमिक शिक्षण व शास्त्र शिक्षण या दोन शाखांमध्ये विद्यार्थ्यांची विनामोबदला राहण्याची, भोजनाची व अध्यनाची व्यवस्था होती. गरीब विद्यार्थ्यांना सर्व प्रकारची विनामूल्य सोय होती. त्याकरिता सर्व प्रकारचा निधी गोळा करण्याचे कार्य करणारा प्रचारक म्हणून श्री. जोशी यांनी गेली ४५ वर्षे सेवा केली. पुणे, मुंबई, नागपूर इत्यादि महत्त्वाच्या शहरांमधील मध्यमवर्गीय नागरिकांकडून वर्गणी व देणगी या रूपाने निधी गोळा करण्याचे काम नियमितपणे ते करीत होते. हजारो मध्यमवर्गीय नागरिकांचा आणि त्यांचा या निमित्ताने खूप परिचय झाला. आवश्यक ती पावतीपुस्तके आणि वर्गणी-दारांच्या याद्या यांनी भरलेली पिशवी खाकोटीस मारून ते सकाळी ८ पासून १२ वाजेपर्यंत आणि दुपारी २ वाजेपासून ५ वाजेपर्यंत शहरामध्ये फेरफटका करीत असत. ठरलेल्या महिन्यात व ठरलेल्या आठवड्यात नागरिकांची भेट घेऊन ते वर्गणी वा देणगी वसूल करीत असत. तीत रुपयापासून शंभर रुपयांपर्यंतची वर्गणी वसूल करण्यात ते केव्हाही टाळाटाळ करीत नव्हते. त्यामुळे वर्गणीदारांमध्ये त्याच्याबद्दल आपुलकी आणि आदर निर्माण झाला. त्यांचा सरळ आणि मोकळा स्वभाव आणि मोजके बोलणे, सार्वजनिक कार्याबद्दल निष्ठा यांची त्यांच्या परिचयात झालेल्या गुणग्राहक व्यक्तीवर चांगली छाप पडत असे.

वर निर्दिष्ट केलेल्या आकस्मिक निधनामुळे प्राज्ञपाठशाळा मंडळाच्या कार्यकर्त्यांच्या व विशेषत: संचालकांच्या मनाला मोठा धक्का बसला. सार्वजनिक कार्यामध्ये निष्ठावंत आणि अन्य सर्व प्रकारचे मोह टाळून सेवा करणाऱ्या फारच थोड्या व्यक्ती आढळतात.. अशा थोर व्यक्तींमध्ये कै. शंकर रामचंद्र जोशी यांची गणना करावी लागेल. स्वातंत्र्याच्या चळवळीत विशेषत: राष्ट्रीय शिक्षणाच्या आंदोलनात शेकडो व्यक्ती जन्मभर सार्वजनिक सेवेला वाहून घेतलेल्या निर्माण झाल्या. अशा व्यक्तींपैकी श्री. जोशी हे होत. त्यांनी १९३० व १९३२ च्या सत्याग्रहामध्ये भाग घेऊन कारावास पतकरला होता. अलीकडे स्वातंत्र्यसैनिकांना निर्वाहार्थ वेतन देण्याची व्यवस्था भारत सरकारने केलेली आहे. श्री. जोशी यांना हे वेतन त्वरित मिळू शकले नाही. परंतु पुष्कळ खटपट केल्यानंतर रु. २००/– मासिक वेतन प्राप्त होऊ लागले. त्यांच्या पाठीमागे त्यांची पत्नी श्रीमती सुशीलाबाई व तीन कन्या आहेत. तिन्ही कन्यांचे प्रपंच चांगले चालले आहेत. मृत्युसमयी त्यांचे वय ७५ होते. श्री. जोशी यांच्या आत्म्यास सद्गती लाभो.

अनुक्रमणिका

